

श्री

# इनामदारांचा बाळू

अथवा

मुलांचें शील कसें बनवावें यासंबंधीं

एक उत्कृष्ट धडा.

लेखक

बाळकृष्ण भाऊ जोशी, पुणें.

~~किंमत [illegible] आणा~~

आवृत्ति ३ री — १ मे १९३०.

विद्यार्थिवर्ग

सुशील व तेजस्वी झाला पाहिजे,

म्हणून

ज्यांचे कळकळीचे प्रयत्न चालू आहेत,

अशा शुद्ध सद्भावयुक्त

शिक्षकांना

हा ग्रंथ समर्पण असो.

—लेखक.




"काय करावें? मुलें ऐकत नाहींत! कितीही सांगा, धाक दाखवा, कीं मारा; त्यांचें तें खरें! शिकण्याचें व सुधारण्याचें नांव नाहीं! कांहीं उपाय नाहीं बोवा!" अशी सर्वांची एक तक्रार! अशा पालकांना प्रश्न आहे कीं, आपण कांहीं मुलांच्या शीलसंवर्धनाचा प्रयत्न केला आहे काय? नसल्यास करून पहा, आणि मग काय तक्रार करणें ती करा! मुलांना अभ्यासाला कसें प्रवृत्त करावें, उद्योगी कसें बनवावें, त्यांनी धैर्याचे कामीं कसें पुढें सरावें, औदार्याचें वळण त्यांस कसें लावावें, जीवमात्राबद्दल त्यांना प्रेम कसें वाटूं लागावें, चैनीची वृत्ति व्यर्थ आहे हें त्यांना कसें कळावें, आणि त्यांस धर्माची निष्ठाही कशी प्राप्त व्हावी, अशा आपल्या किती तरी तक्रारी असतील. या प्रत्येक तक्रारीचा मोड करण्यासाठीं आपण काय प्रयत्न केले आहेत? मुलांच्या पुढें जें जें उदाहरण ठेवावें, तशीं तीं बनतात, हें आपणांस ठाऊकच आहे. मग या प्रकारचें एकेक तरी उदाहरण आपण त्यांच्यापुढें ठेवण्याचा प्रयत्न कां करीत नाहीं? अशा गोष्टी पुढें मांडून मुलांची जितकी सुधारणा होते, तितकी नुसत्या आज्ञा सांगून किंवा नुसता यथेच्छ धाक दाखवून होत नाहीं हें आपणांस माहीत नाहीं काय? तर मग तसें करून पहा; म्हणजे आपल्या तक्रारीचें सर्व मूळ कदाचित् नाहींसें होईल!

मुलांना शिकविण्याचा उत्कृष्ट मार्ग हाच आहे. या मार्गानें मुलांची सुधारणा फार लौकर होते, कायमची होते, व उत्कृष्ट होते. गोष्टी सांगून

तत्त्वांचा बोध मनावर ठसविणें हें एक शिक्षणांतलें मर्म आहे. प्रस्तुत पुस्तकांत अशा प्रकारें अनेक बोधपर व मनोरंजक गोष्टी सांगून मुलाचें शीलसंवर्धन करण्याचा प्रयत्न केल्याचें एक चित्र दाखविलें आहे. पालकांनीं तें पहावें; आपल्या मुलांपुढें तें ठेवावें; व त्यावरून त्यांची सुधारणा कशी होते त्याचा अनुभव घ्यावा ! म्हणजे ' सर्वांची एकच तक्रार ' जी ' मुलें ऐकत नाहींत ' तिचें मूळ नाहींसें होईल. प्रस्तुत पुस्तकावरून दुसऱ्याही कित्येक गोष्टी कल्पनेनें मुलांपुढें कशा मांडाव्या याचीही पालकांना कांहीं कल्पना होईल अशी आशा आहे. याप्रमाणें मुलांना शीलवान् बनविण्याच्या कामीं पालकांना व शिक्षकांना या पुस्तकांतील गोष्टींचा उपयोग होऊन जरूर तशा नव्या गोष्टीही रचावयास त्यांना प्रवृत्ति व्हावी अशी अपेक्षा धरून हें पुस्तक लिहिलें आहे.

प्रस्तुत रचनेस इंग्रजींतील ' सँडफर्ड अॅन्ड मर्टन ' या पुस्तकाचा आधार घेतला आहे हें तज्ज्ञ वाचकांच्या लक्षांत येईलच. चालीरीतींच्या भेदामुळें तिकडील कथानकें इकडे आणतांना त्यांत पुष्कळ बदल करावा लागतो, व अर्थातच कित्येक प्रसंग सबंधचे सबंध नवे बनवावे लागतात, तोच प्रकार प्रस्तुत रचनेचे वेळींही झाला. त्यामुळें यांतील जवळजवळ एकतृतीयांश मजकूर अगदीं स्वतंत्र तयार करावा लागला. अर्थात् इतका फेरफार केल्यानंतर, ग्रंथाच्या सर्व गुणदोषांबद्दलचा भार घेण्यास प्रस्तुत ग्रंथरचनाकारास स्वतःच पुढें होणें भाग आहे, हें उघडच आहे. तेव्हां, विद्यार्थ्यांच्या शीलसंवर्धनाच्या कामीं हें पुस्तक उपयुक्त व्हावें म्हणून, जर कोणी गृहस्थ याच्या रचनेंतील दोष सुधारण्याकरितां कळकळीनें कांहीं सूचना करतील तर पुनरावृत्तीचा प्रसंग पडल्यास त्यांत तशी सुधारणा करूं अशी उमेद आहे.

प्रो. विष्णु नारायण कुंभारे, एम्. ए. सुपरिंटेंडेंट, न्यू इंग्लिश स्कूल, सातारा, यांना, शिक्षणविषयांतील एक कळकळीचे गृहस्थ या नात्यानें

स्नेहभावानें या पुस्तकाची प्रस्तावना लिहिण्यास विनंति केली असत्ता त्यांनीं ती आनंदानें लागलीच मान्य केली; व वेळ खर्चून प्रस्तावना लौकर लिहून पाठविली, याबद्दल त्यांचे आभार झाले असल्याचें येथें नमूद करणें जरूर आहे. गोष्टीच्या पुस्तकास प्रस्तावनेची आवश्यकता प्रायः नसते; आणि गोष्टीच्या नादानें वाचकांच्या डोळ्यांचीही धांव प्रस्तावनेच्या पानांपेक्षां पुढच्या मजकुराकडेच अधिक असते. असें असतां या पुस्तकास प्रस्तावना जोडण्यास आह्मीं कां प्रवृत्त व्हावें ? तर याचें कारण हें पुस्तक जसें गोष्टीचें आहे, तसेंच तें मननपूर्वक वाचून शिकावयाचेंही पुस्तक आहे; शिक्षकांनीं व पालकांनीं तें मुलांना शिकवावयाचें पुस्तक आहे. तेव्हां यांत विषय काय आहेत, त्यांचें मुलांच्या शिक्षणाच्या दृष्टीनें महत्व काय व ते विषय मुलांना कोणत्या तऱ्हेनें शिकवावयास पाहिजेत, हा विषय आरंभीं सांगून, ग्रंथांत प्रवेश करण्यापूर्वीं वाचकांना २ मिनिटें थांबविणें योग्य वाटत आहे. आणि आमच्या या मनोगतास अनुसरून वाचकही आपली पुढें जाण्याची उत्कंठा आवरून येथें थांबतील, हे त्यांचे आम्हांवर आभार आहेत.

'सर्वांची एक तक्रार' कांहींशी मिटविण्याचा असा हा एक अल्प प्रयत्न केला आहे. तो कितपत सफळ होतो तें पहावयाचें.

लेखक.

---



# दुसरी आवृत्ति.



पहिली आवृत्ति छापावयास घेतांना हें नवीन रूपांतर लोकांना कितपत मान्य होतें, व पूर्वीच्या 'हरी आणि त्रिंबक' या प्रसिद्ध पुस्तकाची कितपत बरोबरी करतें, अशी शंका वाटत होती. परंतु पुस्तक छापून होतांच चार सहा महिन्यांतच त्याची ७।८ शें प्रत-खलास झाली. आणि पुढें सरकारी टेक्स्ट् बुक कमिटीनें तें सर्व सरकारी हायस्कूलसना ४ थे इयत्तेस टेक्स्ट् करून त्याचा अगदीं अकल्पितपणें पुरस्कार केल्यामुळें राहिलेल्या प्रतीहि एक वर्षांतच संपून गेल्या! या प्रकारें 'बाळूनें' ग्राहकांच्या वर्गांत आपली परीक्षा चांगली दिली ! शिवाय शाळाखात्यांतील कित्येक विद्वान व आस्थेवाईक शिक्षक-मंडळींनींहि यासंबंधांत आपले अभिप्राय आम्हांस लिहून कळवून आमच्या 'बाळूचें' चांगलेंच अभिनंदन केलें. त्यांतले कांहीं अभिप्राय फारच सुंदर असून काव्यमय आहेत. परंतु त्यांचा येथें विस्तार करणें अप्रस्तुत होईल. सारांश, याप्रमाणें अल्पावधींतच याची पहिली आवृत्ति संपून ही दुसरी आवृत्ति काढण्याचा आज योग आला हें वाचकांस कळावितांना आह्मांस समाधान वाटतें.

या आवृत्तींत क्वचित् शब्दभेद-वाक्यभेद यापलीकडे विशेष फरक कोठेंही केला नाहीं. तेव्हां याही उद्योगाचें चीज पूर्वीप्रमाणेंच शिक्षणसंबंधांतील आस्थेवाईक सर्व सद्‌गृहस्थ करतील अशी उमेद आहे.

१ आक्टोबर १९२७

लेखक.





# प्रस्तावना

अध्यात्मविषयावर अनेक उत्तम लेख, कविता व ग्रंथ लिहिणारे मराठी भाषेंतील लेखक रा. रा. बाळकृष्ण भाऊ जोशी यांचा परिचय मराठी वाचकांस पूर्वींच झालेला आहे. अध्यात्मासारखा कठिण विषय सुगम करून सांगण्याची त्यांची हातोटी पाहून, इतर विषयांबरही त्यांनीं कांहीं लिहिल्यास त्यांच्या भाषेच्या माधुर्याचा लाभ सामान्य वाचकांसही मिळूं शकेल असें वाटून रा. जोशी यांस त्यांच्या कित्येक स्नेह्यांनीं सूचना केल्यावरून त्यांनीं प्रस्तुत ग्रंथ मुलांच्या उपयोगाकरितां मुद्दाम लिहिला आहे. इंग्रजींतील Sandford & Merton या ग्रंथावरून याची रचना केलेली असून, ओघानुसार कित्येक गोष्टी त्यांनीं नव्या रचून, त्यायोगें मुलांच्या मनांवर शीलाचें बीजारोपण करण्याचा प्रयत्न यांत केला आहे. याप्रमाणें रा. जोशी यांच्या लेखणीचा ओघ अध्यात्मांतून शिक्षणविषयाकडे वळून हें सुलभ व सुबोध गोष्टींचें पुस्तक त्यायोगें आज आमच्या मुलांना लाभलें आहे. पुस्तकांतील गोष्टी नीतिज्ञानविषयक असून उच्च शील, औदार्य, तेजस्विता, स्वाभिमान, ज्ञानलालसा, इत्यादि गुणांचा परिपोष करणाऱ्या आहेत. लहान लहान वाक्यें, साधे व सुलभ शब्द, संगतवार रचना, व सहज आकलन होण्याजोगी लेखनशैली यांमुळें, मुलांच्या मनोवृत्तीला कोठेंही ताण न पडतां, गोष्टी एकामागून एक उत्कंठेनें वाचण्याची हौस त्यांना वाटावी असें हें पुस्तक बनलें आहे.

या पुस्तकांत एका बाजूला श्रीमंती विलासांत वाढल्यामुळें उत्पन्न झालेला उद्दामपणा व दुसऱ्या बाजूला गरीब व कष्टाळू कुटुंबांत जन्मल्या-

मुळें बनलेली विनयशीलता दाखविणारीं दोन मुलांचीं दोन वेगवेगळीं चित्रें रेखाटलीं आहेत. एक मुलगा केवळ चैनी व स्वार्थी, तर दुसरा अगदीं साधा व परोपकारशील; एक हावरा व उतावळा, तर दुसरा तृप्त व शांत; एक दुसऱ्यावर आपले हुकूम चालवूं इच्छिणारा, तर दुसरा लोकांच्या अडीअडचणीला धावून जाऊन त्यांसाठीं राबणारा, अशा तऱ्हेनें भिन्नभिन्न स्वभावाचित्रें गोष्टींच्या रूपानें येथें दाखविलीं असल्यामुळें मुलांच्या मनांवर सद्गुणांचें बीजारोपण होण्यास या पुस्तकाचा उत्कृष्ट उपयोग होणार आहे. हाच प्रयत्न पूर्वी 'हरी आणि त्रिंबक' नामक पुस्तकांत एकदां झाला आहे. पण तें पुस्तक हल्लीं उपलब्ध नसून त्याची त्या वेळची भाषाही आतां वाचकांस जुनी व ओबडधोबड वाटण्याचा संभव आहे. पण हा 'इनामदारांचा बाळू' विषयांची विविधता व भाषेचा सरळपणा या दृष्टीनें श्रेष्ठ असल्यामुळें बालवाचकांस अधिक प्रिय होण्याजोगा आहे. या पुस्तकांत गोविंदशास्त्री यांचें, एक उदारचरित शिक्षक म्हणून जें चित्र दाखविलें आहे, तें फार उत्कृष्ट आहे. त्यांच्या उदाहरणावरून ऋषिकालच्या कुलपतींची आठवण होते. निःस्पृह, बुद्धिमान, विरक्त व केवळ विद्याप्रेमी असाच खरा शिक्षक असावयाचा. प्रत्येक शिक्षकानें आपल्या कार्यांत नांवारूपास येण्यास जें नमुनेदार चित्र डोळ्यांपुढें सतत ठेविलें पाहिजे, तेंच हें आहे असें वाटतें.

गोष्टी सर्व सोप्या, सुबोध व आटोपशीर आहेत. पण त्या एकामागें एक पुष्कळ, पांचपन्नास दिलेल्या पाहून वरवर पाहणारे वाचक कदाचित बिचकतील. परंतु पुस्तक क्रमानें वाचीत गेल्यास पुढें अधिकाधिक रसपरिपोष झालेला आढळतो. 'संकटीं धाव घाली' हा प्रसंग वाचून तर मुलांच्या डोळ्यांतून अश्रुच येतील ! असे हृदयाला हालवून सोडणारे कित्येक प्रसंग यांत साधले आहेत. मधून मधून प्रश्नोत्तररूप संवाद देऊन कथासंदर्भाला माधुर्य आणलें आहे. कांहीं संवाद तर सुंदरच साधले

आहेत. ( उदाहरणार्थ पृष्ठ ७३ व १३६ पहा. ) त्यांवरून रचनाकाराचें चातुर्य कळून येतें व त्याचें कौतुक वाटतें.

पुस्तकांत अतिशयोक्ति केली आहे, असें म्हणावयास सकृद्दर्शनीं कांहीं लोकांना एक निमित्त सांपडेल. कारण हरीच्या अंगचें धैर्य, प्रेमळपणा, परोपकारवृत्ति व उद्योगशीलता हीं आपणांस जरा अलौकिक वाटतात; व असले 'हरी' आमच्या घरांतून दुर्मिळच आहेत! त्याचप्रमाणें बाळानें अविचारानें हरीसारख्या उपकारकर्त्याला एकदम चापट मारावी, हा कृतघ्नपणाही एकपक्षीं आम्हांस असंभवनीय वाटतो. परंतु जीं चित्रें डोळ्यांपुढें विशेषतः यावीं असें जरूर असतें, त्यांना रंग जरूरीपेक्षांही थोडा भडक देणें आवश्यक असतें. त्याप्रमाणें पुस्तक लिहिण्याचा हेतुच तसा असल्यामुळें, मुलांचे स्वभाव नेहमीं आढळतात त्याहून ते अधिक उत्कटत्वानें दाखविणें ग्रंथकारास जरूर झालें. आणि सररहा नाहीं तरी, तसे मुलांचे स्वभाव अपवादात्मक क्वचित् आढळण्याचा संभवही आहे. तथापि हरीसारखा सालस, उद्योगी, सुशील, परोपकारी व आज्ञाधारक मुलगा कित्ता म्हणून आपले मुलांचे पुढें ठेवण्याला फार उत्तम आहे हें कबूल केलें पाहिजे. हरीच्या बालवृत्तींत प्रौढ व उदात्त विचारांचें मिश्रण मध्येंमध्यें झालेलें दिसतें. तथापि त्यामुळें स्वभावाचित्र रेखाटण्यांत फारशी हानि झाली आहे असें म्हणतां येत नाहीं.

नैतिक शिक्षण हें शाळांच्या वेळापत्रकांत घालून नियमितपणें त्याचे पाठ देत जावे, असा एक विचार हल्लीं कांहीं लोक पुढें आणीत आहेत. पण अशा कामीं Formal Moral Books पासून जो फायदा होईल, त्यापेक्षां 'इनामदारांचा बाळू' सारख्या पुस्तकांचें शिक्षकांनीं मुलांकडून वाचन करून घ्यावयाचें ठरविल्यास पुष्कळच फायदा होईल यांत शंका नाहीं. यांत गोष्टींच्याबरोबर सहज नीतिपाठ मिळतील. उदाहरणार्थ—साधेपणाचे वागणुकीची आवड उत्पन्न करावयास हरीनें केलेलें श्रीमंतीचें वर्णन

मुलांच्या नजरेसमोर आणल्यास पुरें होईल. बाळाच्या घरीं गेल्यानंतर त्यांच्या तेथील श्रिमंती थाटानें हरी अगदीं बुजून गेला. तो परत आपले घरीं आल्यावर आईबापांस म्हणतोः- "बाबा, काय हो ती परतंत्रता! त्यांचे येथें पाय धुवावयास पाणी आपले हातानें घ्यावयाचें नाहीं! तें देण्याला एक माणूस उभा! त्यानें तें ऊन पाणी द्यावयाचें! मग पाय पुसावयाला टुवाल कीं काय द्यावयाचा! बाबा, मी काय आजारी होतों, तें ऊन पाणी घेऊन पाय धुवावयाला! व त्यानें दिलेलें पाणी घ्यायला, माझे हात मला देवानें कशाला दिलेत हो!" इत्यादि प्रकारें हरीचें भाषण (पान ७ पहा.) बालवृत्तीस अनुसरून असूनही मुलांस फारच बोधप्रद होईल; व चतुर शिक्षकास अशा प्रसंगीं मुलांची मनोवृत्ति दृढ करण्यास पुष्कळच संधि सांपडेल यांत शंका नाहीं.

पुस्तकाचा बराचसा भाग वाचून झालेलें मत वर दिलें आहे. यांत अतिशयोक्ति खास नाहीं. गोविंदशास्त्री व हरी यांच्या भाषणांत केव्हां केव्हां आध्यात्मिक विचारांची छटा दिसते. एकंदरींत पुस्तक अत्यंत रमणीय, बोधप्रद व गोड आहे, असें वाचकांस विश्वासपूर्वक सांगून व त्याबद्दल रा. जोशी यांचें अभिनंदन करून हा प्रस्तावनालेख पुरा करतों.

घ. नं. ६६८, शनवार पेठ,<br>सातारा, ता. २४।१।२६ } विष्णु नारायण कुंभारे.

---



# अनुक्रमणिका.

प्रसंग.

# इनामदारांचा बाळू



## १ लाडका बाळ.



तात्यासाहेब देशपांडे हे मूळचे सातारचे राहणारे आणि मोठे श्रीमान् व जमीनदार गृहस्थ होते. सातारच्या आसपासचीं दहावीस गांवें त्यांस इनाम असून, त्यांचें घराणें मोठें खानदानीचें असल्याबद्दल सर्वत्र प्रसिद्धि होती. आपल्या शेतीची चांगली व्यवस्था लावावी, व शक्य तर ती सर्व प्रत्यक्ष आपले नजरेखालीं करावी अशा हेतूनें तात्यासाहेब आपल्या इनाम गांवांकडेच लहानपणापासून राहावयास गेले होते. त्यामुळें आतांपर्यंतचें त्यांचें बहुतेक आयुष्य खेड्यांतच गेलें होतें. सध्यां त्यांना एक मुलगा झाला होता. त्याचें नांव बाळ. मुलगा पुष्कळ दिवसांनीं झालेला व एकुलता एक, यामुळें त्याजवर तात्यासाहेबांचें व त्यांच्या पत्नी राधाबाई यांचें अतोनात प्रेम. सध्यां तो मोठा होऊन शाळेंत शिकावयाजोगा झाला होता. पण तिकडे खेड्यांमध्यें व शेतीच्या व्यवसायांत त्याच्या शिक्षणाची कांहीं सोय होण्याजोगी नव्हती. त्यामुळें तात्यासाहेब सध्यां आपलें सर्व कुटुंब घेऊन आपल्या मूळ ठिकाणींच म्हणजे साताऱ्यास राहावयास आले होते.

तात्यासाहेब साताऱ्यास राहावयास आले त्या वेळीं त्यांचा लाडका मुलगा बाळ हा आठदहा वर्षांचा होता. पोर मूळचें बऱ्यापैकीं, पण आईबापांच्या फाजील लाडामुळें त्याचा स्वभाव हल्लीं फारच चमत्कारिक झाला होता.

तात्यासाहेब तिकडे आपल्या इनामावर असतांना बाळाच्या सेवेला कित्येक गडीमाणसें राबावयाचीं; आणि बाळाच्या मर्जीविरुद्ध कोणीं एक शब्दही बोलतां कामा नये, अशी सर्वांना सक्त ताकीद असे. बाळास फिरावयास न्यावयाचें म्हणजे दोन गडी असावयाचे; एकानें त्यास कडेवर घ्यावयाचें व दुसऱ्यानें त्यास ऊन लागूं नये ह्मणून त्यावर छत्री धरावयाची. बाळास एकादे वेळीं कोठें जरा दूर जावयाचें असलें तर त्यासाठीं एक सुंदर नक्षीची गाडी तात्यासाहेबांनीं मुद्दाम मुंबईहून आणली होती, ती सदा तयार असे. तात्यासाहेबांचें कुटुंब राधाबाई यांचाहि लाडिकपणा पुष्कळ. बाळानें मला अमुक हवें म्हणण्याचा अवकाश, कीं त्यांनीं तें त्याजपुढें हजर केलेंच. तात्यासाहेबांनीं एकदां बाळाच्या शिक्षणाची गोष्ट काढली. त्याबरोबर बाळानें तक्रार केली कीं–" आई ग, मी नाहीं तें श्री ग काढीत बसायचा. मी तें परवां एकदां जरासा काढीत बसलों, तर त्यानें माझी मान दुखायला लागली; ती दोन दिवस सारखी दुखत होती, ग ! " त्याबरोबर राधाबाईंनीं लागलीच यजमानांस सांगितलें–" एकुलतें एक पोर, त्याला नको ग बाई आतांपासूनच हें असलें ओझें ! पोराच्या जिवाला त्रास देऊन, त्याला हें लिहावयास नि वाचावयास शिकवावयाला, त्याला काय कोठें नोकरी करावयाची आहे ? देवाच्या दयेनें त्याला काय कमी पडलें आहे ? खाईल पिईल तितकें थोडेंच. " या उत्तरावर कांहीं बोलावेंसें तात्यासाहेबांच्या मनांत आलें, पण ' सध्यांच नको, जाऊं द्या; ' असा विचार करून, त्यांनीं पत्नीच्या या भाषणावर या वेळीं कांहींच बोलणें केलें नाहीं.

अर्थातच अशा या वागवणुकीचा व लाडांचा परिणाम व्हावा तोच झाला. आतां खरें म्हटलें तर बाळाला जें मागावें तें सर्व मिळत होतें. मग त्यायोगें तो सुखी व आनंदी असावा, पण तसें अगदीं नसून तो सदोदित कुरकुरत व धुसफुसत बसे ! त्याचा स्वभाव पराकाष्ठेचा हट्टी बनला होता. तो त्या हट्टाच्या पायीं कधीं काय हवें तें व हवें तितकें खावयास

मागून घेई व तें खाऊन वारंवार आजारी पडे. शिवाय औषध घ्यावें, पथ्य करावें, याच्या नांवानें पूज्य; त्यामुळें कित्येक दिवस तो तसाच खितपत पडून राही. कधीं कधीं तो अशा एकादे जिनसाचा नाद घेऊन बसे, कीं तो त्यास देतां येणें अगदीं अशक्य होई. मग त्यानें मोठा गळा काढावा; व मग त्यास उगा करावयासाठीं त्याचे नाना तऱ्हेचे आर्जव करितां करितां लोकांस पुरे पुरे होई व त्यांत तासन् तास जात! एकादे वेळीं घरीं कोणी पाहुणे आले व त्यांसाठीं कांहीं विशेष जिन्नस भोजनास केला, म्हणजे बाळानें हट्ट धरलाच—कीं सर्व पंक्तीच्या अगोदर माझें पान वाढा; व तो जिन्नस सगळा माझ्या पानांत वाढा, दुसऱ्याच्या नको! आणि असला बिलक्षण हट्ट नाहीं पुरविला, म्हणजे बाळ एवढा मोठा आरडा-ओरडा करी कीं, पाहुणेमंडळींस त्याचा पूर्ण उच्छाद येई! तात्यासाहेब रोज सकाळीं जेव्हां आपल्या शेतीवर पाहणीसाठीं जात, तेव्हां ते घरून कांहीं खाऊन निघत. त्या वेळीं बाळाचा रोज कांहीं तरी नाद व हट्ट असावयाचा. चुकून जर लाडूची वाटी, किंवा एकादे वेळीं दुधाचा पेला आधीं तात्यासाहेबांचे पुढें गेला, तर दुसरी वाटी किंवा पेला आपल्यापुढें येईपर्यंत बाळूला दम कोठला? त्यानें तो पेला कीं वाटी ओढून सांडून फेकून पार करावी! अशा प्रकारच्या रोजच्या त्रासदायक वर्तनामुळें घरांत काय आणि बाहेर काय, तो कोणालाच आवडेनासा झाला. शिवाय दररोज घरांत कांहीं ना कांहीं अनर्थ याच्या या खोड्यांमुळें घडूं लागले. आज काय तर बाळानें चाकूनें आपलें बोट कापून घेतलें व बसला ओरडत; उद्यां पानसुपारीचें तबक दिलें माडीवरून खालीं फेकून, व त्याचा कांठ अगदीं वांकवून टाकला! असें कांहीं तरी रोज घडावयाचें. एकदां चुलीवर आंघणाचें पाणी सळसळत होतें. तें स्वारीनें रागाच्या भरांत खालीं लोटून दिलें! हातपाय भाजून जायबंदी व्हावयाची वेळ; पण देवाची दया, म्हणून स्वारी थोडक्यांत निभावली. बिचाऱ्याची प्रकृति तरी धडधाकट

असावयाची होती ! पण तीही इतकी नाजूक, कीं जरासा वारा लागला किंवा पावसाचा थेंब अंगावर आला, कीं आलें पडसें, भरलें हिंव ! जरा ऊन लागलें कीं तापानें गांठलेंच. इतर मुलांप्रमाणें मुलगा कोठें खेळावयास जाईल, उड्या मारील, धांवेल; पण तें कांहीं नाहीं. त्याला दुसरेंही एक कारण होतें. राधाबाईचें नेहमीं सांगणें असे कीं, बाहेरच्या मुलांत जाऊन आपले कपडे व अंग तूं मळविशील बरें ! आणि त्यामुळें सदा घरीं बसून राहावयाची मुलाला संवय. अर्थात सर्व मंडळी जेव्हां सातार्‍यास राहण्यास आली, तेव्हां बाळाला मूळाक्षरांची ओळख नव्हती; कांहीं श्रम करण्याची ताकद नव्हती; एकही साधें काम करतां येत नव्हतें; आणि घमेंडखोरपणा, माजुरीपणा, चिडखोरपणा व अडाणीपणा यांची भरपूर गर्दी झालेली होती. श्रीमंतांचा लाडका मुलगा; मग तो असा नसावा तर कसा असावा ?

# २ गरीब पोर हरी

तात्यासाहेब इनामदारांच्या वाड्याजवळच थोड्या अंतरावर बाबाजीपंत कुळकर्णी यांचें लहानसें घर होतें. बाबाजीपंतांनाहि हरी म्हणून एक एकुलता मुलगा होता. त्याचें व तात्यासाहेबांच्या मुलाचें वय सारखेंच होतें. बाबाजीपंतांची घरची गरीबीच होती. ते जातीनें ब्राह्मण होते, परंतु विद्येचें अंग फारसें नसल्यामुळें वडिलोपार्जित थोड्याशा शेतीवरच त्यांना निर्वाह करावा लागत असे. घरची शेती असूनहि ती लोकांकडे खंडानें किंवा वाट्यानें देऊन पुन: आपण नोकरीच्या मागें लागावयाचें, अशी वृत्ति हल्लीं सर्व ब्राह्मण लोकांत शिरलेली आढळते; परंतु बाबाजीपंत याला एक अपवाद होते म्हटल्यास चालेल. त्यांच्या घरीं चार बैल, दोन गायी, एक म्हैस इतकीं जनावरें नेहमीं गोठ्यांत असत. शेतीच्या हंगामाचे वेळीं गरजेप्रमाणें गडीमाणसें ते मोलानें लावीत, एरवीं सर्व काम स्वत:च

जातीनें करीत. त्यामुळें त्यांचा मुलगा हरी यासही अशा कित्येक कामांची संवय होती. त्याला रानांतून फिरावें लागे; कामावर लावलेल्या इतर माणसांबरोबर त्यासही शेतांत काम करावें लागे. घरचे बैल, गायी व वासरें यांना सकाळीं चारावयास न्यावयाचें व सायंकाळीं परत घरीं आणून बांधावयाचें, त्यांस दाणा-वैरण टाकावयाची, ही सर्व कामगिरी हरीसच प्रायः करावी लागत असे. त्यामुळें साहजिकच त्याचे अंगीं चपळपणा आणि काटकपणा आलेला असून त्याचे चर्येवरही चांगली टवटवी दिसे. तात्यासाहेबांच्या मुलाप्रमाणें हरीची मुखचर्या मोठी सुंदर, रेखीव व ठाकठिकीची नव्हती, तरी त्याच्या चर्येवरून त्याचा सुस्वभाव व प्रामाणिकपणा पाहणाराच्या ध्यानांत सहज येई; व म्हणून सर्वजण त्याच्यावर साहजिकच प्रेम करीत. तो आपला सौम्यपणा कधींच सोडीत नसे. एकाद्याच्या उपयोगीं पडावयाचा प्रसंग हा त्यास मोठा आनंददायक वाटे. हरी रानांत दशमी घेऊन चालला असतां त्यास जर एकादा गरीब भुकेलेला माणूस भेटला, तर हरी त्याला एक दशमी तरी काढून देईल, किंबहुना संबंध शिदोरीही त्यास देण्यास अनमान करणार नाहीं, हें खास! त्याच्या स्वभावांत आणखी एक उत्कृष्ट गोष्ट आली होती. त्याच्या आसपास शेतकरी लोकांची वस्ती फार होती. त्यांच्याशीं त्याचा पुष्कळदां प्रसंग पडे. त्यामुळें त्यांच्यांत जीवहिंसा चालू असलेली पाहून त्यास फार वाईट वाटे. कोंबड्या, कोंबड्यांचीं पिलें, बकरीं आणि मासे यांचे संहार त्याच्या मनाला फार लागत. त्यामुळें लोकांतील हा जीवहत्येचा प्रकार केव्हां बंद होईल असें त्याच्या कोवळ्या मनास वाटे. अर्थातच तो स्वतः होऊन एकादा खेळ खेळावयाचा झाला तर, ज्यांत दुसऱ्या जीवांना पीडा होईल असा खेळ कधींच खेळत नसे. कारण, आपल्याप्रमाणेंच त्यांनाही मन आहे, त्यामुळें त्यांना या सर्व वेदना आपल्याप्रमाणेंच जाणवतात, पण त्यांना उघड करावयाला वाचाशक्ति देवानें दिली नाहीं, एवढेंच काय तें; हें त्याला

एवढ्या वयांतच कळूं लागलें होतें. गाडीला किंवा नांगराला बैल जुंपून त्यांस ते ओढावयास लावण्याचा प्रसंग त्यास रोजचा असे. त्या वेळीं तो त्यांना बारंबार गोंजारी व प्रेमाचीं गाणीं गाई. कोंबड्यांना किंवा चिमण्यांना टाकण्यासाठीं घेतलेलें धान्य नेहमीं त्याच्या खिशांत आढळावयाचेंच. रानांतून चालला असतां हिरवें कोंवळें गवत कोठें उगवलेलें दिसलें कीं तें यानें गोळा करावयाचें, व घरीं नेऊन गाईच्या लहान लहान वासरांना घालावयाचें. त्याच्या या प्रेमामुळें त्या वासरांचेंही त्याजवर तसेंच प्रेम जडे व तीं पुष्कळ वेळां मोकळींच त्याजबरोबर जात येत असत. कुत्र्यासारखें प्रामाणिक जनावर दुसरें कोणतेंही नाहीं असें पाहून त्याला त्याचें विशेष प्रेम वाटे. त्यामुळें आपले शिदोरीपैकीं बहुतेक शिदोरी वाटेंतल्या कुत्र्यांना घालून कित्येक वेळ हा तसाच उपाशीं परत येई व मग सायंकाळीं त्यास जेवण मिळे. कारण त्याला वाटे, या जीवांनीं अन्नावांचून तळमळावें यापेक्षां आपणच एक दिवस उपास केलेला काय वाईट ! रस्त्यांत कुत्रें आढळलें कीं त्यास धोंडा मारावा, पतंग पकडून त्याचे पायांस दोरी बांधून त्यास फरफटत ओढावें, असले निर्दयपणाचे किती तरी खेळ लहान मुलांच्या अगदीं अंगवळणीं पडून गेलेले असतात, परंतु असल्या प्राण्यांना हरीनें कधीं म्हणून कधीं सुद्धां उपद्रव देऊं नये ! तो म्हणे, या पृथ्वीवर देवानें त्यांस निर्माण केलें आहे; तर मनुष्यांप्रमाणेंच त्यांनींही सुखानें राहावें असें देवाच्या मनांत असलें पाहिजे. तर अशा प्राण्यांना मनुष्यानें केवळ आपल्या करमणुकीसाठीं छळावें हा क्रूरपणा होय. तो देवाला कधींही आवडणार नाहीं. त्याबद्दल तो केव्हां तरी शिक्षा करीलच करील.

हरीचे अशा प्रकारचे सुंदर चिमुकले विचार व त्याचा असा हा ममताळू स्वभाव त्याच्या आळींतील लोकांच्या जसजसा नजरेस येत चालला, तसतसा तो त्या सर्वांचा आवडता होऊन बसला. त्याच गल्लींत गोविंदपंत नांवाचा एक सात्विक गरीब गृहस्थ रहात असे. गोविंदपंत यांचें अध्ययन

चांगलें झालें होतें. संस्कृतांत ते पारंगतच होते. भारत, भागवत, रामायण हे प्राचीन ग्रंथ, थोडासा कालिदास व भवभूति हे त्यांनीं वाचले असून महाभारत हा ग्रंथ त्यांच्या विशेष भक्तीचा होता. शिवाय सर्व हिंदुस्थानभर फिरून त्यांनीं चारी धामांची यात्रा केलेली होती. त्यामुळें त्यांस निरानिराळ्या प्रकारच्या लोकांच्या चालीरीती, स्वभाव वगैरे माहीत झाले असून, पुष्कळ निरनिराळ्या लोकांचा परिचय करण्याचा प्रसंग त्यांस आला होता; त्यामुळें व्यवहारज्ञान त्यांस फार उत्कृष्ट झालें होतें. मुलांना शिकविण्याची त्यांना स्वभावतःच आवड असे; आणि प्रसंगानुरूप एखादा विषय गोष्टीच्या रूपानें मुलांच्या पुढें मांडणें हें त्यांना अगदीं आंगवळणीं पडून गेलें होतें. अशा कित्येक सुंदर चिमुकल्या बोधपर गोष्टी रचून त्यांनीं त्या आपल्याजवळ एका पुस्तकाच्या रूपानें लिहून ठेवल्या होत्या; व आपल्या मुलांना बोध करण्याच्या वेळीं एकाद्या क्रमिक पुस्तकाप्रमाणें ते त्याचा उपयोग करीत असत. व्यक्तीच्या किंवा समाजाच्या भरभराटीला मूळ कारण व्यक्तीचें किंवा समाजाचें शील हेंच होय. यासाठीं, शिक्षणाचें मूळ मर्म शील हेंच असून, पालकांनीं अथवा पंतोजींनीं सर्व प्रकारच्या शिक्षणांत शीलावरच मुख्य भर दिला पाहिजे, असें त्यांना मनापासून वाटे. म्हणून ते आपल्याकडे शिकावयास येणाऱ्या मुलांचें शील दृढ करण्याचा फार काळजीपूर्वक प्रयत्न करीत.

याप्रमाणें गोविंदपंत हे बहुश्रुत, बुद्धिमान, आचारशील व शिक्षणाच्या कळकळीचे गृहस्थ असल्यामुळें लोकांना त्यांच्याबद्दल आदर वाटत असे. त्यामुळें गांवांतील कांहीं चांगले लोक आपलीं मुलें त्यांजकडे शिक्षणासाठीं पाठवीत. गोविंदशास्त्रीसुद्धां त्या मुलांस मोठ्या प्रेमानें व हौसेनें शिकवीत. बाबाजीपंतांचा मुलगा हरी हा त्यांच्या घराजवळच असल्यामुळें त्याचा स्वभाव त्यांस फार पसंत पडून, तो पुढें फारच चांगला निघून पुष्कळ नांवलौकिक मिळवील असें त्यांनीं ओळखलें व स्वतः होऊन त्यास आप-

लेकडे शिकण्यास पाठविण्याबद्दल बाबाजीपंतांकडे त्यांनीं एकदां गोष्ट काढल बाबाजीपंतांस स्वतः विद्येचा गंध फारसा नव्हता, तरी आपणा विद्या नसावी हें चांगलें नाहीं असें त्यांचें मन त्यांस वारंवार खात होतें परंतु करणार काय ! बिचारा लहानपणापासून शेतकींत गुंतल्यामुळें त्याच तसा वावच मिळाला नाहीं. आपला मुलगा हरी स्वभावतः हुषार आहे तेव्हां त्यास तरी थोडी विद्या शिकवावी, असें त्यांना वाटे; परंतु त्याच्याही मागें शेतीचें व गुरें संभाळण्याचें काम लागलें असल्यामुळें त्यास क मोकळा करावा हें त्यांना समजेना. त्यामुळें हरीहि दहा वर्षांचा होईपर्यं त्यास त्यांना कांहीं शिक्षण देतां आलें नाहीं. परंतु आतां गोविंदपंतांन ही गोष्ट स्वतः होऊन काढल्याबर त्यांनीं लागलीच रुकार दिला; व वेळां वेळ काढून हरीस दररोज त्यांजकडे पाठविण्याचें त्यांनीं ठरविलें.

हरी गोविंदशास्त्र्यांकडे येऊं लागल्यापासून थोड्याच दिवसांत तो त्यांच अगदीं आवडता शिष्य बनून राहिला. त्यांनीं त्याला लौकरच मूळाक्ष शिकविलीं, आणि सर्वसाधारण लिहितां व वाचतां येईल अशी त्याची तयारी लौकरच करून दिली. हरीवर गोविंदशास्त्र्यांचें इतकें प्रेम बसणें अगदीं साहाजिक होतें. कारण, एवढ्या तेवढ्या प्रसंगापासून एकादें महत्वाचें काम असलें तरी, दुसऱ्याच्या उपयोगीं पडावें हा हरीचा स्वभाव फार; त्यामुळें त्याच्यावर कोणाचीही प्रीति फार लौकर जडे. शिवाय हरी नेहमीं आनंदांत असावयाचा; कधीं कांहीं कुरकूर करीत बसला आहे, कीं कशामुळें खिन्न झाला आहे, असें कधींच आढळत नसे. शिवाय त्याचा स्वभाव इतका प्रामाणिक होता कीं, जर कोणी साताऱ्च्या पेढ्यांचा पुडा त्याच्या हातावर ठेवून, किंवा एक रुपाया बक्षिस देऊन, त्यास खोटें बोलावयास विनंति केली; आणि उलट ‘ खरें सांगशील तर तुला चाबकानें फोडून काढीन ’ असा धाक घातला, तरी खरी गोष्ट सांगून टाकायला तो क्षणभरही अनमान करावयाचा नाहीं हें अगदीं ठरलेलें असे !

# ३ दोघांची ओळख.



हरीची व तात्यासाहेबांचे चिरंजीव बाळ याची एकदां एका आकस्मिक तऱ्हेनें गांठ पडून त्यांची परस्पर ओळख झाली. पावसाळ्याचे दिवस होते. पाऊस खूप पडत होता, व शहरांतील सर्व ओढे नाले खळखळ वाहात चालले होते. दर घराच्या भोंवतीं हिरवेंगार गवत लागून गेलें होतें व ठिकठिकाणींही रान खूप माजलें होतें. अशा दिवसांत एकदां पाऊस जरा थांबला, व आकाश स्वच्छ झालें. त्यामुळें सूर्याचे कोमल किरण रस्त्यांवर, घरांवर, गवतावर व झाडांवर पडून चमकूं लागले. अशा वेळीं बाळास फिरावयास जावेंसें वाटून तो घरचा एक माणूस बरोबर घेऊन निघाला. पण गावांबाहेर पडून रानाच्या बाजूला ते जों वळतात, तों रस्त्याच्या बाजूला माजलेल्या गवतांतून एक मोठा थोरला साप सळकन् बाहेर आला; आणि चालतां चालतां बाळाच्या पायांत घोटाळूं लागला! बरोबर आलेला माणूस म्हणजे एक पोर होतें. त्याला या वेळीं काय करावें तें न सुचून त्यानें घाबरून एक मोठी किंकाळी फोडली व तो घराकडेच धांवत सुटला! पण कर्मधर्मसंयोगानें बाबाजीपंतांचा मुलगा हरी त्या वाटेनें आपल्या शेताकडून घरीं येत होता, त्यानें ती किंकाळी ऐकली. त्याबरोबर तो धावतच तेथें येऊन पोंचला. पाहतो तों बाळाच्या पायाला सापाचा विळखा असून तो बेशुद्ध होऊन रस्त्यावरच पडून राहिला आहे! मग त्या धाडसी पोरानें मोठा हिय्या करून व फार चपळाईनें एक फडकें चटकन् हातास गुंडाळिलें, आणि त्या सापाच्या मानेला एकदम पकडलें, आणि बाळाच्या पायापासून सोडवून घेऊन एक जोराचा हिसडा देऊन आपटून एका क्षणांत त्याला अर्धमेला करून टाकला! आणि लगेच त्याचें मस्तक दगडानें ठेंचून त्यास दूर भिरकावून दिलें!

इतकें होत आहे तोंच बाळाचे घरीं तें वर्तमान पोंचून त्याची आई राधाबाई व घरांतील इतर माणसें धांवत धापा टाकीत तेथें येऊन पोंचलीं. पाहातात तों बाळ नुकताच कोठें मूर्च्छेंतून सावध होऊन समोरच उभा असलेल्या त्या नव्या सोबत्याकडे–हरीकडे जरा किंचित् डोळे उघडून पाहूं लागला आहे. राधाबाईनीं तें पाहातांच धावत पुढें जाऊन प्रथम आपल्या बाळाला उचलून पोटाशीं घेतलें, आणि प्रेमाच्या भरांत त्याचें चुंबन घेऊन त्या म्हणाल्याः––

" बाळ माझें! बाळ, काय रे झालें तुला ? माझें बाळ तें! "

बाळ–" आई, मला कांहीं नाहीं झालं ग, पण केवढ्या मोठ्या सापानें माझ्या पायाला विळखा घातला होता! या पोरानें धावून येऊन जर त्याचा विळखा लागलीच काढला नसता, तर तो मला खरोखर चावलाच असता व त्यानें माझा प्राण कीं घेतला असता! "

तेव्हां राधाबाई हरीकडे पाहून म्हणाल्याः––कोणाचा रे बाळ तूं ? तूं आमच्यावर आज हे केवढे तरी उपकार केलेस!

मुलगा म्हणालाः––काकू, माझें नांव हरी. मी इकडून जात होतों तों एक किंकाळी ऐकून जवळ आलों. या रानांत साप पुष्कळ फिरतात, पण आम्हांला त्याचें कांहीं वाटत नाहीं. आम्ही त्यांना लागलीच धरून ठोकतों. यांत कसला उपकार ?

राधाबाईः–" शाबास बाळा! मग तूं फारच धीट आहेस. तर तूं आतां आमच्या घरीं येतोस ? आमच्याबरोबर जेवण कर आणि मग आपले घरीं जा. आतां जेवावयाची वेळ झालीच आहे. "

" नाहीं काकू; माझे बाबा घरीं माझी वाट पहात असतील. "

" कोण तुझे बाबा ? "

" बाबाजीपंत कुळकर्णी हे माझे वडील. आमचें घर येथून जवळच त्या ओढ्याच्या पलीकडील बखळींत आहे. "

" बरें बाळ. पण आतांपासून तूं आमचाच मुलगा असें मी समजतें. आतां मी तुझी आई बरें ?"

" पण माझे बाबा व माझी आई माझ्या घरांत आहे ती ! ती माझी आई नाहीं का ? मग शिवाय तुम्ही माझ्या आई होणार होय ? "

" हो, बरें बाळ. आहेत ते आईबाप तुझेच. शिवाय मी तुझी आई समजलें ना आतां ? आतां आमच्या घरीं जेवावयास चल. "

" हो. पण माझ्या आईबापांना विचारल्याशिवाय मला तुमच्या एथें जेवावयास कसें येतां येईल ? "

" त्यांची परवानगी विचारावयाला मी आतां एक माणूस पाठवितें, बरें बाळ ! मग तर झालें ? "

असें म्हणून राधाबाईनीं लागलीच एक माणूस हरीच्या घरीं निरोप कळविण्याकरितां रवाना केला. आणि हरीचा हात धरून त्यास मोठ्या प्रेमानें त्या आपल्या घरीं घेऊन आल्या. तात्यासाहेब नुकतेच बाहेरून येऊन घरांत आपली पत्नी व चिरंजीव कां दिसत नाहींत म्हणून जों विचारांत पडतात, तोंच राधाबाई, बाळ वगैरे मंडळी दरवाजांतून आंत आली ! आंत येतांच राधाबाईनीं तो गुदरलेला चमत्कारिक प्रसंग व त्या प्रसंगीं हरीनें दाखविलेलें धैर्य तात्यासाहेबांस सर्व सविस्तर वर्णन करून सांगितलें. तात्यासाहेबांस तें ऐकून फार नवल वाटलें !

---



# ४ मेजवानीचा प्रसंग.



तात्यासाहेबांचें घर म्हणजे हरीला सर्व नवा प्रकार होता. तात्यासाहेब श्रीमंत इनामदार. त्यांचा सर्व थाट अद्याप पेशवाई तऱ्हेचा होता. हरी प्रथम मुख्य दिवाणखान्यांत आला व इकडून तिकडे जसा जाऊं पाहूं लागला, तों सोनेरी चौकटींचे मोठमोठे आरसे भिंतींवर टांगलेले त्यास दिसले. तक्के, लोड व गालिचे फारच मूल्यवान असे, टेकावयास व बसावयास पसरून ठेवून दिले होते. खुंट्यांवर भरजरीचे पुष्कळांचे पोषाख चमकत होते. बाळ्याचे व चिकाचे पडदे खिडक्यांवर व दारांवर लोंबत होते. आणि सुंदर चौफुल्यांचे पाट, रुप्याचीं मोठीं नकशीदार फुलपात्रें, तांब्ये, सैंपाकघरांत एका फळीवर ठेवून दिलेले चकचक चकचक करतांना दिवाणखान्यांतून दिसत होते. इतकें सर्व हरी पाहत आहे, इतक्यांत भोजनाची तयारी असल्याचें ब्राम्हणानें येऊन कळविलें. लगेंच सर्व मंडळी सोंवळें नेसून पानावर जाऊन बसली. तात्यासाहेबांनीं हरीस आपल्या एका अंगास व बाळास आपल्या दुसऱ्या अंगास बसवून घेतलें होतें. जेवणाचा बेत मोठा उत्कृष्ट केला होता. हरीच्या पानांत सर्व जिन्नस तात्यासाहेबांनीं लक्षपूर्वक वाढावयास लावून, मोठ्या प्रेमानें त्यास ते खाण्यास त्यांनीं आग्रह केला. परंतु नित्याच्या नियमित आहारापलीकडे आग्रहाचा एकहि घास त्यानें खाल्ला नाहीं; आणि ही एवढी श्रीमंती पाहून तो फारसा खूष झाला किंवा त्याचें त्यास मोठें नवल व प्रतिष्ठा वाटली, असेंही झालें नाहीं. असा प्रकार पाहून सर्वांना चमत्कार वाटला. राधाबाईंना तर हा हरीचा स्वभाव फारच चमत्कारिक वाटला, हें त्यांच्या चर्येवरूनच दिसलें. त्यांना स्वतःला श्रीमंतीचा व छानछोकीचा फार शोक; त्यामुळें त्यांची अशी कल्पना कीं, दुसऱ्या कोणालाही ही

आपली श्रीमंती पाहून नवल वाटल्याशिवाय राहूं नये. परंतु हरीच्या संबंधांत त्या अगदीं फसल्या. शेवटीं एका रुप्याच्या पेल्याकडे हरी लक्षपूर्वक पाहत आहे असें वाटून त्यांनीं त्याला म्हटलें:—" हरी, असला छानदार पेला आपल्याला घरीं पाणी प्यायला असला तर फार सुरेख होईल, असें तुला वाटतें आहे का? आमच्या बाळाचा तो पेला आहे. पण माझी खात्री आहे कीं, तो आपल्या सोबत्याला तो आनंदानें देईल. कधीं नाहीं म्हणणार नाहीं. नाहीं का रे बाळ?"

तोंच बाळानें उत्तर दिलें—" हो! आई मी खरोखरच देईन. कारण मला तो परवां घेतलेला सोन्याचा नवा पेला आहे कीं! तो याच्यापेक्षां तर फारच सुरेख आहे. आणखी शिवाय रुप्याचे दोन तीन निराळे पेले माझे आहेतच, नाहीं आई?"

हरी म्हणाला:—" पण मला कशाला पाहिजे तो पेला? माझ्या घरांत तर याच्याहिपेक्षां फार सुरेख असें पंचपात्र आहे!"

राधाबाई म्हणाल्या:—" काय? तर मग तुम्ही काय, दररोज रुप्याच्या पंचपात्रांतून पाणी पितां?"

हरी:—" रुप्याचें कीं कशाचें, तें मला माहीत नाहीं. परंतु तें घासून ठेविलें म्हणजे तर किती सुरेख व चकचकीत दिसतें! अगदीं याच्यासारखें!"

राधाबाई:—" मुलगा तर अगदींच भोळा आहे! अरे, पण मग तें या आमच्या रुप्याच्या पेल्यापेक्षां उत्तम कशावरून?"

हरी:—" उत्तम कशावरून म्हणजे? फारच उत्तम. कारण त्याच्यापासून आम्हांला कधीं कोणचा त्रास होत नाहीं कीं गैरसोय होत नाहीं."

राधाबाई:—" अरे बाळ, त्रास नि गैरसोय होत नाहीं म्हणजे काय? यांत त्रास नि गैरसोय ती काय व्हावयाची असते?"

हरी:—अहो काकू, गैरसोय नाहीं तर काय? मघाशीं जेव्हां त्या

रामाच्या हातून तो तुमचा पेला खालीं पडला, तेव्हां तुम्हांला त्याबद्दल किती वाईट वाटलें! तुम्ही रागावलां, व त्याला पुष्कळ बोललांत! तें मीं आतांच पाहिलें. पण आमच्या येथें तसें नाहीं. आमच्या घरांतलीं सर्व माणसें आमच्या भांड्यांना इतकीं कांहीं भीत नाहींत; त्यांचें आम्हांला कांहींच वाटत नाहीं!"

यानंतर राधाबाई तात्यासाहेबांकडे वळून म्हणाल्या:—"काय तरी बाई हा मुलगा? याची कल्पना अगदींच विलक्षण! अशा मुलाला आतां म्हणावें तरी काय?"

जेवणाच्या वेळीं खरोखरच एका नोकरानें एक रुप्याचें भांडें खालीं पाडलें, त्यामुळें त्यास पोचा आला. तें बरेंच नकशीदार होतें. त्या वेळीं राधाबाई अगदीं कावऱ्या बावऱ्या झाल्या व लागलीच त्यांनीं त्याची खरडपट्टीही काढली. तें सर्व हरीनें नुकतेंच पाहिलें होतें.

तिसरे प्रहरीं नेहमींप्रमाणें उपहाराची वेळ होतांच राधाबाईनीं एक पेला चहा स्वतः हरीस आणून दिला, आणि घे म्हणाल्या. हरी म्हणाला—

"हें कशाला मला? मला कांहीं तहान लागली नाहीं!"

राधाबाई—"अरे, चहाला तहान का लागावी लागते? घे तूं आपला. चहा कसा सुरेख झाला आहे पहा! तुझ्यासारख्या चांगल्या मुलानें तो घेण्यास हरकत नाहीं."

हरी:—"पण काकू, आमच्या गुरुजींनीं आह्मांस सांगून ठेविलें आहे कीं, आपणांस भूक लागली असली तरच आपण कांहीं खावें, व तहान लागली असली तरच कांहीं प्यावें; आणि भूक किंवा तहान लागल्यावरही असेच साधे जिन्नस खावे-प्यावे कीं, ते आपणास फारशा आयासावांचून कोणत्याही स्थितींत मिळूं शकतील. कारण, नाहीं तर वेळेला तसे जिन्नस आपणांस मिळाले नाहींत, तर आपण कुरकुर करीत बसूं व त्यायोगें आपणांस त्रास झाल्यावांचून राहणार नाहीं."

हें त्या मुलाचें सुरेख बोलणें ऐकून तात्यासाहेबांस मोठें कौतुक वाटलें. ते म्हणाले—" हा मुलगा मोठा हुषार दिसतो. विचार करण्याची संवय याला आतांपासूनच चांगली लागली आहे. मला वाटतें, आपल्या बाळालाही याच्या गुरुजींच्याकडे शिकावयाला पाठवून द्यावा. तो आतां मोठा होत चालला आहे. आणि या वेळीं लिहा वाचावयास शिकणें त्यास आवश्यक आहे. त्याच्या गुरुजींनीं याला आपल्या हातीं घेतला तर अगदीं त्यांचे आपल्यावर उपकार होतील. एक सरकारी शाळा येथें निघाली आहे म्हणे. पण तेथें कसें शिकावितात नि काय शिकवितात तें मला माहीत नाहीं. आणि आपल्याला त्या परीक्षांची तरी काय गरज आहे ? म्हणून मला हें घरगुती शिक्षणच बरें वाटतें. काय रे बाळ ? तुला काय वाटतें ? या हरीप्रमाणें मोठा विचारशील व विद्वान तत्त्ववेत्ता व्हावें असें तुला वाटतें कीं नाहीं ? "

बाळासाहेबांनीं उत्तर दिलें—" काय, तत्त्ववेत्ता! तत्त्ववेत्ता कसला असतो तें मला नाहीं ठाऊक. पण मी कोण होणार सांगूं का ? मी होणार आहे राजा ! कारण राजाच सर्वांत श्रीमंत असतो; व राजाच सर्वांत छान दिसतो. शिवाय राजाच्या मागें कांहीं कामें करण्याची ब्याद नसते; आणि सर्व जण त्याच्या कसे अगदीं धाकांत वागतात ! "

राधाबाई म्हणाल्या—" तरी तूं माझा बाळ ! कसें छान बोललास पण ! " आणि लागलीच उठून, त्याला पाटोशीं धरून, त्याची हनुवटी कुरवाळीत त्या पुढें म्हणाल्याः—" आणि खरोखरच माझा बाळ राजा होण्यालाच योग्य आहे. व म्हणूनच तर तो असें बोलला ! कसें सुरेख उत्तर माझ्या बाळानें दिलें ! त्याला आतां मी एक पेढा आणून देतें ! आणि काय रे हरी, तुला नाहीं का रे राजा व्हावेंसें वाटत ? "

हरी म्हणालाः—" छे छे ! मुळींच नाहीं मला तसें वाटत ! मी आतां मोठा झालों कीं, मी स्वतः घरची सर्व शेतकी करावयास लागणार आहे.

आम्हांला शेतकीच फार आवडते. चाकर नको नि माणसें नकोत. आपलें आपण सर्व कांहीं करावें तेंच चांगलें. ''

राधाबाई तात्यासाहेबांना हळुच ह्मणाल्या:—" शेतकऱ्याच्या व इनामदारांच्या मुलांमध्यें किती फरक आहे पाहिलांत ना ? " आणि थोड्याशा धिकारयुक्त दृष्टीनें राधाबाई हरीकडे पाहूं लागल्या.

तात्यासाहेब ह्मणाले: —" मला नाहीं तुझ्यासारखें वाटत. अशा वयांत बाळानें असें कांहीं बोलणें मोठें चांगलें आहे असें माझें मत नाहीं. '' नंतर ते हरीस ह्मणाले:—" पण हरी, राजा होणें राहूंदे तूर्त; पण आपण श्रीमंत असावें असें तुला नाहीं का वाटत ? ''

हरी म्हणाला:— ' उं हूं ! '

राधाबाई:—" उं हूं काय रे ? अगदींच अडाण्यासारखा बोलतोस तें ! कां रे तुला नाहीं वाटत श्रीमंत व्हावें असें ? ''

हरी:–कारण कीं, श्रीमंती फार वाईट ! श्रीमंत लोक चांगले नसतात; ते गरीबांना छळवात. त्यांच्याकडून आपली कामें फुकट करून घेतात. वाटेल तेव्हां त्यांना अडवून आपल्या कामाला लावतात. आणि त्यांच्या या अशा वागणुकीस कोणी हरकत करील, तर त्याचा आकस धरून कांहीं खोटेंनाटें कुभांड रचून त्यावर खटले करतात ! एकदां त्यांच्या रागांत माणूस सांपडला कीं, रानांत त्याचें पीक राहावयाचें नाहीं; गंजींना आगी लागावयाच्या; घर पेटावयाचें आणि गुरें मरावयाचीं ! इतका त्रास ते गरीबांना देतात. एक शिवापारगे ह्मणून तिकडे माचीला मोठा श्रीमंत पाटील आहे. तो असे पुष्कळ उपद्रव गरीबांना देतो. तो असें कां करतो, म्हणून मीं बाबांना विचारलें, तेव्हां ते म्हणाले, " अरे, तो श्रीमंत आहे; तो असें करणारच ! ' त्याच्यावरून मी हें म्हणतों. तर चांगलीं सज्जन माणसें श्रीमंत कशीं असतील ? ''

एवढें बोलणें ऐकल्यावर राधाबाईना हरीच्या मोळसर कल्पनांबद्दल

थोडासा रागच आला. तथापि त्या पुनः हरीस म्हणास— " पण हरी, आपल्याला इकडे तिकडे फिरायला एक सुरेख घोडा असावा, व आपली सर्व बरदास्त ठेवायला चाकरमाणसें आपल्याला असावीं, असें सुद्धां नाहीं का तुला वाटत ?"

हरी:— " पण मला घोड्याची जरूरच काय ? कारण, मला कोठेंही जावेंसें वाटलें, तर मला वाटेल तितकें दूर माझ्या पायांनीं जातां येतें ! आणि चाकरमाणसें तर काय करावयाचीं आहेत ? त्यांना सांगावयाला मजजवळ काम काय आहे ?"

तेव्हां ' किती विचित्र मुलगा ' असें वाटून राधाबाईंना त्याव- थोडासा तिरस्कारच वाटूं लागला. मग त्यांनीं आणखी त्यास कांहीं तरी रावयाचें सोडून दिलें. पुढें सायंकाळ होत आलेली पाहून हरीला पल्या आपला एक माणूस बरोबर देऊन त्याचे घरीं पाठवून दिलें. असें

घरीं येतांच बाबाजीपंत ह्मणाले:— " काय रे हरी, आज मुळींच मेजवानी झाली ? इतका वेळ काय काय गोष्टी तेथें झाल्या ? दारांच्या घरीं तुझा सर्व दिवस फार आनंदांत गेला असेल, नाहीं ! आणि

हरी:— " छे बाबा ! आनंद कसला ? मला त्याचा कंटाळा पाठ— बाबा, त्यांच्या घरांतील सर्व मंडळी माझ्याशीं फार प्रेमानें वा राहील, मला त्याबद्दल त्यांचे फार उपकार वाटतात. परंतु मला असें सारखें पाठ— होतें कीं, मीं आपल्या घरीं गेलों असतों तर सुरेख झालें असतें. कारण तिथें सारीच परतंत्रता मला वाटली. अहो बाबा, त्यांच्या येथें पाय धुवावयास पाणी आपल्या हातानें घ्यावयाचें नाहीं ! तें देण्याला एक माणूस उभा. त्यानें ऊन पाणी पाय धुवावयास द्यावयाचें. बाबा, मी काय आजारी होतों, तें ऊन पाणी घेऊन पाय धुवायला ? पुढें पाय पुसावयाला एकजण एक फडकें—टुवाल कीं काय त्यास म्हणतात, तें—घेऊन उभा ! पुढें संध्येला, जेवावयाला, तांब्या—भांडें सर्व कांहीं दुसऱ्या माणसांनीं द्यावयाचें व तें

आह्मीं घ्यावयाचें. आह्मीं बसल्या जागेवरून उठावयाचें म्हणून नाहीं ! जणूं काय आम्हांला पायच नाहींत ! कायहो बाबा हें ? आणि बाबा, दुसरी एक गंमत तुम्हांला सांगावयाची राहिलीच ! त्यांच्या घरांत कपडे किती ऐटदार ! एक पोशाख जरीचा, एक रेशमाचा; एक आणखी कशाचा तरी. पैठण्या, शेले, शालू आणि दुसरे किती, हजारों प्रकार ! कशाला हो बाबा हे लागतात ? इतके हे कपडे घालावयाचे केव्हां व काढावयाचे केव्हां ? दिवसभर हाच उद्योग काय ? आणि बाबा, जेवण झाल्यापासून हा वेळपर्यंत मला एका गालिचावर स्वस्थ बसून राहावें लागलें बघा. तेथें ते तात्यासाहेब, त्या राधाबाई, बाळ, आणि सारेच जण बसले होते गोष्टी बोलत. त्यांच्या सर्वांच्या मनांत असें होतें कीं, त्यांच्यासारखे कपडे करण्याचा नादिष्टपणा मीं स्वतः करावयास लागावें, आणि राजा व्हावयाचें किंवा कोणीतरी मोठा श्रीमंत माणूस व्हावयाचें माझ्या मनांत भरावें ! पण त्यापैकीं एकही प्रकार, बाबा, मला मुळींच आवडला नाहीं हो ! "

---

## ५ गोविंदशास्त्री.

इकडे तात्यासाहेबांच्या घरीं हरीच्या संबंधानें बराच वेळ बोलणें चालू राहिलें. हरीच्या आंगची धिटाई आणि त्याच्या मनाचा मोकळेपणा हीं राधाबाईनीं कबूल केलीं; आणि त्याच्या वागणुकींत जें सौजन्य दिसून आलें, त्याचा त्यांच्या मनावर तर विशेष परिणाम झाला; तरी त्याच्या ज्या कल्पना त्यांनीं ऐकल्या होत्या, त्यांसंबंधीं त्या म्हणाल्या कीं, त्या कांहीं तरी भरमसाटपणाच्या आहेत, व त्यांत कुणबाऊपणाची बरीच छटा आलेली आहे. त्यावरून आपल्यासारख्या उच्च व खानदानीच्या घराण्यांतील मुलें कशीं असतात व कुणब्याचीं पोरें कशीं असतात, हें चांगलें कळून येतें. तात्यासाहेब म्हणाले,—" असला मुलगा मीं तर आजवर पाहिला

नव्हता. अत्यंत उच्च घराण्यांतसुद्धां शोभतील असेच त्याचे विचार आहेत. आणि हें बरोबरच आहे. कारण खऱ्या थोरपणाचें स्थान मनांतच असलें पाहिजे. बाह्य गोष्टींवर मनुष्याचा थोरपणा कसा अवलंबून राहाणार ? उच्च मनोभावना, श्रेष्ठ प्रकारचें धैर्य व सर्वांशीं अगत्यानें व आदरानें वागणें यांच्या योगानेंच मनुष्याला चांगुलपणा येतो. हे गुण नसले तर हजारों प्रकारचे नवे नवे विचित्र पोषाख करून आणि बोलण्यांत मोठा शिष्ट-पणाचा आव आणून तो उणेपणा भरून निघेल असा विचार करणें वेडें-पणाचें आहे. तेव्हां अगदीं अंतःकरणापासून मला असें म्हटल्याशिवाय राहावत नाहीं कीं, हा हरी कुळकर्णी जरी धंद्यानें शेतकरी आहे, तरी खऱ्या शालीनतेचें बीज त्याच्या मनांत खास रुजलें आहे. आणि आपल्या बाळाच्या अंगीं आपल्या घराण्यास शोभतील असे गुण आले पाहिजेत असें जरी मला वाटतें, तरी बाळ कोणत्याही गोष्टींत या हरीच्या मागें मुळींच नाहीं असें घडून आलें, तरी मला पराकाष्ठेचा आनंद वाटेल. ''

तात्यासाहेबांनीं याप्रमाणें जेव्हां आपले विचार बोलून दाखविले आणि बाळाला हरीचे गुरुजी जे गोविंदशास्त्री त्यांच्याकडे शिकावयाला पाठ-विण्याचा जेव्हां विचार काढला, तेव्हां राधाबाई कांहीं बोलल्या नाहींत, आणि मोठ्या नाखुषीनें तर खरीच, पण त्यांनीं बाळाला त्यांच्याकडे पाठ-विण्याला आपली संमति दिली ! तेव्हां दुसरे एके दिवशीं कांहीं निमित्त पाहून त्यांनीं गोविंदशास्त्री यांस आपले घरीं भोजनाचें आमंत्रण दिलें; आणि भोजन झाल्यानंतर दिवाणखान्यांत मंडळी पानसुपारी घेत बसली असतां त्यांनीं बाळाच्या शिक्षणाचा विषय त्यांजपुढें काढला. ते म्हणाले:—
" शास्त्रीबोवा, या उपकारांची फेड कितीही पैसे दिले तरी माझ्याच्यानें होणार नाहीं हें मला ठाऊक आहे. हें आमच्या बाळाचें शिक्षण व त्याच्या वर्तणुकींत करावयाची सुधारणा या गोष्टी अशा आहेत कीं, त्यांबद्दल आम-रण मी आपला उपकारी आहें असेंच मला वाटत राहील यांत शंका नाहीं."

यावर गोविंदशास्त्री ह्मणाले:—" माझी हरकत नाहीं, तात्यासाहे येऊं द्या त्याला माझ्याकडे. प्रथम कांहीं दिवस मी त्याला हातीं घेऊ शिकवून पाहतों. नंतर मग जर तुह्मांला मी शिकवितों तें बरें वाटलें, त मग पुढें पुष्कळ दिवस त्याला माझ्या शाळेंत तुम्ही ठेवा व मीही ठेवू शकेन. माझें शिकविणें, माझे विचार व मुलांना वागविण्याची माझी पद्ध ती तुम्हांला कशी काय पसंत पडेल हें मला पहिल्या एक दोन महिन्यां कळेल. पण हें सर्व करावयाला मला एक गोष्ट तुम्हांला सांगावयाची अ व ती अत्यंत आवश्यक आहे. ती ही कीं, मला हें काम मित्र या नात्या करूं द्या; आणि म्हणजेच मला तें करतांना आनंद वाटेल. त्यांत पैशाच संबंध कांहीं येऊं नये. दुसरें असें कीं, फाजील लाडांमुळें ज्या कां चमत्कारिक गोष्टी याच्यां स्वभावांत शिरल्या आहेत, त्या काढून टाक ण्याच्या असल्यामुळें, मी म्हणजे शिकवणीस ठेवलेला एक मास्त आहे असें होऊन उपयोगी नाहीं. त्यानें सर्व दिवस माझ्याकडेच राहि पाहिजे. त्यासाठीं आपण आपल्या कुटुंबाची संमति घेऊन ठेवा. म्हण जरूर ती शिस्त मी त्यास लावीन व मला ती लावतांही येईल."

गोविंदशास्त्र्यांची बाळाला हातीं धरण्याची अशी तयारी पाहून तात्यासा हेबास संतोष वाटला. परंतु ते पैसे मुळींच घेणार नाहीं म्हणाले, त्यांस फार अवघड वाटलें. शिवाय, मुलाला सर्व दिवस त्यांच्याकडे ठेवा वयाचें हें त्याहीपेक्षां अवघड होतें. परंतु गोविंदशास्त्र्यांपुढें आपलें कांहं चालणार नाहीं असें पाहून तूर्त त्यांनीं त्यांचें सर्व म्हणणें मान्य केलें. आणि बाळासाहेबांस एक चांगला मुहूर्त पाहून शास्त्रीबोवांकडे पाठवावयाचें ठरलें दुसऱ्यापासून बाळासाहेब गुरुजीच्याकडे शिकावयास जाऊं लागले.

गोविंदशास्त्री यांची शिक्षणपद्धति इतर सर्वसाधारण शास्त्रीबोवांच्या शिक्षणपद्धतीहून निराळी होती. लिहा वाचावयास शिकवावयाचें, गणित- विशेष शिकवावयाचे; रूपावलि-समासचक्र शिकवावयाचें; रघुवंश व पंचतंत्र

शिकावयाचें; इतकें झालें कीं, शिष्याची विद्या संपली. मग त्याचा गुरुगृहवास संपून तो गृहस्थाश्रम स्वीकारावयास योग्य ठरून परत आपल्या घरीं जावयाचा. इतकी विद्या तयार करून देणें एवढेंच गुरूचें काम, अशी सर्वसाधारण समजूत. त्यांत शिष्याच्या नीतिमत्तेचा विकास करणें, ब्रह्म-चर्याच्या योगें त्याचें शरीर सुदृढ बनविणें, नित्य सूर्यनारायणाचे हजार नमस्कार घालून घेणें, सत्याची आवड उत्पन्न करणें, वगैरे गोष्टी शिकविण्याकडे व करून घेण्याकडे लक्ष देणारे गुरुजी थोडे. मुलांना वारंवार दूरदूरचे प्रदेश पाहावयास आपल्याबरोबर नेणें, ऐतिहासिक व पौराणिक स्थानांची माहिती प्रत्यक्ष तेथें जाऊन त्यांस देणें, सृष्टिसौंदर्याची आवड वाढविणें इत्यादि प्रकार–शिक्षणाला मूलभूत आधार–हे फारसे कोणाच्याच लक्षांत नसतात, आणि शिष्यांना प्रत्यक्ष एकाद्या उद्योगांत गुंतवून त्यांच्यांत उद्योगशीलता दृढ करणें हें तर कोणीच मनांत आणीत नाहींत. परंतु इतक्या सर्व गोष्टींचा समावेश गोविंदशास्त्री यांच्या शिक्षणपद्धतींत झालेला होता. नित्य थंड पाण्याचें स्नान, संध्या, नमस्कार हें त्यांचें व त्यांच्या शिष्यांचें नेहमीं सकाळीं सहा वाजेपर्यंत नेमानें आवरावयाचें. नंतर ही मंडळी त्यांच्या घरालगत असलेल्या शंकराच्या देवालयांत जावयाची. तेथें पुष्कळ फुलझाडें गोविंदशास्त्री यांनीं स्वत: होऊन लाविलीं होतीं. त्यांना तो एक नादच होता. दररोज पुष्कळ वेळ ते त्या बागेची मेहनतमशागत करीत. त्यांचे शिष्यही त्यायोगें या गोष्टी मोठ्या हौसेनें करीत. त्यामुळें त्या फुलझाडांच्या संगतीचा त्या मुलांच्या कोंवळ्या मनांवर फारच उत्कृष्ट परिणाम होई. त्यांची अशी ही दीनचर्या पाहून व त्यांचें उत्कृष्ट आचरण पाहून त्यांच्या शिष्यांच्या मनांत त्यांजविषयीं फारच आदर उत्पन्न होई. त्यांचा शिष्यगण हें त्यांच्या आंगच्या उत्कृष्ट गुणांचें एक द्योतकच होतें.

---

# ६ देवालयांतील बाग.

असो. तात्यासाहेबांचा मुलगा बाळ हा शास्त्रीबोवांकडे येऊं लागल्यापासून दुसऱ्याच दिवशीं शास्त्रीबोवा नित्याप्रमाणें सकाळीं उठून स्नान-संध्या, नमस्कार व जप इ० आटोपून आपल्या शिष्यांसह देवालयांत गेले. या सर्व नित्यक्रमास आज बाळ अगदीं नवीन होता; त्यामुळें त्यास गोविंदशास्त्र्यांनीं आजच कडक शिस्तीचें बंधन घातलें नव्हतें; आणि अमुक एक गोष्ट अमुक मुलानें करावीच करावी, अशी आज्ञा ते कधींच करीत नसत. सांगून उपदेशानें व पाहून उदाहरणानें आपल्या मुलांनीं आपल्या बोधाचें व नीतीचें आकलन व आचरण करावें अशी त्यांची अपेक्षा असे; व तीप्रमाणें त्यांस त्यांच्या गोष्टी प्राय: सर्व साधत असत. त्यामुळें प्रातःकाळीं स्नान, संध्या, नमस्कार यांत बाळाला आज इच्छेनुसार वर्तण्याचें स्वातंत्र्य होतें. संगतीला हरी होताच. त्यामुळें ते सर्वच विधि त्यानें बहुतेक बऱ्या प्रकारें पार पाडले. आतां ही सर्व मंडळी देवालयांत आली होती. आपला पूजाविधि आटोपल्यानंतर गोविंदशास्त्र्यांनीं बागेंत नवीन कांहीं फुलझाडें लावण्यासाठीं वाफे खणण्यास आरंभ केला. हरीनें एक फावडें घेतलें व त्यानें तो माती भरूं लागला. खणतांना शास्त्रीबोवा बाळाकडे पाहून म्हणाले:—" बाळ, ज्याला ज्याला म्हणून भूक लागते, ज्याला ज्याला अन्नाची गरज आहे, त्या प्रत्येकानें दररोज कांहीं ना कांहींतरी काम केलेंच पाहिजे. या नियमास अनुसरून मीं आणि हरीनें हीं कामें रोजचीं आपणांकडे वाटून घेतलीं आहेत व आह्मी असे रोज या बागेंत खपत असतों. जितकें काम खूप करावें तितकें जेवण गोड लागतें. त्यामुळें जर तुझ्या मनांत असलें, तर तूंहि आमच्याबरोबर कामास ये; मी तुला एक थोडी जागा आंखून देतों; तेथें तूं फुलझाडें, फळझाडें लाव; मग पुढें त्यांना येणारीं सारीं फुलें फळें तुझींच आहेत. तीं तुजपासून

आम्ही कोणी कधींही मागणार नाहीं. ''

पण, हें भाषण आमच्या श्रीमंत बाळासाहेबांस आवडलें नाहीं. ते निर्भीडपणानें म्हणाले--'' गुरुजी, मला नाहीं हें असलें काम आवडत! आम्ही इनामदारांचीं मुलें; असलें माळ्याचें काम आम्हीं कसें करावें ! ''

गुरुजी म्हणाले,—'' बरें, जशी तुझी मर्जी. पण, मी आणि हरी हे कांहीं तात्यासाहेबांच्या सारखे कांहीं मोठे इनामदार नाहीं. आम्हीं आपल्या कामांत आळस करून कसें चालेल ?''

इतकें होत आहे तों १० वाजावयाची वेळ झाली. तों सुट्टीची वेळ झाली असें गुरुजींनीं हरीस सांगितलें व त्याला वेऊन ते देवालयांतच दुसऱ्या बाजूस असलेल्या एका ओवरींत गेले. तेथें दोन गाई व एक म्हैस शास्त्रीबोवांची बांधलेली असे. इतका वेळपर्यंत दुसऱ्या विद्यार्थ्यांनीं हा गोठा झाडून स्वच्छ करून, गुरांस वैरण घालून, धारा काढून ठेविल्या होत्या. आतां सर्वांची दुग्धपानाची वेळ झाली होती. शास्त्रीबोवा आणि हरी आल्याबरोबर सर्वांना क्रमाक्रमानें एकेक पेला तें धारोष्ण दूध पिण्यास देण्यांत आलें. सर्वांबरोबर आपणासही दूध मिळेल असें बाळासाहेबांना साहजिकच वाटलें, पण त्यांची आशा व्यर्थ गेली. कोणींच त्यांजकडे पाहिलें नाहीं व कांहीं विचारपूसही केली नाहीं.: त्याबरोबर बाळाला एकदम हुंदका आला. पण करणार काय ? सांगणार कोणाला ? तो आंतल्या आंत स्फुंदस्फुंदून रडूं लागला !

गुरुजींनीं तें पाहिलें, व त्यांनीं शांतपणानें त्यास पुसलें:—'' बाळ, काय झालें तुला ? कोठें कांहीं लागलें कीं काय ? '' पण बाळ काय बोलणार ? त्याला अधिकच वाईट वाटून त्याचे हुंदके वाढले. गुरुजी म्हणाले:—'' बाळ, तुला जर सांगावयाचें नसलें, तर आमची कांहीं हरकत नाहीं बरें ! कोणाला नसलें बोलायचें, तर त्यानें बोललेंच पाहिजे असा कांहीं येथें कोणाचा कोणावर जोरा नाहीं. ''

याप्रमाणें शास्त्रीबोवांनीं पुनः खोंचून भाषण करितांच बाळाला खूपच वाईट वाटलें, आणि गुरुजींचा त्यास रागही आला. मग तो तेथें तसाच उभा न राहतां तेथून निघून एकटाच बागेंत आला; आणि एका फुलझाडापाशीं रडत उभा राहिला. पण तेथें आतां त्याचे नानाप्रकारें आर्जव करून त्याची समजूत घालावयाला तात्यासाहेबही नव्हते व राधाबाईही नव्हत्या. तेव्हां आतां आपल्याला कोणी विचारणार नाहीं व येथें आपल्या रुसण्यारडण्याची कोणासच परवा नाहीं, हें बाळासाहेबांच्या लौकरच लक्षांत आलें. मग थोड्या वेळानें त्यांचें रडूं आवरत आलें. पण हरीच्या कोंवळ्या अंतःकरणाला बाळाचें तें रडणें पाहवलें नाहीं. त्यानें गुरुजींस विचारिलें:—"गुरुजी, मी आपले पेल्यांतील थोडेंसें दूध बाळाला देऊं का? त्याला टाकून मला एकट्यास तें घेववत नाहीं."

गुरुजी:—"हरी, वास्तविक आज बाळास दूध न मिळणेंच बरें. आतां लौकरच आपण जेवावयास जाऊं, तेव्हां तो जेवेल. पण तुझ्या मनांत असलेंच, तर तूं त्यास आपलें दूध दिलेंस तर माझी हरकत नाहीं. तें दूध तुझें आहे; त्याचें तूं हवें तें कर."

इतकी परवानगी मिळतांच हरीनें आपलें सर्व दूध बागेंत जेथें बाळ उभा होता तेथें त्यास नेऊन दिलें. याप्रमाणें सर्वांचें दुग्धपान आवरलें. मग हरीनें गुरुजींस म्हटलें:—"गुरुजी, काल तुम्ही म्हणालां होतां ना, कीं उद्यां सकाळीं मी तुला एक पुस्तक वाचावयास देणार आहें? तर तें पुस्तक आतां मला वाचावयास देतां? त्यांत ती 'मुंग्या आणि माशा' म्हणून एक सुरेख गोष्ट आहे ना?"

असें हरीनें विचारल्यावर शास्त्रीबोवांनीं एक छोटेंसें पुस्तक आपल्या दसरांतून काढलें, व त्यांतून ती गोष्ट काढून तें हरीच्या हातीं देऊन वाचावयास सांगितलें. इतर मुलांबरोबर बाळही एका अंगास येऊन ती गोष्ट ऐकावयास बसला. गुरुजी हरीस म्हणाले:—"वाच; पण ध्यानांत

आहे ना ? वाचन वाचावयाचें तें सावकाश आणि स्पष्ट वाचावें, घाई करूं नये; व शब्दांचे उच्चार अगदीं बरोबर करावे. आणि वाचतांना तुला त्यांचा अर्थ कळतो आहे असें ऐकणारास वाटलें पाहिजे. समजलास ? ”

हरीनें हो म्हणून वाचावयास आरंभ केला.

---

# ७ मुंग्या आणि माशा.

एका गृहस्थाच्या शेतामध्यें एका कोपऱ्यांत एक मुंग्यांचें वारूळ होतें. उन्हाळ्याचे दिवस आले म्हणजे त्या मुंग्या धान्याचे कण सर्व शेतांतून गोळा करण्यांत आणि ते त्या वारुळांत नेऊन सांठविण्यांत सारख्या गुंतलेल्या असत. त्याच वारुळापासून थोड्याच अंतरावर एक फुलांचा ताटवा होता. त्याजवर एक मोठा माशांचा थवाच्या थवा नेहमीं बसलेला असे. त्यांनीं घों घों करून इकडून तिकडे भटकावें, हा त्यांचा सारा उद्योग. त्या गृहस्थाचा मुलगा वारंवार तिकडे येई; त्या वेळीं त्यास हा सर्व प्रकार आढळे. तेव्हां तो आपल्या पोरपणास अनुसरून एकदां त्या मुंग्यांकडे पाहून म्हणाला:—— “ खरोखर या मुंग्यांइतके मूर्ख प्राणी दुसरे कोणतेही नसतील ! सारा दिवस या आपल्या खपताहेत, मेहनत करताहेत ! चांगली हवा कशी सुरेख पडली आहे; यांत हिंडावें, फिरावें, खेळावें व आपल्या जिवाला सुख लावावें तें कांहींच नाहीं ! पण या माशा पहा कशा इकडून तिकडे सारख्या उडत आहेत त्या ! जगांत यांच्याइतके सुखी प्राणी कोणीसुद्धां नसतील. ”

यानंतर कांहीं दिवस गेले. पावसाळा सुरू झाला. हवेंत गारठा खूप पडूं लागला. सूर्याचें ऊन कोठेंच केव्हां दिसेनासें झालें; आणि धुक्याचाही प्रभाव थोडाफार दिसूं लागला. तेव्हां तो मुलगा पूर्वींप्रमाणें एके दिवशीं आपल्या बापाबरोबर शेतांत आला; तों मुंगी एकही कोठें दिसत नसून,

माशा जेवढ्या होत्या तेवढ्या साऱ्या बहुतेक तेथें मरून जमीनीवर पडलेल्या त्याच्या दृष्टीस पडल्या. त्याबरोबर त्याच्या कोंवळया मनाला वाईट वाटलें; व तो बापाला म्हणाला:--" बाबा, येथें पुष्कळ मुंग्या रोज दिसत असत, त्या काय झाल्या हो आतां ! "

बाप म्हणाला:--" बाळ, पुढें असा काळ येणार आहे हें ओळखून त्या मुंग्यांनीं सर्व उन्हाळाभर खपून आपली पावसाळ्याची तजवीज करण्याकरितां पुष्कळ धान्य गोळा करून आपल्या वारुळांत सांठवून ठेविलें; व आतां त्या तेथें, आपल्या वारुळांत अगदीं स्वस्थ आहेत. पण या माशा सर्व कशा मरून पडल्या आहेत पहा ! कारण, त्यांना काम करावयाला नको; आपल्याच पोटाची तरतूद करण्यासाठीं जीवाला एवढे सुद्धां कष्ट द्यायला नकोत; आणि रिकामें भटकावयास हवें. त्याचें असेंच फळ यावयाचें. आतां त्या मुंग्या पहा, पुन: पूर्ववत् आकाश निवळलें व हवा स्वच्छ झाली कीं, येथें तुला आनंदानें फिरतांना दिसूं लागतील. "

---

## ८ ओढ्याच्या कांठीं

गोष्ट वाचून होतांच शास्त्रीबुवा ह्मणाले:-" पुरे हरी. चांगलें वाचलेंस. आतां पुस्तक ठेव. आपण आतां क्षणभर देवालयाच्या मागें ओढ्याकांठीं थोडें फिरून येऊं. " असें म्हणून ते निघाले व ओढ्याकांठीं व शेतांतून इकडून तिकडे बरेच भटकले. फिरतां फिरतां कित्येक नव्या नव्या वनस्पतींची त्यांनीं हरीस ओळख करून दिली. त्यांचीं नांवें सांगून, प्रसंगीं त्यांचे काय उपयोग करून घेतां येतात तें सांगितलें. ते त्यांचे उपयोग ऐकून हरीस मोठें नवल वाटलें, व आनंदही वाटला. शेवटीं एका कुंपणावर हरीनें एक वेल पाहिला. त्यावर पुष्कळ लहान लहान फळें लागलेलीं होतीं. त्यानें त्यांतलीं पांच चार तोडून घेतलीं व शास्त्रीबुवांकडे तीं घेऊन येऊन, त्यांस

तीं दाखवून तो म्हणालाः—

" गुरुजी, हें काय फळ आहे हो ! हें आपण खावें कां ? "

गुरुजी म्हणालेः— " विचारलेंस हें मोठें सुरेख केलेंस, हरी. विचारावयाच्या आधीं खाऊन नाहीं पाहिलेंस ! कारण जर तूं हें तोंडांत टाकलें असतेंस, तर लागलीच तुला उमळून पडलें असतें आणि तुझें डोकें मनस्वी दुखूं लागलें असतें. आणि कदाचित् आणखीही कांहीं झालें असतें. कारण हीं एका विषारी वेलाचीं फळें आहेत. याचें नांव ' महादेव फळ ' असें आहे. तूं याचें बीं काढून पहा. त्यावर दोहों अंगास शिवाची पिंडी असलेली हुबेहुब तुला दिसेल. त्यावरून त्यास हें नांव पडलें आहे.

तेव्हां हरीनें त्या फळांतील बीं काढून पाहिलें; तों त्यावर हुबेहूब पिंडीचा आकार व शाळुंका वगैरे पाहून त्यास मोठाच चमत्कार वाटला ! मग आपल्या सोबत्यांस तो सर्व प्रकार सांगावा, व देवाचें चातुर्य केवढें बिलक्षण आहे व हें त्यांस दाखवावें, म्हणून त्यांतलीं ५।४ फळें त्यानें आपले खिशांत घेऊन ठेवलीं. नंतर तो म्हणाला—

" गुरुजी, कधीं कोणताही जिन्नस, तो काय आहे हें ओळखल्याशिवाय मी खातच नाहीं. आतां तुम्ही जर अशा सर्व वनस्पतींचीं नांवें व त्यांचे गुणधर्म मला सांगाल, तर ते मी सारे चांगले लक्षांत ठेवीन. "

गुरुजीः— " पण सध्यां इतकेंच पुरे. जेवावयास उशीर होईल. "

यानंतर ते घराकडे निघाले. येतांना वाटेंत एक मोठा बोका राघूच्या एका लहानशा पिल्लावर धावून झडप घालतांना हरीनें पाहिला. त्याबरोबर त्यानें तत्काळ त्याच्या मागोमाग धाव घेतली व खूप चपळाई करून त्या बोक्याच्या पाठीवर एक सोटा लगावला ! त्यासरशीं तो बोका भिऊन पळाला. त्या वेळीं तें राघूचें पिल्लूं त्याच्या हातून निसटलें व तें तेथेंच तसें घायाळ होऊन, मान टाकून, जमिनीवर निपाचित पडलेलें त्यास दिसून आलें. तेव्हां त्या मांजराचा पाठलाग करण्याचें सोडून हरी त्या पिल्लाजवळच

थांबला. त्याला जखम चांगलीच झाली होती, व तीतून तें जगेल कीं नाहीं याची शंकाच होती. तरी त्यास उचलून आपले घरीं न्यावें, असें हरीच्या मनांत आलें. गुरुजी जवळ होतेच. त्यांस हरी म्हणाला–" गुरुजी, पाहिलें का हें राघूचें पिलूं, त्या बोक्यानें याला कसें घायाळ केलें आहे तें ! त्याच्या अंगांतून रक्त निघालें आहे, व त्यानें आपली मान अगदीं टाकिली आहे. गुरुजी, हें मीं घरीं नेलें तर जगेल का हो ? माझ्या मनांत आहे कीं, यास घरीं नेऊन खाऊं पिऊं घालावें; थोडीशी डाळ व एकादा पेरू हीं त्याला दिलीं तर चार दिवसांनीं हें बरें होईल व मग तें उडावयाला लागून स्वतःच आपलें भक्ष्य मिळवूं लागेल. "

गुरुजींनीं हरीस रुकार दिला, व हरी त्यास घेऊन आपले घरीं आला. घरीं येतांच त्यानें प्रथम तें राघूचें पिलूं ठेवण्यासाठीं घरांतलि एक जुना पिंजरा हुडकून काढला. नंतर तो धुवून चांगला स्वच्छ केला व त्यांत तें पिलूं ठेवून त्यास डाळ व दुसरे कांहीं खावयाचे जिन्नस एका वाटींत ठेवून, तें पिलूं ते जिन्नस आतां खाईल, मग खाईल, म्हणून तो त्याजकडे पहात राहिला. बऱ्याच वेळानें तें जरा हालचाल करतांना दिसूं लागलें. त्यानंतर त्यानें एक डाळीचा दाणा चोचीनें उचलून घेतला व तो अर्धवट खाऊन पुन्हा टाकून दिला. इतकें पाहून हरीस थोडेंसें समाधान वाटलें. मग तो तेथून उठून जेवण्यासाठीं घरांत गेला.

---

## ९ गुरुजींची पंगत.

तोंच हरीस गुरुजींचे घरीं जेवावयास बोलावणें आलें. बाळ व तूं यांची आज एक पंगत आमच्या घरीं व्हावयाची आहे, असा गुरुजींचा निरोप होता. तो ऐकून हरी लागलीच आपली सदरा–टोपी घालून गुरुजींकडे निघाला. गुरुजींच्याकडे जेवणाची तयारीच होती. भातभाकरीचा रोजचा

साधाच बेत होता. हरी येतांच सर्वजण पाय धुवून सोवळें नेसावयास लागले. आपल्यास कोणी तरी ऊठ म्हणेल, पाय धुवावयास पाणी पुढें आणून देईल, हातांत कद घेऊन कोणी पुढें असेल, असें बाळाच्या मनांत प्रथम आलें. पण दुसऱ्याच क्षणीं ती कल्पना व्यर्थ आहे असें त्यास कळून चुकलें. मग पोटांत मनस्वी भूक लागली असल्यामुळें बाळ मुकाट्यानें उठला व पाय धुवून, सोवळें नेसून, एका पाटाजवळ येऊन बिचकत बिचकत उभा राहिला. इतक्या मिनतवारीनें जेवणास बसण्याचा बाळाचा हा अगदीं पहिला व नवा प्रसंग होता. आणि मूल कितीही लाडकें असलें तरी त्याचा सर्व हट्ट आईबापांच्या समोर. पण त्यांजपासून निघून तें एकदा दुसऱ्याच्या ताब्यांत आलें, म्हणजे गोगलगायीसारखें गरीब होतें. तेव्हां मुलाच्या हट्टाचें कारण मुलाचा दोष हें नसून आई-बापांचा फाजील लाड हेंच मुख्यतः असतें. बाळ इतका हट्टी, इतका चिडखोर, इतका मानी, पण गोविंदशास्त्र्यांच्या शाळेंत येऊं लागल्यापासून चारच दिवसांत त्याच्यांत किती तरी बदल झालेला दिसूं लागला. अगदीं भीत भीत पाटाच्या जवळ उभे असलेल्या बाळासाहेबांस पाहून शास्त्रीबोवा नेहमींच्या वृत्तीस अनुसरून म्हणाले, “ बाळ, हा पाट तुझा नाहीं. तुम्ही थोर इनामदार, तुम्हांला कामें करावयाचीं म्हणजे फार हलकेपणा वाटतो. पण मग आम्ही गरीब लोक, आम्ही तरी तुमचेसाठीं पाट वगैरे कां मांडून ठेवावे ! लोकांसाठीं कष्ट करावयाचें आम्हांस मुळींच आवडत नाहीं. तेथें तिकडे त्या पानाला पाट नाहीं, तेथें जमिनीवर तुम्ही बसा बरें !”

त्याबरोबर बाळाला खूप वाईट वाटलें. तो मुळुमुळु रडत तेथून मागें सरून एका कोपऱ्यांत जाऊन बसला. त्यास प्रथमतः राग आला, पण पुनः आपल्या हट्टाला येथें कोणी जुमानीत नाहीं असें पाहून त्यास फार वाईट वाटलें. पण बिचारा करणार काय ? तात्यासाहेबांनीं आपणास हे कोठले गुरुजी हुडकून काढले असें त्यास वाटलें. आणि तात्यासाहेबांच्या

मनाविरुद्ध जर आपण आईकडे तक्रार करावयास गेलों, तर ती तरी आतां आपला कैवार घेईल काय ?–कीं, तात्यासाहेबांपुढें या बाबतींत आपलें कांहीं चालणार नाहीं म्हणून गप्प बसेल ? याचाही त्याला संशय होता. त्यामुळें त्याचा सर्वतोपरी निरुपाय होऊन गुरुजींला सर्वथा शरण जाण्याची पाळी त्याजवर आली. पण हा सर्व प्रकार हरीच्यानें पाहावला नाहीं. आपल्या सोबत्याचा होत असलेला तो मानभंग त्याला त्याच्या इतकाच लागून राहिला. मग तो गुरुजींस म्हणाला:—“ गुरुजी, माझा पाट मी बाळास देऊं का ? त्याला रोजची पाटाची संवय आहे; व मला पाट नसलेलाच बरा वाटतो. ”

गुरुजी म्हणाले:—“ तें तूं काय हवें तें कर; माझी हरकत नाहीं. ”

त्याबरोबर हरीनें आपला पाट उचलून बाळाच्या पानाला मांडला व बाळाला कोंपऱ्यांतून हात धरून उठवून प्रेमानें पाटावर आणून बसविलें. बाळ पानावर बसला, व सर्वांचें जेवण सुरू झालें.

जेवतां जेवतां शास्त्रीबुवा म्हणाले:—“ इनामदार लोकांना स्वत:चीं कामें स्वतः करण्यांत हलकेपणा वाटतो; पण दुसऱ्या लोकांनीं पाट मांडावा व त्यावर आपण खुशाल बसून भोजन करावें, यांत त्यांना हलकेपणा वाटत नाहीं. नाहीं रे हरी ? ”

या खोचक भाषणानें बाळ तर मेल्याहून मेला झाला. पण मात्रा लागू पडली. जेवण कसें बसें त्यानें संपविलें; आणि पुन: काम करावयाची वेळ येते केव्हां, व हरीप्रमाणें आपणही काम करून गुरुजींपासून शाबासकी मिळवूं केव्हां, असें त्यास होऊन गेलें.

दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें सर्व प्रातःकालीन विधि उरकल्यानंतर सर्व मंडळी महादेवाच्या देवालयांत गेली व बागेंतील आपापलीं कामें करूं लागलीं. गुरुजींनीं हातीं कुदळ घेतली, हरीनें खोरें घेतलें; व वाफे तयार करण्यासाठीं माती उकरण्याचें व बाजूस काढण्याचें काम सुरू झालें.

तेव्हां बाळानें गुरुजींस म्हटलें—

"गुरुजी, मला एक फावडें देतां ? मीही थोडेंसें काम करतों."

त्याबरोबर गुरुजींनीं जवळच असलेली एक कुदळ त्यास घेण्यास ांगितलें; व ती घेऊन बाळ आपला वाफा तयार करावयास निघाला. ।थम त्यास ती कुदळ नीट धरतां येईना; त्यामुळें आरंभीं आरंभीं माती :करण्याच्या ऐवजीं २।३ वेळ कुदळ त्याच्या पायासच लागली. तेव्ह ुरुजींच्या सांगण्यावरून हरीनें त्याजकडे जाऊन कुदळ नीट कशी धरावी कशी मारावी हें त्यास दाखवून दिलें. त्याबरोबर तें त्याच्या लक्षांत ऊन, मग तो मोठ्या उमेदीनें आपलें काम करूं लागला.

नित्याप्रमाणें लौकरच सर्वांची दुग्धपानाची वेळ झाली. त्याबरोबर ाळाला दूध पिण्याकारितां एक मुलगा बोलावणें आला. मग बाळानें र्वांबरोबर दूध घेतलें. अर्थात् या वेळीं तें त्यास इतकें पराकाष्ठेचें मधुर ागलें कीं, असलें दूध आपणांस पूर्वीं कधींच मिळालें नाहीं, असें त्यास ाटलें! व त्याचें कारण उघडच होतें. आज त्यास बरेच श्रम झाले अस-यामुळें, आज जशी खरी भूक त्यास लागली होती, तसली भूक त्यास र्वीं कित्येक दिवसांत ठाऊक नव्हती.

दूध पिणें झाल्यावर हरीनें एक पुस्तक काढलें व तो बाळास म्हणाला— 'बाळ, तूं यांतली एक गोष्ट वाचतोस ?"

बाळ ह्मणाला—"मला वाचावयाला येत नाहीं रे!" पण असें उत्तर ण्याचा प्रसंग आल्याबद्दल त्याच्या मनाला बरेंच वाईट वाटलें.

गुरुजी म्हणाले—"बाळ, या वाचनांत केवढा तरी आनंद असतो. ो तुला मिळवितां येत नाहीं, याचें मला वाईट वाटतें. असो, सध्यां तुला री वाचून दाखवील."

त्याबरोबर हरीनें पुस्तक उघडलें व तो पुढील गोष्ट वाचूं लागला.

———

# १० एक श्रीमंत मनुष्य.

या पृथ्वीच्या पृष्ठभागावर येथून पुष्कळ दूर असा एक देश आहे. तेथें एके गांवीं एक श्रीमान गृहस्थ राहात होता. तो आपला सारा दिवस खाण्यापिण्यांत किंवा गप्पागोष्टी करण्यांत घालवी; नाहींतर बिछाना पसरून लोळे. श्रीमंती असल्यामुळें पुष्कळ नोकरचाकर त्याच्या घरीं असत. ते त्याच्या दिमतीस सारखे पुढें उभे असत. त्यामुळें त्याच्या स्वभावास गर्विष्ठपणाचें, उद्दामपणाचें व तब्बेतखोरपणाचें फार वळण लागलें होतें. तसेंच त्याच्या मर्जीविरुद्ध बोललेलें त्यास खपत नसल्यामुळें, जो तो त्याच्या मनाचा कल जसा असेल तसें त्याशीं बोले; त्यामुळें त्यास कोणत्याही गोष्टीसंबंधीं खरा प्रकार कळावयास मार्ग नसे. श्रीमंतीच्या गर्वामुळें, साऱ्या जगावर माझी सत्ता चालली पाहिजे असें त्यास वाटे; आणि गरीब लोकांबद्दल तर तो नेहमीं असे समजे कीं, माझी आज्ञा ऐकण्याकरितांच तर त्यांचा जन्म आहे!

त्याच्याच घरालगत दुसरीकडे गरीब, प्रामाणिक व उद्योगी असा एक माणूस राहात होता. तो बुरुडाचा धंदा करीत असे. तो जवळच्या रानांतून लव्हाळें कापून आणी, आणि त्याच्या टोपल्या विणून, त्या विकून आपला चारितार्थ चालवी. त्याला दररोज सकाळपासून संध्याकाळपर्यंत काम करावें लागे. आणि इतकें असूनही त्यास मीठ आणि भाकरी काय ती पोटास मिळे; सणावारास भात, म्हणजे झालें. आणि रात्रीं निजावयास आंथरूण म्हणून त्यानें टोपल्या तयार करण्याकरितां जें लव्हाळें पसरून ठेवलेलें असे तें; किंबहुना नुसती जमीन! तीवर पडून त्यानें रात्र घालवावयाची. तथापि तो नेहमीं आनंदी व समाधानी असे. याचें कारण दिवसभर श्रम करावे लागत असल्यामुळें त्यास अर्थात्‌च रोज भूक अशी सुरेख लागे कीं, त्याची कोरडी भाकर हीच त्यास सुंदर पक्वान्नासारखी

लागे; व रात्रीं आंग टाकावयाचा अवकाश, कीं लागलीच झोंप तयार! शिवाय तो स्वभावानेंहि चांगला असून गुणीहि होता. तो प्रामाणिकपणानें आपला व्यवहार चालवी व कधीं खोटें म्हणून करीत किंवा बोलत नसे. त्याच्या या गुणांमुळें त्याच्या आळींतील सर्व लोक त्यास भला समजत व त्यावर फार प्रेम करीत.

पण त्या श्रीमंत गृहस्थाची स्थिति याच्या उलट होती. त्याला निजावयास उत्तम मऊ छानदार बिछाने होते, पण त्या मऊ बिछान्यांवरही त्यास सुखाची झोप कधीं लागत नसे. कारण सारा दिवस तो अगदीं एवढीशीही मेहनत न करितां आळसांत घालवी. आणि त्याच एका गोष्टीमुळें, त्याला जेवावयास जरी उत्तम उत्तम पक्वान्नें असत, तरी त्यास तीं पचपचित वाटत! कारण त्यास मुळीं भूकच कशी ती लागत नसे. सदा घरांत बसून राहिल्यामुळें त्याला उघड्या हवेंत फिरण्याचाही लाभ मिळत नसे. शिवाय जो मुलखाचा आळशी, आणि जिव्हेचा इतका अधीन, तो या नाहीं त्या रोगानें सदोदित आजारी असावयाचा, हें ठरलेलेंच. आणखी जो कधीं कोणाच्या उपयोगी पडावयाचा नाहीं, त्यास मित्र तरी मग कोण असणार! त्यामुळें त्या श्रीमंत गृहस्थाचे नोकर चाकरसुद्धां त्याच्या पश्चात् त्याची खूप निंदा करीत; आणि त्याच्या शेजारच्या सर्व लोकांनाही त्याचा तिरस्कार वाटे. या प्रकारामुळें तो सदोदित खिन्न, घुमा, चिडखोर व असमाधानी असा बनून गेला, आणि आपणाहून कोणी सुखी माणूस दिसला कीं त्याचा तो द्वेष करूं लागला. या प्रकारें तो वरील गरीब बिचारा कष्टाळू बुरूड त्याच्या द्वेषाच्या तावडींत सांपडला. गाडींत बसून जेव्हां जेव्हां हा बाहेर पडे, तेव्हां तेव्हां तो आपल्या दारांत बसून हातानें एकीकडे टोपल्या विणीत व तोंडानें सुरेख गाणीं गात असलेला त्यास दिसे. तें दृश्य वारंवार डोळ्यांपुढें येऊन त्याला त्या बुरुडाच्या सुखाचा हेवा वाटूं लागला. तो ह्मणाला-" हा काय चमत्कार आहे? हा

यःकश्चित् भिकारडा माणूस; कुठल्या भिकार जातीचा; कोठलें तरी लव्हाळें वगैरे आणून या भिकार पाट्या विणावयाचा याचा हलकट धंदा; आणि हा मात्र नेहमीं मोठ्या मजेंत व आनंदांत! आणि मी एवढा मोठा श्रीमंत, कित्येक नोकर चाकर माझ्या पदरीं; आणि मी आपला असा सदोदित उदास आणि खिन्न! देवाचा किती खोटा न्याय हा!"

हा विचार त्याच्या मनांत वारंवार घोळूं लागला. शेवटीं तर तो इतका दृढ झाला कीं, तो त्या गरीब कष्टाळू माणसाचा पूर्ण द्वेषी बनला! आपलें मन आवरून धरावयाचें, निदान एखाद्या अन्यायाच्या मार्गावरून तरी त्यास परावृत्त करावयाचें, हें अर्थातच त्यास कधीं ठाऊक नसल्यामुळें शेवटीं त्यानें मूर्खपणानें त्या गरीब बिचाऱ्याचा सूड उगवण्याचाच निश्चय केला! अपराध काय, तर त्यानें माझ्यापेक्षां आनंदांत कां असावें, हा! याप्रमाणें हा दुष्ट बेत त्यानें मनांत ठरवून एके दिवशीं एकदोघां नोकरांस बोलावून सांगितलें कीं, "त्या बुरुडाच्या झोपडीभोंवतीं जें लव्हाळें, बांबू वगैरे पसरून, उभे करून ठेविले आहेत, त्यांस आज रात्रीं १२ वाजतां चांगली आग लावून द्या!" त्या नोकरांस हें काम करणें अर्थातच फार अयोग्य वाटलें. पण बिचारे पोटाचे मिंधे झाले असल्यामुळें त्यांना त्याचें म्हणणें मान्य करावें लागलें. नाहीं म्हणावें, तर हा लागलीच आपणाला हांकून देईल, मग आपण खावें काय? अशा भीतीनें त्यांनीं तो दुष्ट उद्योग आपल्या मालकाच्या संतोषासाठीं पार पाडला. ते दिवस पडले उन्हाळ्याचे. त्यामुळें ती आग लागलीच भडकली व त्यांत त्या बिचाऱ्याच्या झोंपडीची राखरांगोळी झाली! तो स्वतः मात्र उघडा बोडका झोंपेंतून जागा होऊन बाहेर धावत आला, व म्हणून कसा तरी बचावला!

आतां त्या बिचाऱ्यास किती दुःख झालें असेल याची कल्पना करा बरें! आपल्या घराजवळ राहाणाऱ्या आपल्या एका थोर व श्रीमंत शेजाऱ्यानें, केवळ आपल्या श्रीमंतीच्या जोरावर, त्याचा आपण कांहींही

अपराध केला नसतां, आपला घात करावा, याचें त्याला किती म्हणून दुःख झालें ! पण काय करितो बिचारा ! त्याच्या या आगळिकीबद्दल त्यास कांहीं शासन करण्याची याला अगदींच शक्यता नव्हती. शेवटीं त्यानें शहरच्या न्यायाधीशाकडे जाऊन झालेली सर्व हकीगत रडत रडत त्यास सांगितली. तो न्यायाधीश एक भला व न्यायी माणूस होता. त्यानें ताबडतोब त्या श्रीमंत माणसास आपल्याकडे घेऊन येण्यास माणसें पाठविलीं व तो येतांच त्यास प्रश्न केला-- " काय रे, तूं याची झोपडी काल रात्रीं आग लावून जाळलीस, हें खरें काय ? "

तो श्रीमंत म्हणाला-- " होय महाराज. पण ती उगीच नाहीं; त्यास कारण आहे. हा आपल्या दारांत बसून रोज आनंदानें गाणीं गात असतो. आणि आह्मी थोर लोक आनंदांत आहों कीं काळजींत आहों, याची मुळींच पर्वा न करितां नेहमीं मजेंत व आनंदांत राहतो. म्हणून रागावून जाऊन मीं याचे झोपडीस आग लावून दिली ! "

तें ऐकून न्यायाधीश त्या बुरुडास म्हणाला- " हा गृहस्थ, मी कोणी मोठा मनुष्य आहें अशा समजुतीनें गर्वानें फुगून गेला आहे. आणि यानें गरीब लोकांच्या संबंधानें निष्कारण तिरस्कार धरून हा धडधडीत अन्याय केला आहे ! तर, याची लोकांना काय किंमत आहे, म्हणजे हा असला प्राणी लोकांच्या दृष्टीनें किती तुच्छ आहे, हें याला मला समजावून दिलें पाहिजे. त्यासाठीं मी एक उत्तम योजना करणार आहें. पण त्याला तुझी सहायता पाहिजे. तुम्हां दोघांना मी कांहीं एका ठिकाणीं पाठवून द्यावयाचें ठरविलें आहे. तूं जाण्यास तयार आहेस काय ? "

त्यावर तो बुरुड म्हणाला:--" महाराज ! माझी गरिबाची झोपडी ती काय एवढीशी; व तींत असणार काय असा मोठा माल ? पण त्या लव्हाळ्याच्या चार काड्या सुद्धां आतां मजजवळ राहिल्या नाहींत; व आतां बारा वाजतां भूक लागल्याबर खायला मला एक भाकरीचा तुकडा

देखील मिळणार नाहीं. तेव्हां महाराज जिकडे पाठवितील तिकडे जाण्यास मी सहजच तयार आहें. आतां, या गृहस्थाला परत अपकार करण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. तथापि याला माणुसकी म्हणजे काय हें शिकविण्याचा प्रसंग कोणी आणल्यास त्यास सहायता करण्यास मी आनंदानें तयार आहें. कारण, तसें झालें तर पुढें आणखी कोणा एखाद्या गरीबास याच्याकडून व्हावयाची पीडा तरी टळेल. ''

इतकें झाल्यावर त्या न्यायाधीशानें त्या दोघांस समुद्रामधील एका दूरच्या बेटास नेऊन सोडण्याचा हुकुम केला. त्या बेटांत रानटी व आडदांड लोकांची बस्ती होती. रानांत शिकारी करावयाच्या किंवा समुद्रांत मासे धरावयाचे, हा त्यांचा निर्वाहाचा उद्योग. त्या ठिकाणीं या दोघांस नेऊन सोडल्याबरोबर तेथले ते रानटी लोक एकदम त्यांजभोंवतीं जमून त्यांनीं त्यांस घेरून टाकलें! ती त्या आडदांड लोकांची गर्दी पाहिल्याबरोबर तो श्रीमंत मनुष्य घाबरून रडायलाच लागला; व 'अरे दैवा!' म्हणून कपाळावर हात मारून घेऊं लागला. त्याला त्यांची भाषा अगदींच कळेना. परंतु तो गरीब माणूस बुरूड, त्याला लहानपणापासून संकटाचे दिवस काढण्याची संवय होऊन गेल्यामुळें तो त्या प्रसंगास फारसा डगमगला नाहीं. त्यानें त्या लोकांस खुणेनें सांगितलें कीं, " मी तुमचा कोणी शत्रु वगैरे नसून, तुमच्यासारखाच एक मनुष्य–तुमचा मित्रच आहे. तुम्ही सांगाल तें काम करण्यास मी तयार आहें. मला तुमच्या कामास ठेवा." त्याप्रमाणें त्यानें सांगितल्यावर त्या रानटी लोकांचा एक मुख्य होता तो त्या सर्वांना म्हणाला– " अरे, या नवख्या माणसांना आतां कोणी त्रास देऊं नका. यांना आपल्यांतलेच समजून, मासे धरण्याच्या कामावर किंवा लांकडें वाहून आणण्याच्या कामावर यांना लावून घ्या. ''

त्याबरोबर त्या लोकांनीं या दोघां नवख्या मनुष्यांना दूरच्या एका रानांत नेलें व तेथील मोठमोठे लांकडांचे ओंडके दाखवून, ते सर्व वाहून,

गांवांत घेऊन येण्याविषयीं हुकूम केला. लागलीच दोघेही त्या उद्योगास लागले. पण तो बुरूड मूळचाच सशक्त व कष्टाळू असल्यानें त्यानें आपणास नेमून दिलेलें काम भराभर करून लौकरच संपवून टाकलें. परंतु हा श्रीमंत माणूस शरीरानें नाजूक व जड असल्यामुळें त्यानें तेवढ्याच वेळांत जेमतेम चौथा हिस्साही आपलें काम संपविलें नाहीं. तें पाहून तेथील त्या रानटी लोकांच्या लक्षांत येऊन चुकलें कीं, हा बुरूड फक्त आपल्या चांगला उपयोगाचा आहे. मग त्यांनीं त्यास उत्तम भाकरी आणि दूध न्याहारीस आणून दिलें. आणि हा श्रीमंत माणूस त्यांस फारसा उपयोगाचा न वाटून त्यांनीं त्यास अगदींच नाहीं न म्हणतां, शिळ्या भाकरीचे तुकडे व एक लोटाभर पाणी एवढें दिलें. तरी ही वेळच अशी होती कीं, त्यास एक दिवस उपास पडला होता; व ओंडे वाहण्याचें बरेंचसें कामही त्यास करावें लागलें होतें. त्यामुळें ती शिळी भाकरी व पाणी हीं त्याला त्याच्या घरच्या रोजच्या पक्वान्नापेक्षांही फारच रुचकर लागली !

दुसऱ्या दिवशीं पुनः ते दोघे कामावर गेले. त्या दिवशींही पूर्वींप्रमाणें बुरुडाचें काम पुष्कळ झालें, व तो श्रीमंत माणूस कामांत अगदींच ढिला दिसून आला. त्यामुळें त्या रानटी लोकांनीं बुरुडाशीं फार चांगलें व अगत्याचें वर्तन केलें व त्या श्रीमंताबद्दल सर्वच जण तिरस्कार दाखवूं लागले. कारण, नाजुकपणाच्या व चैनीच्या संवयीमुळें तो कामाला अगदीं निरुपयोगी झाला होता. मग त्याजबद्दल कोणालाही प्रेम कां वाटावें ! या वेळीं मात्र त्या श्रीमंत माणसाचे डोळे चांगले उघडले. आपण फार मोठ्या योग्यतेचे आहों असें मानावयाला आपल्याला काडीइतकी सुद्धां जागा नाहीं, आणि आपली ती कल्पना सर्वथैव चुकीची आहे, असें आतां त्याच्या ध्यानांत आलें. पुढें सुदैवानें आणखी एक जो प्रकार घडून आला त्यानें तर त्याच्या निरुपयोगित्वाबद्दल त्याची पूर्ण खात्रीच झाली.

तो प्रकार असाः——

त्या रानटी माणसांपैकीं एकजण रानांत सहज फिरत असतां त्याला झाडाची एक सुरेखशी फांदी सांपडली. ती अशी होती कीं, तिजवर पुष्कळसे रानटी फुलांचे झुबके लागलेले असून, तिचा आकार असा कांहीं वर्तुळासारखा बनला होता कीं, ती फांदी माळेसारखी गळ्यांत अडकवितां यावी. ती त्यास दिसल्याबरोबर त्यानें काढून घेऊन आपल्या गळ्यांत घातली; आणि आपण आतां किती सुरेख दिसतों, असें वाटून तो आपल्या लोकांतून मिरवूं लागला. हें सहज त्या बुरुडानें पाहिलें. तेव्हां या लोकांचीं मनें अनुकूल करून घेण्याला ही अगदीं सोपी युक्ति आहे असें त्याला वाटून, त्यानें थोड्याच वेळांत रानांतलीं आणखी कांहीं फुलें व पानें काढून, तीं तेथीलच एका वेलीच्या तुकड्यावर नीट रांगेनें विणून बसवून दिलीं, व ती फुलांची माळ दुसऱ्या एका रानटी माणसाच्या गळ्यांत घालून, ती त्यास कशी शोभते म्हणून तो त्या माणसाकडे क्षणभर पहात राहिला! त्या माणसाला हा एक नवाच अलंकार आपणास मिळाला असें वाटून फार आनंद झाला; आणि तो त्या भरांत अगदीं नाचूं उडूं लागला! मग तो आपला अलंकार दाखविण्यासाठीं जेव्हां तो आपल्या मंडळींत गेला, तेव्हां त्या सर्वांना त्या माळेचें फारच नवल वाटलें. आणि ते सर्वजण धांवत त्या बुरुडाकडे आले, आणि 'आम्हांला तसली माळ करून घाल' ह्मणून त्याच्या पाठीस लागले! सारांश, त्या वेळे-पासून त्या सर्वांना त्या माळेचें इतकें वेड लागलें कीं, त्यायोगें त्यांनीं तें ओंडे वाहण्याचें त्याच्या मागचें काम काढून, त्यास अशा माळाच करीत बसावयास सांगितलें. व लागलीच त्यांचें त्याच्यावरचें प्रेम दुणावलें. मग ते त्याला उत्तम उत्तम खाण्याचे जिन्नस आणून देऊं लागले. लौकरच त्यांनीं त्याजकरितां एक झोपडी तयार करून दिली; आणि सर्वजण त्या-च्याशीं आपल्या घरच्या माणसांप्रमाणें वागूं लागले. परंतु त्या श्रीमंत मनु-ष्याशीं लोकांना आवडेल असें कांहीं काम करण्याची कलाही नव्हती, व

कष्टानें काम करून दाखवायला अंगांत ताकद नव्हती; त्यामुळें त्यास अर्थातच त्या बुरुडाचा नोकर होऊन राहावें लागलें. तो दररोज रानांत जाई व त्या बुरुडाला कराव्या लागणाऱ्या माळांकरितां झाडाचीं पानें व फुलें तोडून, तीं घरीं आणून देई.

याप्रमाणें कांहीं दिवस गेले; तों त्यांची तेथें राहण्याची मुदत संपली व त्यांस परत बोलावण्यांत आलें. परत देशांत येतांच त्यांस त्या न्यायाधीशानें पुढें बोलाविलें. आणि त्या श्रीमंत माणसाकडे प्रेमळ नजरेनें पाहून तो म्हणाला:—" बाबा रे, एवढ्या दिवसांच्या अनुभवावरून, जगाच्या दृष्टीनें तूं किती तुच्छ आहेस व किती दुबळा आहेस, आणि तूं ज्याचें नुकसान केलेंस त्याच्यापेक्षां तुझी योग्यता किती कमी आहे हें तुझ्या चांगलें ध्यानांत आलें असेल, असें मला वाटतें. आतां तूं ज्याला अशा अनर्थांत निष्कारण पाडलेंस, त्याच्या त्या नुकसानीची भरपाई करावयास मी तुला लावणार आहें. आतां, जर तुझ्या अपराधाच्या मानानें तुला शासन करावयाचें, तर तुझी सर्वच मालमत्ता तुजपासून हिसकावून घेऊन त्यास दिली पाहिजे. परंतु याच्यापुढें तूं कांहीं तरी निवळशील व भलेपणानें वागशील अशी मला आशा वाटते; म्हणून मी तुला अशी शिक्षा सुनावतों कीं, तुझ्या सर्व इस्टेटीचा अर्धा भाग तूं या बुरुडास, ज्याचें तूं वाटोळें करण्याचा निष्कारण प्रयत्न केलास त्यास, द्यावा. "

हा हुकूम ऐकतांच, त्या न्यायाधीशाच्या न्यायप्रियतेबद्दल व सौजन्याबद्दल त्या बुरुडास संतोष वाटला व उपकार वाटले. तथापि तो म्हणाला:—

" महाराज, आपले हे मज गरीबावर मोठे उपकार आहेत. पण महाराज, मी अगदीं दारिद्र्यांत वाढलेला असून मला कष्टाची आवड आहे. त्यामुळें मला एवढ्या संपत्तीची कांहीं गरज नाहीं; व आपण मोठे श्रीमंत असावें अशी मला इच्छाही नाहीं. शिवाय, अशी संपत्ति मला मिळाली तर ती मी कोठें ठेवूं असें मला होईल; तिचा उपयोग काय करावा व

कसा करावा हें मला कळावयाचें सुद्धां नाहीं. तरी या श्रीमंताकडून मला एवढेंच आपण मिळवून द्यावें कीं, माझें लव्हाळें व माझी ती झोंपडी एवढी यानें पुनः जुळवून, उभी करून द्यावी. आणि यापुढें यानें कोणाही मनुष्याशीं अधिक माणुसकीनें व भलेपणानें वागावें. ”

हें त्या बुरुडाचें बोलणें ऐकून व त्याचा उदारपणा पाहून त्या श्रीमंत माणसास मोठें नवल वाटलें. नंतर ते दोघे आपापल्या घरीं गेले. आतां त्या श्रीमंत गृहस्थास, आपल्या मूर्खपणाच्या पूर्व-वर्तनावरून पुष्कळ गोष्टी शिकावयास सांपडल्या होत्या व त्यास आतां अधिक शहाणपणा आला होता. त्यामुळें त्यानें पुढें त्या बुरुडाशीं फार चांगल्या तऱ्हेचें वर्तन ठेविलें. एवढेंच नव्हे, तर त्यानें त्यानंतर आपली सर्व संपत्तिही गरीबांच्या उपयोगाकरितां खर्चावयाचें ठरविलें व त्यायोगें त्यानें त्यांचें पुष्कळ कल्याण साधिलें.

× × × ×

याप्रमाणें गोष्ट संपली. तेव्हां बाळ म्हणालाः—ही गोष्ट फार सुरेख आहे. पण तो बुरुड, मला वाटतें, अगदींच चुकला. त्या जागीं मी असतों तर त्याची अर्धी संपत्ति मीं खुशाल घेतली असती व श्रीमान् झालों असतों.

हरी म्हणालाः—“ मी त्याच्या जागीं असतों तर ही श्रीमंती कधीं पतकरली नसती. श्रीमंती हवी कशाला ? उगीच गर्विष्ठ होऊन दुसऱ्याशीं दुष्टपणा करायलाच कीं नाहीं ? ”

———



# ११ बाळूची अक्षरओळख.

असो. यानंतर दररोज गोविंदशास्त्री व त्यांचे इतर शिष्य यांबरोबर बाळ बागेंत येऊन मन लावून आपलें बागेचें काम करूं लागला. मग नेहमींप्रमाणें सुटीची वेळ होतांच देवालयांतील ओवरींत येऊन सर्वजण दूध घेत व मग हरीनें एक गोष्ट काढून वाचावी व इतर सर्वांनीं ऐकावी, असें चालूं लागलें. आतां बाळाला या गोष्टींची गोडी वाटूं लागली. परंतु पुढें कांहीं कामाकरितां हरीला घरींच राहावें लागलें. एक आठवडा हरीनें त्या कामासाठीं तिकडे घालविला. त्या दिवसांत रोज एक गोष्ट वाचण्याचें काम गुरुजींनीं दुसऱ्या कोणाकडे सांगितलें नाहीं व स्वतः त्यांनींही तें केलें नाहीं. कोणी तरी गोष्ट वाचून दाखवील म्हणून बाळानें पुष्कळ वाट पाहिली, परंतु व्यर्थ. मग दुसरे दिवशीं त्याला राहवेना; त्यानें थोडें धैर्य करून गुरुजींस म्हटलें—" गुरुजी, आह्मांला एक गोष्ट वाचून दाखवतां ? हरी घरीं गेल्यामुळें आह्मांला आतां गोष्टी ऐकायला मिळत नाहींत. "

गुरुजी म्हणालेः—" बाळ, तें खरें; पण मला दुसरें काम आहे रे ! " हें उत्तर ऐकून बाळाची विशेष निराशा झाली. नंतर तो आपल्याशीं म्हणाला, " मला जर हरीसारखें तेवढें वाचावयास आलें असतें, तर दुसऱ्या कोणालाही ' मला एवढें वाचून दाखवतां का ? ' असें म्हणण्याची पाळी मजवर कशाला आली असती ? पण काय करावें ?...पण हरीला जें करतां येतें, तें मला कां नाहीं करतां येणार ? त्याला तेवढें वाचतां येणार व इतरांना नाहीं, असें तर कांहीं नाहीं ठरलेलें ? आतां हें खरें आहे कीं, हरी हा माझ्यापेक्षां अधिक बुद्धिमान आहे. पण तो तरी शिकला नसता तर त्यासही वाचतां आलें असतें काय ? तर, मला जर कोणीं मूळाक्षरें वगैरे शिकविलीं तर हरीप्रमाणें मलाही वाचतां येऊं लागेल हें उघड आहे. तर आतां असें करावेंः—हरी घरून परत येथें शिकावयास येऊं लागल्या-

बरोबर मला तूं शिकव म्हणून मी त्याला ह्मणेन. म्हणजे हें होईल...पण तो आतां केव्हां येईल बरें ?"

बाळाच्या मनांत असे विचार वरचेवर येऊं लागले, तों एके दिवशीं हरी आपलें घरचें काम संपवून गुरुजीकडे पूर्वीप्रमाणें अभ्यासास आला. मग हरी आल्यावर पहिल्याच दिवशीं जराशी फुरसत पाहून बाळानें त्यास म्हटलें:—" हरी, वाचायला तूं कसा रे शिकलास ? मला वाचावयास शिकावयाचें आहे, म्हणून मी तुला विचारतों."

हरी म्हणाला--" मला गुरुजींनीं वाचावयास शिकाविलें. प्रथम मूळाक्षरें शिकविलीं; नंतर बाराखड्या, आणि थोडथोडीं जोडाक्षरें शिकाविलीं; मग मला वाचावयास येऊं लागलें."

बाळ:—" मग हरी, तूं मला मूळाक्षरें शिकवशील ?"

हरी:--" हो, खुरशाल ! केव्हां हवें तेव्हां शिकवीन."

लागलीच हरीनें एक अंकलिपि काढिली; व तीवरून सर्व मूळाक्षरें त्यास एका धूळपाटीवर काढून दाखविलीं. या वेळीं बाळाची शिकण्याची खरी उत्सुकता होती. त्यामुळें त्यानें तें सर्व फार लक्ष लावून पाहिलें आणि पहिल्याच दिवशीं त्यानें तीं सर्व मूळाक्षरें तयार केलीं. मग लागलींच त्यास वाटलें कीं, आतां गुरुजींकडे जावें, व सर्व मूळाक्षरें त्यांस अगदीं बिनचूक काढून दाखवून त्यांची शाबासकी मिळवावी. पण नंतर त्यानें असा विचार केला कीं, आतांच त्यांना कांहीं कळूं न देतां, आपण आणखी जरा झटून अभ्यास करून, पुस्तकांतील एखादी गोष्ट वाचण्याइतकी तयारी करावी; व मग एकदम एके दिवशीं एक गोष्टच त्यांच्यापुढें वाचून दाखवावी ! मग त्यांना सध्यांपेक्षां खूप नवल वाटेल; व मग ते आपणास खूपच मोठी शाबासकी देतील. मग त्या दोघांनीं पंधरा दिवसपर्यंत चांगलीच मेहेनत केली. आतां हरी होता गुरुजी, व बाळ त्याचा विद्यार्थी बनला होता. अशी या बाल गुरुशिष्यांची जोडी चांगली जमली..

मग असा एक पंध्रवडा गेल्यानंतर एके दिवशीं रोजच्याप्रमाणें बागेंतील काम आवरून जेव्हां सर्वजण ओवरींत दूध घेण्याकरितां जमले, तेव्हां गुरुजींनीं हरीला पुस्तक काढून दिलें, व एक गोष्ट काढून वाच म्हणून सांगितलें. तेव्हां बाळ उठून उभा राहिला व म्हणालाः—" गुरुजी, मी आज ती गोष्ट वाचूं का ? मला वाच म्हटलेंत तर मी ती चांगल्या तऱ्हेनें वाचून दाखवीन असें मला वाटतें. "

गुरुजी म्हणाले:—" वा, बाळासाहेब ! आज तुम्ही पुस्तक वाचणार ! शाबास ! वाचा. आमची मुळींच हरकत नाहीं. इतक्या लौकर तुम्ही वाचावयास शिकलां असलांत तर मग तुम्ही उद्यां पांखरासारखे आकाशांत उडावयाला सुद्धां शिकाल ! काय नेम ! "

बाळानें याबर कांहीं उत्तर दिलें नाहीं. तो किंचित हंसला मात्र. तथापि आपणास वाचतां येईल अशी त्याची खात्री होती. त्यानें हरीजवळून पुस्तक घेतलें आणि पुढील गोष्ट अगदीं सरळ आणि न अडखळतां गुरुजींपुढें वाचून दाखविली.

---

## १२ एक शेतकरी व त्याचे कुत्रे.

एका गांवीं एक गरीब शेतकरी राहात होता. गांव अगदीं डोंगराळ प्रदेशांत, एका दरींत, बसला असल्यामुळें तेथें लांडगे, रानडुकरें, कोल्हे वगैरे रानटी जनावरांचा उपद्रव फार असे. त्यासाठीं त्या शेतकऱ्यानें दोन लहान कुत्र्यांचीं पिलें लहानपणासून पाळून वाढविलीं होतीं. तीं चांगलीं जातिवंत असल्यामुळें दिसावयास मोठीं भव्य व उमदीं दिसत व तशींच धैर्यवान् असत. याप्रमाणें त्यांच्या अंगीं विशेष जोर व विशेष चपळाई आहे असें पाहून एके दिवशीं त्या शेतकऱ्यानें त्यांतला एक कुत्रा आपल्या शेताच्या धन्यास द्यावयाचें मनांत आणून, तो त्यास नजर केला.

तो धनी जवळच एका शहरांत राहत असे. त्यानें तो मोठ्या प्रेमानें आपले घरीं ठेवून घेतला. त्या कुत्र्याचें नांव मोत्या. दुसरा कुत्रा वाघ्या म्हणून होता, तो त्यानें आपले मेंढरांचे कळप सांभाळण्यासाठीं आपलेजवळ ठेविला. इकडे मोत्या आतां एका निराळ्या प्रकारच्या राहणींत येऊन पोंचला. आतां मोत्याला बांधावयास जी जागा मिळाली, ती त्या धन्याच्या स्वयंपाक-घराचे दाराशीं मिळाली. त्या ठिकाणीं नाना प्रकारच्या मजेदार उड्या मारून व कित्येक शिकविलेल्या गमती करून तो तेथील सर्व नोकरचाकरांची मोठी करमणूक करूं लागला. त्यामुळें तो आल्या दिवसापासून सर्वांचा अगदीं आवडता होऊन बसला. मग त्यास खावयास काय तोटा ! त्यास तेथें रोज दूध व भाकरी कुसकरून भरपूर खावयास देऊं लागले; आणि दिवस उगवल्यापासून मावळेपर्यंत त्याच्यापुढें कांहीं ना कांहीं अन्न सारखें पडलेलें असे. त्यामुळें तो लौकरच मोठा लठ्ठ, गुबगुबित होऊन सुरेख दिसूं लागला. पण इकडे अवजडपणा व भित्रेपणा हींही त्याच्यांत एवढ्या अवधींत शिरून बसलीं. त्याच्या अंगाचे मानानें निमपट असा एखादा कुत्रा जरी त्याजपुढें आला, तरी त्याला भिऊन मोत्या पळूं लागला. तोंडासमोर उभा म्हणून राहीना ! आणि त्याला गोडगोड खाण्याची फार संवय लागल्यामुळें वारंवार स्वयंपाकघरांतून त्यानें अन्न पळवावें, व वारंवार त्याबद्दल त्यास चोप बसावा, असाही प्रकार सुरू झाला! परंतु कोणी माणूस भेटलें कीं, शेपटाचा गोंडा घोळीत पुढें जाऊन, मागच्या दोन पायांवर उभें राहून, अंगावर चढून, त्याचे आर्जव करून, त्याजकडून परत आंजारून गोंजारून घेण्यांत मोत्या मोठा पटाईत झाला होता; आणि एकादी दूर फेकून दिलेली वस्तु तोंडांत धरून आणून द्यावयाची, एखादा लहानसा जिन्नस तोंडांतलि काठीला अडकवून दूरपर्यंत वाहावयाचा, याही कला त्याला साधल्या होत्या. त्यामुळें तो सर्व जणांचा फार आवडता होऊन राहिला. त्याचा भित्रेपणा व चोरटेपणा यांकडे त्यामुळें ते लोक फारसें लक्ष देत नसत.

इकडे त्या शेतकऱ्यानें आपलेकडेच ठेवून घेतलेला कुत्रा जो वाघ्या, त्याची स्थिति बरच्याहून अर्थात् अगदींच वेगळी होती. तो कुणबी एक झोपडी बांधून राहिलेला; तेथें या वाघ्याला नीट खायला-प्यायला कोण कोठून घालणार? मग तो गुबगुबित कसा होणार? तेथें त्याला अनेक प्रकारच्या नकला करावयाला कोण शिकविणार व ज्याचा त्याचा आवडता तो कसा होणार! त्याचा धनी बिचारा गरीब, तो तरी नुसत्या नकला करणाऱ्या निरुपयोगी जनावराला पोसावयाला कोठें समर्थ होता! त्याला सारखें उघड्यांत वावरावें लागे. कसें बसें काम करून पोटापुरतें मिळविण्याच्या उद्योगांत त्यास वारा, ऊन व पाऊस हीं सोसावीं लागत. अशाच्या आश्रयास राहिलेला वाघ्या अर्थात् आपल्या धन्याप्रमाणें काटक, चपळ व मेहनती बनला. त्याला सदोदित तीं आपलीं मेंढरें पाळण्यासाठीं लांडग्यांच्या पाळथीवर राहावें लागे. आणि कधीं कधीं त्यांजवर धावून जाऊन त्यांना हटविण्याचे प्रसंगीं कित्येक जखमा त्यांजकडून आपल्या अंगावर करून घ्याव्या लागत. अशा प्रकारचे झगडे करावयाचा प्रसंग त्यास रोजचा असे. त्यामुळें तो कुत्रा असा धैर्यवान बनला कीं, कसलाही शत्रु असला तरी तो त्यावर चालून जाई. माघार म्हणून कधीं घेत नसे! अतिशय काळजीपूर्वक व मोठ्या शहाणपणानें तो आपल्या धन्याचीं मेंढरें सांभाळी. याच्या राखणीस आल्यापासून त्यांतलें एक मेंढरूं कांहीं इकडचें तिकडे चुकून कधीं गेलें नव्हतें. कुत्र्याच्या अंगचा इमानीपणा तर त्याचे ठिकाणीं फारच होता. चुलीवर कांहीं शिजत असूं द्या, कीं पानांत भाकरी वाढलेली असूं द्या, जवळपास कोणी नसलें तरी वाघ्या कांहीं एका घासाला शिवावयाचा नाहीं; मग खाण्याचें नांव कशाला? जेव्हां धनी येईल, व मग जें कांहीं तो घालील, तेवढ्यावर हा अगदीं खूष! तसेंच, नेहमीं उघड्यांत राहावयाचा प्रसंग असल्यामुळें, एकादे वेळीं जोराचा पाऊस पडो, गारा पडोत, कीं विजांचा कडकडाट होवो; वाघ्याला, त्याचा सांभाळावयाचा कळप पुढें

उभा असतां, तेथून निघून एकाद्या निवाऱ्याच्या जागीं पळून जाण्याची बुद्धि कधीं व्हावयाची नाहीं! आणि नदीला पूर आलेला असतांही धन्यानें जरा खूण केली कीं पुरे, वाघ्या भर पावसांत त्या नदींत उडी घालायला कमी करावयाचा नाहीं!

याप्रमाणें भिन्न भिन्न प्रकारचे दोन धनी त्या दोन कुत्र्यांना वागविण्यास मिळाल्यामुळें ते कुत्रे मूळचे सारखेच असूनही असे वेगवेगळ्या स्वभावाचे बनले. पुढें एके दिवशीं तो त्या शेताचा धनी आपली सर्व शेती एकवार स्वतः अवलोकन करावी, या हेतूनें आपल्या लाडक्या मोत्याला बरोबर घेऊन त्या शेतकऱ्याच्या गांवीं आला. तो तेथें येतांच त्याच्या मोत्याचा सख्खा भाऊ जो वाघ्या तो त्याच्या दृष्टीस पडला. पण त्याची ती भिकार व रानवट मुद्रा पाहून त्याला त्याचा प्रथम तर तिरस्कार वाटल्यावांचून राहिला नाहीं. कारण दिसायला तो रोड; शिवाय नाना प्रकारचे खेळ व नकला करून, पाहणाराच्या मनाला वेधून टाकण्याचा गुण त्याच्या आंगीं अर्थातच नव्हता. पण ही त्याची प्रथमची तिरस्कारवृत्ति पुढें लौकरच मावळली व त्याचें पहिलें मतही त्यानें लगेच बदललें. त्याला एक कारण झालें; एकदां त्याला जवळच्या दरींतून व झाडींतून जाऊन यावयाचें होतें. त्या वेळीं बरोबर दुसरें कोणी न घेतां त्यानें आपला मोत्या तेवढा घेतला. मोत्याच्या मागून त्याचा भाऊ वाघ्याही, मोत्याच्या प्रेमानें त्याच्या मागून चालला. तरी त्याच्या त्या भिकार शरीरामुळें त्याच्या येण्याकडे मोत्याचें किंवा त्याच्या धन्याचेंही फारसें लक्ष नव्हतें. असे ते त्या झाडींतून फिरत असतां अकस्मात् एक क्रूर लांडगा, केस पिंजारून व डोळे रागानें अगदीं लाल करून भयंकर आरोळी ठोकीत त्या गृहस्थाच्या अंगावर धांवून आला, आणि एका क्षणांत तो त्याला आतां फाडणार अशी वेळ आली! तो गृहस्थ घाबरून जाऊन त्याची तर बोबडीच वळली! आणि त्याचा आवडता सुंदर डौल-

दार कुत्रा जो मोत्या, त्यानें या प्रसंगीं धावून पुढें येण्याऐवजीं, भिऊन, कीं कीं करीत, मागल्या बाजूसच जेव्हां पळ काढला, तेव्हां तर त्या गृहस्थानें आपल्या जीविताची सर्वच आशा सोडून दिली! पण त्या निराशेच्या व जिवावरच्या प्रसंगीं किडकिडित बाघ्या कुत्रा एकदम धावून त्या लांडग्यासमोर आला आणि त्याची व त्या लांडग्याची लगेच झुंपली! बाघ्या यत्किंचित् कचरला नाहीं. त्या घट्टपुष्ट लांडग्याशीं झगडतांना त्यास कित्येक ठिकाणीं दुखापत झाली व सर्व अंग रक्तबंबाळ झालें. तरी त्या पठ्यानें जिवाची शर्थ करून त्या बलाढ्य लांडग्याला खालीं पाडून लोळवून त्याचा प्राण घेतला; आणि आपला व आपल्या धन्याचा प्राण वांचविला! इतकें होत आहे तोंवर तो गृहस्थ सावध झाला; आणि त्यानें बाघ्याचा तो सर्व पराक्रम अवलोकन केला. त्या वेळीं आपला प्राण वांचल्याबद्दल त्यास पराकाष्ठेचा आनंद झाला व त्या शूर बाघ्या कुत्र्याचे त्याला केवढे तरी उपकार वाटले! त्याच्या अंगावरील जखमा पाहून त्याला त्याची फार दया आली. आतां या वेळीं त्याचा भ्रम दूर झाला. तो म्हणाला:—" खरोखर, नुसत्या मुद्रेच्या भव्यपणावर विश्वास धरणें व्यर्थ आहे; आणि धैर्य वगैरे श्रेष्ठ गुण खेड्यांत, रानांत व या शेतकऱ्याच्या झोंपडींत जितके आढळतात तितके आम्हां शहरवासी मोठ्या लोकांत किंवा उंच हवेल्यांत आढळत नाहींत हेंच खरें. "

× × × ×

एथवर गोष्ट वाचून होतांच मध्येंच गुरुजी म्हणाले:—" बाळ, शाबास; फार सुरेख वाचलेंस. मला हें ठाऊकच होतें कीं, मुलांनीं एखादी गोष्ट, झटून करून दाखवावयाचें मनांत आणलें, म्हणजे ती तीं अगदीं मोठ्या माणसांच्या इतकी उत्तम घडवून आणितात. आतां बाळ, तूं सांग बरें, यांतला कोणता कुत्रा तुला आवडतो? ज्यानें आपल्या धन्याला त्या लांडग्याच्या तावडींत खुशाल सोडून मागें पळ काढला, तो गुबगुबित मोत्या

तुला आवडतो ?—कीं ज्यानें त्या गृहस्थाच्या बचावासाठीं आपला जीव धोक्यांत घातला, तो रोडका, भिकार, रानबट, खेडबळ व पुरेसें खायलाही मिळत नसलेला बाघ्या तुला आवडतो ?"

बाळ म्हणालाः—"खरोखर, मला तो बाघ्याच फार आवडतो. पण मग मीं असें केलें असतें: त्याला दररोज धुवून काढून त्याचे अंगावरचे केस साफसूफ करून त्याला अगदीं मोत्यासारखा सुरेख दिसेल असा मीं बनविला असता."

गुरुजीः—"आणि मग तो बाघ्या आपला स्वभाव सोडून त्या मोत्या-सारखाच भित्राही बनला असता!"

बाळ:—"छे! मी त्याला भित्रा होऊं दिला नसता; आणि एवढ्यानें तो भित्रा कसा होईल गुरुजी ?"

गुरुजीः—"कसा होईल काय ? जसा मोत्या झाला तसा! बरें, ती गोष्ट पुढें वाच पाहूं ?"

हो ह्मणून बाळानें पुढें वाचण्यास सुरवात केलीः—

\+ \+ \+ \+

बाघ्याचें हें उत्कृष्ट धैर्य पाहून त्या गृहस्थास फारच संतोष वाटला आणि असला कुत्रा आपल्यापाशीं असावा असें मनांत येऊन त्यानें तो त्या आपल्या शेतकऱ्यापाशीं मागितला. त्याला तो देणें फार जिवावर आलें, पण शेवटीं त्यानें त्यास त्याबद्दल रुकार दिला. तेव्हां त्यानें बाघ्यास आप-ल्याबरोबर आपल्या शहरास नेलें, आणि मोत्याला तेथेंच सोडून दिलें; व सर्वांना सांगून ठेवलें कीं, हें कुत्रें अगदीं निरुपयोगी आहे; खायला काळ व भुईला भार. तर यास कोणी भाकरीचा एक तुकडा सुद्धां टाकूं नका! याला असेंच उपाशीं मरूं द्या."

याप्रमाणें सांगून तो गृहस्थ शहरास निघून गेल्यावर तो गरीब शेतकरी आपल्या उद्योगास लागला. तोंच मोत्या त्याजपुढें आला; व

शेंपूट हालवून त्यानें त्याचे पाय चाटण्यास व आर्जव करण्यास सुरुवात केली. प्रथमतः त्यानें त्याला दूर झिडकारलें, परंतु लागलीच त्याच्या मनांत दया उत्पन्न झाली. लगेंच, त्यास जवळ ठेवून घेऊन, मिळेल तशी अर्धी-कोर भाकर त्यास घालावी असें त्यानें ठरविलें. तसेंच त्याचा भव्य आकार व मुद्रा पाहून त्याला असेंही वाटलें कीं, शहरांत फुकट बसून खायची व आळसाची संवय लागल्यामुळें हा कदाचित् नादान झाला असेल. करितां यास पुनः चांगल्या प्रकारें वागविलें तर खरोखर हा पुनः पूर्ववत् जोमदार बनेल. तर एकवार तसें करून पहावें. मग असा विचार करून मोत्याला बाघ्याप्रमाणें तयार करावें असें त्यानें ठरविलें. अर्थात् प्रथमतः त्याला खावयास अगदीं बेताचें मिळूं लागलें. पण तेवढ्याच खाण्यानें थोड्याच दिवसांनीं तो सडपातळ, पण चपळ व मेहनती झाला. पुढें एकदां मोठा जोराचा वळवाचा पाऊस आला; त्याबरोबर नेहमींच्या संवयीनें तो त्या शेतकऱ्याच्या झोपडींत शिरला आणि त्याच्या घोंगडीवर निवाऱ्यासाठीं बसून राहिला. तों त्या शेतकऱ्याची बायको आंत येतांच तिनें त्याला पाहिलें. त्याबरोबर 'या मेल्यानें येथें कां दाटी केली आहे!' असें म्हणून तिनें त्यास लागलींच बाहेर हांकून दिलें, आणि त्यामुळें साहजिकच त्यास सर्व वेळ उघड्यांत राहून वारा, पाऊस वगैरे सहन करावें लागलें. पण या सर्वांचा परिणाम असा झाला कीं, दिवसेंदिवस तो काटक व जोरदार बनूं लागला. आणि लौकरच तो असा कणखर बनला कीं, जणूं हा जन्मापासून ऱ्या रानांतच राहात आहे, शहरचा वारा यास कधींच लागला नाहीं! त्याची इतकी सुधारणा झाली तरी, त्यास रानटी जनावरांचें अद्याप भय वाटत असेच. पण तेंही पुढें लौकरच कमी झालें. कारण, एके दिवशीं मोत्या, एकटाच दरींत व झाडीच्या बाजूला भटकत असतां एक लांडगा अकस्मात् झाडींतून बाहेर आला आणि धावून त्यानें त्याची एकदम मान पकडली. कसें तरी निसटून पळून जावें म्हणून मोत्यानें प्रथम प्रयत्न केला,

पण तो लांडगा त्याच्यापेक्षां चपळ असल्यामुळें त्यानें त्यास तशी सवडच मिळूं दिली नाहीं. तो जरा मागें वळतांच यानें त्यास पुनः पकडावें. असें एकदोनदां झाल्यावर पळावयाचें सोडून त्यास समोरासमोर तोंड देण्यास पुढें होणें त्यास भाग पडलें. कारण मनुष्यास काय किंवा कोणास काय, प्रसंग आल्याशिवाय धैर्य येत नाहीं; आणि प्रसंग येत गेले म्हणजे भित्रा प्राणीही शूर बनत असतो. तेव्हां मोत्यानें तो लांडगा आपणास सोडीत नाहीं असें पाहून शेवटीं निकरास येऊन त्यावरच चढाई केली, व त्याची मान पकडून, त्यास पालथा पाडून, घोळवून, चीत करून, त्यानें त्याचा प्राण घेतला! त्याचा धनी तो शेतकरी, त्याला शोधीत तेथें आला; तों झालेला सर्व प्रकार त्याच्या ध्यानांत आला. मग त्यानें मोत्यास जवळ घेऊन त्यास मोठी शाबासकी दिली; त्यास गोंजारलें, आणि त्याचे अंगावरून हात फिरवून त्यास चांगली हुषारी आणली. याप्रमाणें आपल्या धन्याच्या प्रेमाच्या कुरवाळण्यानें व लांडग्यावर मिळविलेल्या प्रत्यक्ष विजयानें मोत्या आतां मोठा धैर्यवान् उत्कृष्ट शिकारी कुत्रा बनला. तो इतका कीं, त्या रानांत दुसरे जे पुष्कळ कुत्रे होते त्या सर्वांत, मोत्याइतकी कोणाचीहि धास्ती त्या लांडगे वगैरे रानजनावरांना वाटेनाशी झाली. मोत्या पाहिला कीं सारें रान सामसूम!

मोत्याचा असा दरारा पाहून तो शेतकरी एके दिवशीं म्हणाला:—

" खरोखर, जे सारा दिवस व्यर्थ आळसांत घालवितात, त्यांच्या अंगीं असें कांहीं धैर्य व पराक्रम येईल अशी कल्पना करण्यांत कांहीं अर्थ नाहीं. प्रसंगांत शिरल्याशिवाय अंगांत धैर्य कसें येईल? आणि वारंवार प्रसंग आणीत गेलें व जरा नीट शिस्त त्यांस लावली, तर अगदीं निरुद्योगी झालेलीं माणसेंही उत्कृष्ट शूर व पराक्रमी होतील, यांत शंका नाहीं."

---

# १३ वाचतां येण्याचें फळ.



याप्रमाणें गोष्ट संपली. बाळानें पुस्तक मिटतांच गुरुजी म्हणाले—" बाळ, तूं वाचावयास शिकलास, हें पाहून मला आज खरोखरच फार आनंद वाटला. आतां तुला दुसऱ्या कोणाची मदत न घेतां हवें तेव्हां एखादें पुस्तक घेऊन वाचीत बसतां येईल व त्यायोगें तुझा वेळ सहजच चांगला आनंदांत जाईल. आतां जितकीं म्हणून पुस्तकें लिहून ठेवलीं आहेत, छापलीं आहेत, तितकीं सर्व तुला वाचतां येतील हें उघडच झालें. आतांसारखीं मनोरंजक गोष्टींचीं पुस्तकें तुला वाचतां येतील; पेशव्यांच्या बखरी आतां तूं वाचशील व पूर्वीच्या मोठमोठ्या पराक्रमी व शूर लोकांच्या हकीगती आतां तुला कळतील; रामविजय, पांडवप्रताप तुला वाचतां येईल; आणि श्रीराम व श्रीकृष्ण, कौरव व पांडव, सीता व द्रौपदी यांचीं थोर व सुंदर चरित्रें तुला आतां कोणाला विचारावयास न जातां, घरीं बसूनच माहीत करून घेतां येतील. आतां, पृथ्वीच्या पाठीवर कोण-कोणते देश आहेत, तेथें लोक कोण व कसे आहेत, त्यांची राहाणी काय आहे, आचारविचार काय आहेत, तेथील हवापाणी कसें आहे, इत्यादि गोष्टी, बाळ, तूं आतां या वाचण्याच्या योगानें जाणून घेऊं शकशील. आपल्या देशावर राज्य करणारे इंग्रज लोक किती उद्योगी, पराक्रमी, धाडसी व चतुर आहेत हें तुला आतां इतिहास वाचून समजून घेतां येईल. सर्व पृथ्वीवर त्यांची एवढी भरभराट होण्याचें मर्म तुला कळेल. त्यांचे शास्त्रीय शोध पाहून, त्यांची बुद्धिमत्ता तुला समजून येईल, व मग त्यांची बरोबरी करण्याचा तूंही प्रयत्न करूं शकशील. अध्यात्मविषय वाचलास तर तुला आपल्या पूर्वजांचें, प्राचीन ऋषिजनांचें वैराग्य, शुद्ध ईश्वरभक्ति व आत्म्याच्या स्वरूपाच्या शोधार्थ त्यांनीं केलेले खोल व गंभीर

विचार, त्यांच्या दीर्घकालीन तपश्चर्या व त्यांस आत्मज्ञानाचें आलेलें सुंदर फळ हें सर्व तुला पाहावयास मिळेल.

सारांश, आतां तुला अमुक एक गोष्ट कळून घ्यायला कांहीं अडचण आहे असें मला खरोखरच अगदीं दिसत नाहीं. मला आतां अशी खरो-खरीच उमेद वाटते कीं, पुढें एके दिवशीं तूं एक उत्तम विद्वान् गृहस्थ होशील, आणि आपल्या उदारपणानें व माहितीनें लोकांना कित्येक गोष्टी शिकवून ' आपणासारिखे ' शहाणे करून सोडशील. बाळ, आणि हरी! तुम्हां दोघांसंबंधानें मला फार आशा आहे. आज आपल्या देशाचा कसा पडता काळ आहे हें थोडें फार तुमच्या ध्यानांत आलें असेल. तर तुम्ही आपल्या सौजन्यानें, विद्वत्तेनें, धैर्यानें, परोपकारानें व स्वदेशसेवेनें अशा थोर योग्यतेचे व्हावें असें माझ्या मनांत आहे कीं, त्यायोगें या देशाला भूषण व्हावें. तुम्ही असे पुढें थोर पुरुष निपजाल अशी मला फार मोठी उमेद आहे. "

बाळ ह्मणाला:—" गुरुजी, खरोखर मी सुद्धां आतां अगदीं ठरवून टाकलें आहे कीं, आपण अगदीं पुष्कळ शहाणें व्हायचें. आणि आतांच मी खात्रीनें सांगतों कीं, जरी मी इतका लहान आहें, तरी थोरल्या माणसांपेक्षां मला आतांच किती तरी जास्ती कळूं लागलें आहे! पहा आमच्याच घरांत आमची आई, काकी, आणि माझी मनुताई, गोदू आणि छबडी इतक्या जणींतून एकीला सुद्धां माझ्याप्रमाणें एक गोष्ट वाचतां येत नाहीं. छबडी एक लहान आहे, पण बाकी सारींजणें तर माझ्यापेक्षां मोठींच माणसें आहेत! "

हें बाळाचें बोलणें गुरुजींस अर्थातच बरेंसें वाटलें नाहीं. बाळाचें हें पोकळ घमेंडीचें भाषण त्याच्या पूर्वीच्या राहणीला अनुसरून होतें. तें ऐकून, पण न रागावतां, त्याला त्याची चूक समजून देण्याच्या हेतूनें जरा गंभीरपणें ते ह्मणाले:—" बाळ, तुझ्या मनुताईला आणि आईला आणि

दुसऱ्या सगळ्या जणांना लिहिण्या-वाचण्यास शिकवावयास कोणी गुरुजी येत होते का रे ?"

बाळः—"नाहीं गुरुजी; कोणी नाहीं."

गुरुजीः—"मग त्यांस वाचावयास येत नाहीं, यांत मोठेंसें आश्चर्य तुला कां वाटतें ? तुला हरीनें जर मूळाक्षरें शिकविलीं नसतीं, तर तुला तरी वाचावयास आलें असतें काय ? आणि सध्यां तूं जरी ही गोष्ट वाचून दाखविलीस, तरी तुला जें कांहीं येत आहे तें, खरें पाहिलें तर, एकंदर ज्ञानाच्या तुलतेनें किती तरी थोडें आहे !" असें म्हणून ते हंसूं लागले.

गोविंदशास्त्री यांनीं आज बाळाला हा असा पहिला उपदेश केला.

## १४ चेंडू उडाला !

बाळ हा श्रीमंतींत वाढलेला असून, लाडानें जरी त्याच्या वागणुकीस चमत्कारिक वळण लागलें होतें, तरी त्याचें मन निर्मळ होतें व पुढें तो निवळावा असें चांगुलपणाचें बीज त्याच्यांत खास होतें. सध्यां त्याचा स्वभाव फार तापट झाला होता. कोणीं उलट बोललेलें ऐकावयाचें त्यास माहीत नव्हतें; आणि त्याला वाटे कीं, कोणाही माणसाला वाटेल तें काम सांगायला मला कांहीं हरकत नाहीं; त्यानें तें काम केलेंच पाहिजे ! पूर्वीं इनाम गांवावर रहात असतांना सर्वजण तात्यासाहेबांचे कोणत्या ना कोणत्या प्रकारें ऋणानुबंधी होते; त्यामुळें, व शिवाय बाळ वयानें लहान असल्यामुळें सर्वांवर त्याची सत्ता चाले; व कोणी त्याचा शब्द मोडीत नसे. पण आतां येथें साताऱ्यास आल्यापासून तो प्रकार चालणें शक्य नव्हतें. परंतु त्याच्या त्या पूर्वसंवयीमुळें लोकांशीं वागतांना त्यास येथें पुष्कळ त्रास होऊं लागला. एकदां तर असा प्रसंग आला कीं, त्यांत त्याची अगदीं छान फजिती झाली ! एके दिवशीं बाळाची स्वारी चेंडू

उडवीत होती. उडवितां उडवितां एकदां चेंडू जोरानें उडाला व लगतच एकाचें मोकळें आवार होतें त्याच्या आंत जाऊन पडला. निवडुंगाचें कुंपण मध्यें होतें. पलीकडून एक मुलगा रस्त्यानें चालला होता. त्याच्या अंगावरचे कपडे असे तसेच होते. त्याला पाहून बाळ म्हणाला–" ए पोरा, तो पलीकडचा माझा चेंडू दे आणून आधीं मला!" पण तो मुलगा बाळाच्या म्हणण्याकडे मुळींच लक्ष न देतां व त्या चेंडूकडेही न पाहतां, तसाच पुढें चालला. तेव्हां बाळानें त्यास पुनः ओरडून म्हटलें–" अरे ए, माझा चेंडू आणून दे म्हटलें ना तुला? ऐकूं आलें नाहीं का?—"

तो मुलगा म्हणालाः–" हो, ऐकूं आलें कीं! ऐकूं न यायला मी काय बहिरा आहें?"

बाळः–" मग बहिरा नाहींस तर माझा चेंडू आणून दे आधीं! तसाच काय पुढें चालला आहेस!"

मुलगाः–" पण नाहीं मी तुझा चेंडू आणून देत! तूं कशासाठीं मला हें काम सांगतोस?"

या उत्तरानें बाळाला अर्थातच राग आला. तो म्हणालाः–" फार फाजीलपणानें बोलतोस, नाहीं का? तेथें येऊन एक चांगली मुसकाडींत देऊं का ठेवून?"

मुलगाः–" अहाहा! तोंड बघा, मुसकाडींत देणाराचें! द्या पाहूं मुसकाडींत!" त्याबरोबर बाळाचा संताप वाढला व त्या मुलाला शासन करण्याच्या उद्देशानें त्यानें त्या निवडुंगाच्या गर्दींत शिरून, पलीकडे उडी मारली. परंतु तेवढ्यांत त्याचा तोल गेला, व तो निवडुंगाचे पलीकडे एक चिखलाचें डबकें होतें त्यांत नेमका जाऊन पडला! त्यांतून निघण्याचा त्यानें पुष्कळ प्रयत्न केला, परंतु जेथें पाय टेकावा तेथें घसरावा किंवा पुनः चिखलांत खोल रुतावा, असें होऊन त्याला त्यांतून बाहेर कांहीं येतां येईना. मग त्याची दशा काय विचारावी? अंगांत सुरेख नवा रेश-

माचा कोट होता, तो चिखलानें भरून गेला! विजार तर सारीच भरली! एक जोडा चिखलांत कुठें पडला तो समजलाच नाहीं! आणि टोपी तर पहिल्याच धक्क्याला त्या घाण खातेऱ्यांत पडून तिला हात सुद्धां लाववेनासा झाला! ज्याला तोंडांत देण्याला बाळ पुढें सरसावला होता, त्या मुलानें तें सर्व पाहिलें. पहिल्या क्षणीं त्यास वाटलें कीं, यास ही बरी शिक्षा झाली; अशीच याची खोड मोडली पाहिजे! पण पुष्कळ प्रयत्न करूनही जेव्हां त्यास बाहेर येतां येईना, तेव्हां त्या मुलाचेंही मन द्रवलें, आणि तो त्याच्या मदतीस आला; व हात देऊन त्यानें त्यास बाहेर काढलें! या सर्व प्रकारामुळें बाळ तर पराकाष्ठेचा खजिल झाला, आणि एक शब्दही न बोलतां खालीं मान घालून परत घराकडे चालला. कर्मधर्मसंयोगानें गोविंदशास्त्री त्याच वेळीं त्या वाटेनें जात होते. त्यांनीं त्याला पाहिल्याबरोबर त्यांना वाटलें बाळाला खूप लागलें असावें. ते म्हणाले—" बाळ, काय झालें ? "

तेव्हां बाळानें हळूच उत्तर दिलें—" या डबक्यांत मी पडलों." तेव्हां गोविंदशास्त्र्यांस हसूं आलें; आणि ते म्हणाले—" हां, मी समजलों! त्या मुलाच्या तोंडांत देण्यास तूं चालला होतासना ? मीं पलीकडून तें ऐकलें. पण एकाद्या गरीबाच्या पोराच्या तोंडांत द्यायलासुद्धां अंगीं पुष्कळ शहाणपण असावें लागतें, हें तुझ्या आतां ध्यानांत आलें असेल! "

इतकेंच बोलून गुरुजी पुढें निघून गेले. बाळानें नंतर घरीं जाऊन आपले सर्व कपडे काढून ते धुण्यास दिले व दुसरे नवे घालून नित्याप्रमाणें तो गुरुजींकडे आला. दुसरे दिवशीं नेहमींप्रमाणें दुग्धपानाच्या वेळीं ओवरींत सर्वांची गांठ पडतांच गुरुजींनीं प्रश्न केला:—

" बाळ, कालच्या प्रसंगीं तुला कसें काय वाटलें रे! "

बाळ म्हणालाः—" कांहीं विशेष नाहीं गुरुजी. पण तो मुलगा कि नाहीं, फारच उद्धट होता. मीं त्यास पलीकडचा चेंडू आणून दे म्हटलें, तर तेवढें सुद्धां त्याच्यानें झालें नाहीं पहा! त्यामुळें मला त्याचा फार राग

आला हो ! ”

गुरुजीः—“ पण त्याला चेंडू आणून द्यायला तूं सांगितलेंस, तें काय म्हणून ? तुझा त्याचा काय संबंध ? ”

बाळः—“ संबंध म्हणजे ? भिकारडा कुणब्याचा पोर तो. त्यानें आमचें इनामदारांचें एवढें काम करायला नको का ? ”

गुरुजीः—“ म्हणजे ? इनामदारांचीं माणसें असलीं कीं, त्यांनीं गरीब कुणब्याच्या पोरांना हवें तें काम सांगावें व त्यांनीं तें केलेंच पाहिजे, असें तुला वाटतें कीं काय ? ”

बाळ जरा हळूच म्हणालाः—“ हो; मला वाटतें त्यांनीं केलें पाहिजे. ”

गुरुजीः—“ आणि तूं जर असा एखादा गरीबाचा मुलगा असतास, व तुला असेंच वाटेंत कोणीं इनामदारानें एकादें काम सांगितलें असतें, तर तें तूंही केलेंच पाहिजे होतें, असें झालें तर ? ”

बाळ या प्रश्नाला उत्तर देतांना जरा अडखळला. मग म्हणालाः—

“ तसें नाहीं गुरुजी. पण तो मुलगा निवडुंगाच्या पलीकडे होता, त्याला तो चेंडू मजकडे सहज फेंकून देतां येण्याजोगा होता; त्यांत इतकें कांहीं कठीण नव्हतें; म्हणून म्हटलें. ”

गुरुजीः—“ आणि त्यानें तसें केलेंही असतें; पण तूं त्यास सरळपणानें सांगितलें असतेंस तर ! पण जेव्हां कोणी माणूस मगरूरीनें कोणाला कांहीं सांगूं लागतो, तेव्हां त्याचें म्हणणें ऐकावें अशी बुद्धि प्रायः कोणालाही होत नाहीं. तरी पण जर तो मुलगा गरीबाचा होता, तर तूं त्यास चेंडू आणून देण्याबद्दल काय बक्षीस देणार होतास ? कीं देतों म्हणाला होतास ? ”

बाळः—“ नाहीं गुरुजी. मीं त्यास कांहीं बक्षीस दिलें नाहीं व देतों असें म्हणालोंही नाहीं. ”

गुरुजीः—“ तर मग तुजपाशीं त्यास देण्याला कांहीं नसेल वाटतें. ”

बाळः—“ नाहीं; मजजवळ पैसे वगैरे नव्हते, पण नुकतेच आईनें मला

दोन पेढे दिले होते खायला. ते माझ्या खिशांत होते खरे. ”

गुरुजी:–“ मग काय ? तो मुलगा श्रीमंताचा आहे, तो आपण दिलेला पेढा कदाचित् घेणार नाहीं, असें तुला वाटलें असावें. होय ना ? ”

बाळ:—“ नाहीं गुरुजी, तितका तो श्रीमंत नव्हताच. त्याच्या अंगांतला कोट फाटका होता, धोतर फाटकें होतें; व पायांतल्या जोड्याला किती तरी ठिगळें होतीं. तेव्हां मीं दिलेला पेढा त्यानें आनंदानें घेतला असता. ”

गुरुजी:—“ तर मग बाळ, तुम्ही इनामदारांचीं माणसें म्हणजे समजावयाचें तरी काय ? आपल्याला सर्व प्रकारचें खायला प्यायला असावयाचें, परंतु तें सर्व आपण आपल्यासाठीं राखून ठेवावयाचें, कोणास द्यावयाचें म्हणून नाहीं; गरिबांना वाटेल तेव्हां आपलें काम सांगावयाचें, पण त्याबद्दल त्यांस कांहीं द्यावयाचें नाहीं; आणि त्यांनीं तें केलें नाहीं कीं खुशाल त्यांच्या तोंडांत लगावावयाची ! त्यांनीं मेहेरबानी करून आपलें काम केलें, तर त्याबद्दल त्यांचे उपकार वगैरे कांहीं समजावयाचे नाहींत व मोबदला तर नाहींच नाहीं ! असें असलें म्हणजे तीं माणसें इनामदारांचीं ! होय ना बाळ ? अशीं इनामदारांचीं माणसें म्हणजे खरीं थोर माणसें होत, यांत शंका नाहीं. मग हरी, जे लोक इतरांच्या उपयोगीं पडतात, उपकारांबद्दल कृतज्ञ राहतात व प्रत्युपकार करतात, ते कांहीं खरे थोर म्हणता येणार नाहींत ! होय ना ? ”

बाळ मनांत विचार करूं लागला–“तर मग थोर माणसें कोणतीं बरें ?”

———



# १५ सशाची शिकार.

एके दिवशीं हरी आणि बाळ दोघे सहज फिरावयास जावें म्हणून घराबाहेर पडले; आणि पश्चिमेच्या बाजूनें शहरास लागून असलेल्या डोंगरांची शोभा पाहत, बोलत बोलत तिकडे चालले. तोंच एक ससा रस्त्याच्या कडेनें लपत लपत धांवत चाललेला हरीच्या नजरेस आला. त्याबरोबर हरी म्हणाला—" बाळ, हा पाहिलास का ससा ? आतां इकडून येऊन त्या लहानशा करवंदीच्या जाळींत शिरला. याच्या मागें कोणीतरी घोडेस्वार शिकारीसाठीं येत असला पाहिजे. त्याला आतां हा ससा बहुतेक सांपडणार नाहीं, व मला विचारलें तर त्यास मी तो कोठें गेला तें कधींसुद्धां सांगणार नाहीं."

हरी याप्रमाणें बोलत आहे तोंच कुत्रे मागून धांवत आले व त्यांच्या मागेंच एक तरुण घोडेस्वार त्या सशाच्या तपासासाठीं घोडा दवडीत येत असलेला दिसला. तो ससा कोठें दिसेना, कीं कोठून त्याचा सुगावा लागेना; यामुळें ते कुत्रेही उगीच इकडे तिकडे पाहात भुंकत राहिले. तेव्हां त्या गृहस्थानें हरीस विचारलें—" काय रे ए, आतां एक ससा येथून कोठेंसा गेला, तूं पाहिलास का ? " पण हरीनें यावर उत्तर दिलें नाहीं. मग त्या गृहस्थानें तोच प्रश्न पुनः मोठ्यानें विचारला.

त्यावर हरी म्हणाला:—" होय, मीं पाहिला. "

घोडेस्वार:—" मग तो कोणीकडे गेला, सांग ना ? "

थोडा विचार करून हरी म्हणाला:—" पण तें मला तुह्मांला सांगावयाचें नाहीं. "

घोडेस्वार:—" कां नाहीं सांगावयाचें ? "

हरी:—" तुह्मांला कशाला पाहिजे तें ? "

घोडेस्वार:–" कशाला म्हणजे ? मला त्याची शिकार करावयाची आहे!"

हरी:–“ मग ससे काय, मनुष्यांनीं त्यांची शिकार करावी म्हणून देवानें जन्मास घातले आहेत ? ”

घोडेस्वार:—“ नाहींतर कशासाठीं घातले आहेत ? ”

हरी:–“ मनुष्यांप्रमाणेंच त्यांनींही खावें, प्यावें, हिंडावें, फिरावें, म्हणून त्यांना देवानें जन्माला घातलें आहे ! ”

घोडेस्वार:—“ तुला हें ज्ञान कोणीं शिकविलें ? तुला कधीं देव स्वतः भेटला होता काय ? ”

हरी:—“ याला देव स्वतः भेटावयाला कशाला पाहिजे ? थोडासा विचार केला तर हें कळण्याजोगें आहे.”

घोडेस्वार:–“ तूं फार शहाणा दिसतोस. पण तुझें शहाणपण मला आतां पुरे. तो ससा कोठें गेला तें सांग चटकन् ! ”

हरी—“ तें मी तुह्मांला सांगणार नाहीं. कारण तुह्मी त्याचा प्राण घेणार हें मला माहीत आहे. ”

घोडेस्वार—“ नाहीं सांगत ? देऊं का एक चाबूक ठेवून ? नाहीं तर सांग लौकर ! फाजील पोर ! ”

यावर हरीनें पुनः सरळपणें ‘ नाहीं ’ हें उत्तर दिलें. तेव्हां घोडेस्वार म्हणाला, “ थांब, मी तुला आतां एका क्षणांत सांगावयास लावतों ! मुरदाड कार्टें ! ” आणि असें ह्मणून तो घोडेस्वार तात्काळ खालीं उतरला आणि त्यानें हरीला भराभर कोरडे मारण्यास सुरवात केली ! तोंडानें पुनः पुनः त्यास म्हणत राहिला–“ सांगतोस कीं नाहीं ? आतां तरी सांगतोस कीं नाहीं ? बोल ! का लगावूं एक आणखी ! ”

त्यावर हरीनें एकच उत्तर चालू ठेविलें—“ नाहीं सांगणार. तुह्मी माझा प्राण जरी घेतलात, तरी मी तुह्मांला तें सांगणार नाहीं ! ” आणि एकहि पाऊल मागें न सरतां जागच्या जागीं तो त्याचा मार घेत राहिला ! बाळू रडूं लागला व ओरडूं लागला. पण त्या उद्दाम मनुष्याला कोणा-

चाहि द्रव न येऊन, हरीवर त्याचे तडाखे चालूच राहिले ! तोंच सुदैवानें रस्त्यानें दुसरा एक गृहस्थ घोड्यावरून चाललेला दौडत तेथें आला, आणि त्या पाहिल्या गृहस्थाला म्हणाला–" अहो, तुम्ही हें काय करतां ? तें पोर मरेल ! कांहीं विचार करा ! खून करावयाचा आहे काय ? "

कोरडा थांबवून तो गृहस्थ ह्मणाला—" अहो, हें कार्टें तसें फाजीलच आहे. आमचा ससा इकडून गेलेला यानें पाहिला असून, मला ह्मणतो–मी तुह्मांला सांगत नाहीं ! "

त्यावर तो गृहस्थ जरा शांतपणानें ह्मणतो—" तरी जरा संभाळून ! त्या पोराचा जिव केवढा हें तर पाहिलें पाहिजे ! लोक तुह्मांला काय ह्मणतील ? त्याला पोर ह्मणतील पण तुम्हांला दोष देतील. तो त्याच्या जवळचा मुलगा तर तात्यासाहेब इनामदारांचा आहे हें तुह्मांला ठाऊक आहे ? "

नंतर तो गृहस्थ हरीकडे वळून म्हणाला–" उगा बाळ. तूं ससा पाहिलास ना ? मग सरळ सांगावें कीं नाहीं ? नाहीं कशाला म्हणालास ? "

हरीला मार बरीच बसला होता. त्या गृहस्थाच्या प्रश्नाला त्यामुळें त्याला लागलींच उत्तर देतां येईना. पण जरा वेळानें पूर्वस्थितीवर येऊन तो ह्मणाला–" असें कसें बरें ? तसें मीं यांस सांगितलें तर त्या बिचाऱ्याचा मीं एक प्रकारें विश्वासघातच केल्यासारखें नाहीं का होणार ? "

हें उत्तर ऐकून तो गृहस्थ त्या घोडेस्वारास ह्मणतो–" हा मुलगा फारच थोर दिसतो. तथापि याचें धैर्य जितकें थोर आहे, तितका तो वयानें मोठा नाहीं हेंही तुमचें एक नशीबच मी समजतों. कारण, तुम्ही तर फार उद्धट आणि उतावळे दिसतां ! इतका अविचार योग्य आहे काय ? "

इतकें बोलणें होत आहे तों त्याचे दोन्ही कुत्रे एकदम भुंकूं लागले; व दूर कांहीं एक जनावर पाहून तिकडे धांवत गेले. त्याबरोबर तो गृहस्थही आपल्या घोड्यावर आरूढ होऊन त्यांच्या मागें निघून गेला. दुसरा गृहस्थही आपल्या मार्गें चालूं लागला.

ते निघून गेल्यानंतर बाळ हरीच्या अगदीं जवळ येऊन त्यास मोठ्या प्रेमानें व कळवळ्यानें म्हणाला—" हरी, तुला किती रे दुःख झालें ! आतां काय बरें करावयाचें ? "

हरी म्हणाला—" कांहीं विशेष नाहीं. थोडासा त्रास झाला खरा; पण त्याचें काय महत्व आहे ? व त्याला कशाला कांहीं करावयास पाहिजे ? "

बाळ—" मला त्या वेळीं अगदीं असें झालें कीं, कोठून तरी एखादा भाला किंवा बरची आणावी व त्या घोडेस्वाराच्या पाठींत मारावी ! पण काय करावें ? आमचें घर दूर पडलें रे ! "

हरी—" वा ! अशी बरची तूं त्यास मारतास, तर त्यास केवढी तरी दुखापत झाली असती ! कदाचित् त्याचा प्राण गेला असता ! "

बाळ—" मग काय बिघडलें असतें ? तो दुष्ट माणूस, त्यानें तुला इतकें मारलें, तो मेला असता तर छान झालें असतें ! "

हरी—" मग तर तूं फारच चुकतोस. कारण त्यानें जरी मला मारलें, तरी माझा जीव घ्यावयाचें कांहीं त्याच्या मनांत नव्हतें; आणि मी जर मोठा माणूस असतों, तर तो असें कांहींच न करता. पोर म्हणून त्यानें एवढें अवसान केलें, इतकेंच. पण आतां काय, झालें तें होऊन गेलें. आपल्याला आपले गुरुजी नेहमीं सांगतात ना ?—दुष्टांबद्दल सुद्धां मनांत द्वेष बाळगूं नये; उलट त्यांच्याशींही सरळपणानेंच वागावें. म्हणजे तेच खरोखर आपल्या दुष्कृतीबद्दल लाज वाटून, आपणावर उलट प्रेमच करूं लागतील. त्यांच्या तोंडचा एक श्लोक मला आठवतो—

**अक्रोधेन जयेत्क्रोधं असाधुं साधुना जयेत् ।**

बाळ—" पण काय रे हरी, इतक्या चपराका त्यानें मारल्या, तरी तूं अगदीं न ओरडतां निमुटपणें कशा रे सहन केल्यास ? "

हरी—" कां बरें ? आरडाओरडा करून कांहीं उपयोग नाहीं हें उघडच होतें. होता का कांहीं ? व हें एवढें सोसणें म्हणजे काय ? आपल्या-

कडे पूर्वी लोकांनीं जे हाल व जीं दुःखें सोसलीं आहेत, त्यांच्यापुढें याची किंमत कांहींच नाहीं. शिवाजीमहाराजांच्या वेळीं आपल्या इकडच्या मावळे लोकांनीं किती काटकपणानें दिवस काढले व किती हालअपेष्टा सहन केल्या आहेत! तेव्हां मराठ्यांचें राज्य या सातान्यास स्थापन झालें! आहे तुला ठाऊक? शिवाजीमहाराजांची बखर तूं वाचली नाहींस. नाहीं तर तूं सुद्धां म्हणाला असतास कीं शाबास त्यांची. आणि तिकडे उत्तरहिंदुस्थानांत रजपुतांसारखे खरे पराक्रमी वीर दुसऱ्या कोठेंहि आढळावयाचे सुद्धां नाहींत असें म्हणतात. राणा प्रतापसिंह म्हणून एक होऊन गेला, त्याच्या गोष्टी तिकडे फार लोक सांगतात, त्या सर्व आपल्या गुरुजींना ठाऊक आहेत. त्या त्यांनीं मला सांगितल्या आहेत. त्यावरून मला तरी ठाऊक. तो राणा एवढा सर्व देशाचा राजा, परंतु तो नेहमीं रानांत राहात असे. साधी भाकरी व मीठ हें त्याचें जेवण असे. कशाचें तरी पान घेऊन त्यावर तो जेवी. सोन्याचीं, रुप्याचीं किंवा साधीं पितळेचीं भांडीं सुद्धां तो वापरीत नसे. आणि निजावयाचें झालें म्हणजे रानांत उगवलेलें गवत हा त्याचा बिछाना! केवढी थोर गोष्ट त्यानें केली, ती तुझ्या आतां ध्यानांत येईल. सर्व रजपूत लोक अगदीं या प्रकारचे. ते संख्येनें फार थोडे असून, मुसलमानांच्या खूप प्रचंड सैन्याशीं त्यांना लढावयाचें होतें. त्यामुळें ते स्वतः सर्व असेच काटक व मोठे धैर्यवान बनले असून ते आपल्या मुलांना सुद्धां असेंच शिक्षण लहानपणापासून देत. जोर, बैठका, दांडपट्टा, कुस्त्या, धांवणें, डोंगर आणि कडे चढणें हें त्यांस अगदीं लहानपणापासून शिकवीत. आणि जेवावयाला डाळ आणि रोटी; दुसरीं सोंगें अगदीं नसत. यामुळें त्यांचीं मुलें सुद्धां अतिशय कणखर असत, आणि तीं कोणास कधीं भीत नसत, कीं कधीं कोणापुढें नमत नसत."

बाळ म्हणाला—"तर मग ते फारच शूर लोक होते म्हणावयाचे! हरी, राणा प्रतापसिंह गाडींतून किंवा टांग्यांतून कधीं जात नसे काय रे?"

हरी—छे ! राणा प्रतापसिंहाला गाडी कोठली आणि काय कोठली ?"

बाळ—" पण त्या रजपूत लोकांच्या मुलांना तरी बसावयाला गाड्या असतील, नाहीं ? खायला पेढेबर्फी आणि अंगावर छत्री धरावयाला शिपाई हे त्यांस होते कीं नव्हते ?"

हरी—" छे ! नांव नाहीं. असें केलें तर आपलीं मुलें बिघडतील असें त्या लोकांना वाटत असे. नाहींतर तूंच सांग बाळ, असें केलें तर आपण तरी काटक व मेहनती कसे होऊं बरें ? गुरुजी मला सांगत होते कीं, शिस्तींत व हुकमांत वागावयाची त्या लोकांना मोठी संवय. आणि जर कोणी थोडेंसें शिस्तीचें उल्लंघन करील, तर त्यास चाबकाचा मार खावा लागे. तरी पण बाळ, ते चाबूक घेतांना तीं मुलें कांहीं गयावया करावयाचीं नाहींत. नुसतीं ओरडावयाचीं नाहींत, कीं फक्त तोंड देखील वांकडें करावयाचीं नाहींत ! केवढें तरी मोठें त्यांचें धैर्य हें !

त्यांचें असें बोलणें चाललें आहे तोंच दुरून त्यांना एक मोठा ओरडा ऐकूं आला. पाहतात तों एक घोडा खूप वेगानें धावत चालला असून त्याच्यावरचा स्वार खालीं कोलमडून, पडतां पडतां त्याचा पाय रिकिबींत अडकून राहून तो त्याच्याबरोबर फरपटत, घांसत व ठेचाळत चालला आहे ! ते पाहूं लागतात तों घोड्याच्या पुढच्या अंगास एक टेकडी येऊन ठेपल्यामुळें त्यास धावावयास मार्ग नाहींसा होऊन तो घोडा थबकला आणि तो घोडेस्वारही पुढें फरफटत जाण्याचा त्यामुळें थांबला. सुदैव एवढेंच कीं, नुकताच पाऊस पडून गेल्यामुळें जमीन ओलसर व मऊ होती व त्या माळावर खडक व ओघळी फारशा नव्हत्या. त्यामुळें त्या इसमास कांहीं फारशी इजा किंवा दुखापत होऊं शकली नव्हती. पण हा प्रकार पाहून हरीला फार वाईट वाटलें. असल्या प्रसंगीं पुढें होतांना हरीला आपल्या जिवाची फारशी काळजी कधींच वाटत नसे. तो धावतच त्या घोड्याकडे गेला; व निर्धास्तपणें पुढें होऊन मोठ्या चपळाईनें त्यानें त्याचा लगाम पकडून

त्यास तेथेंच उभें केलें ! तोंवर ती दंगल ऐकून दुसरे एक दोन गृहस्थ तेथें आले, व त्यांनीं त्या घोडेस्वाराचा पाय रिकिबीतून हळूच काढून त्यास मोकळें केलें व त्यास उचलून नीटपणें बसविलें. मघांचा ससाची शिकार करणारा घोडेस्वार तो हाच होता. तो आरंभीं तर किंचित्काळ भ्रमिष्टासारखाच पाहत राहिला. मग लौकरच भानावर येऊन पाहतो तों समोर आपल्या घोड्याचा लगाम धरून मघांचाच मुलगा उभा आहे ! तो प्रथम घोड्यास पाहून संतापून म्हणाला–' आतां याची कणीक चांगलीच मऊ केली पाहिजे. ' नंतर जवळच्या मंडळीस म्हणाला–' या बुजलेल्या घोड्याला कोणीं बरें धरून उभा केला ? त्याचा मजवर केवढा उपकार झाला ! "

त्याबरोबर शेजारचा एक गृहस्थ त्यास म्हणाला–" कोणीं उभा केला तें समोर पहा, म्हणजे कळेल. थोड्या वेळापूर्वीं ज्याच्याशीं तुह्मी अत्यंत लाजिरवाणें वर्तन केलें, तोच मुलगा हा. त्यानें जर या वेळीं एवढें धैर्य केलें नसतें, तर गृहस्था, लक्षांत ठेव, तुझ्या डोक्याची कवटी इतकी धड कधीं राहिली नसती; तिच्या शेंकडों ठिकऱ्या उडाल्या असत्या ! "

या गृहस्थानें मघाशीं रस्त्यावर झालेला प्रकार दुरून अवलोकन केलेला होता, व त्या वेळींच त्याला हरीचें प्रेम वाटू लागलें होतें. त्या गृहस्थाचें तें खोंचक उत्तर ऐकून त्या घोडेस्वाराचा चेहरा पुष्कळच उतरला व त्यास आपल्या करण्याची लाज वाटूं लागली. नंतर समोर हरी उभा आहे असें पाहून त्यानें आपले खिशांतून एक रुपया काढला, आणि तो हरीपुढें करून म्हणाला:—" हें घे बाळ तुला. मघांशीं माझ्याकडून जरा घसरलेंच, तें आतां तूं मनांत आणूं नकोस ! "

स्वारानें हात पुढें केल्याबरोबर हरीनें काय केलें ? तो एकदम बाजूस झाला; आणि त्या गृहस्थाकडे परत धिक्कारानें पाहून, कांहींच न बोलतां, आपल्या वाटेनें चालूं लागला ! बाळही त्याच्या मागोमाग गेला !

---

# १६ मोठें काम

पुढें एके दिवशीं बाळानें पहाटेस लौकर उठून, आपले सर्व प्रातर्विधि–स्नान, संध्या, नमस्कार वगैरे–आवरले; आणि दिसावयास लागतांच तो देवालयांत आला. नंतर ८।९ वाजेपर्यंत झटून मन लावून, खणून त्यानें एक सुरेख वाफा तयार केला. नंतर दुग्धपानासाठीं जेव्हां ओवरींत सर्वजण आले, त्या वेळीं गुरुजींस त्यानें मोठ्या उत्कंठेनें विचारलें:—

" गुरुजी ! आज मीं मोठें काम केलें कीं नाहीं ? मीं इतका वेळ झटून व खणून एक सुरेख वाफा तयार केला आहे; आणि आतां त्यांत लौकरच मी कांहीं तरी धान्य पेरणार आहें. "

गुरुजी:—हें तुझें ' मोठें काम ' झालें कीं नाहीं हें सांगावयाचें–तर प्रथम हें सांग कीं, तूं त्या वाफ्यांत जें काय पेरणार, त्याचें पुढें काय करणार ?

बाळ:—मी आतां त्यांत जोंधळा पेरणार; मग कांहीं दिवसांनीं तो उगवून मोठा झाला म्हणजे मग त्यास कणसें येतील; मग तीं भाजून मीं त्यांचा हुरडा करून खाईन. हुरडा किती सुरेख व गोड लागतो पण !

गुरुजी:—छान. पण तुला स्वतःलाच हुरडा खाण्यास मिळावा म्हणून जर तूं हें करणार असलास, तर यांत ' मोठें काम ' काय आहे ? सर्व लोक जें करतात तेंच तूं केलेंसें होईल ! अधिक काय ? आणि असें जर तूं केलें नाहींस, तर तुला दुसरा कोण हुरडा आणून देईल ? ज्यानें त्यानें स्वतःची सोय आपण स्वतःच केली पाहिजे.

बाळ:–पण सगळे लोक करतात म्हणजे काय ? त्यांनीं तें केलेंच पाहिजे. ते सारे काय आमच्यासारखे श्रीमंत इनामदार आहेत थोडेच !

गुरुजी:—म्हणजे काय ? इनामदारांना इतर लोकांप्रमाणें खायला अन्न लागत नाहीं कीं काय ? आणि ज्वारी कशी पेरावी वगैरे माहितीची त्यांना आवश्यकता नाहीं कीं काय ? थांब, यासंबंधाची एक सुरेख गोष्ट मीं ऐकिली आहे ती तुला सांगतों. म्हणजे तुला हा विषय चटकन समजेल.

# १७ अमेरिकेचा प्रवास.



त्यानंतर त्यांनीं पुढील गोष्ट सांगण्यास सुरवात केली.—

" अमेरिकेमध्यें सोन्याच्या पुष्कळ खाणी आहेत. त्यामुळें तिकडे जाऊन खाणींतून खणून पुष्कळ सोनें काढून घेऊन आपण श्रीमंत व्हावें, असें एकदां कित्येक लोकांच्या मनांमध्यें आलें व असे बरेच लोक त्यासाठीं जलपर्यटनास निघाले. त्यांत एक घनासिंग नांवाचा रजपूत मनुष्य होता. त्याच्याही मनांत आलें कीं, येथें कांहीं तरी करीत दारिद्र्यांत दिवस काढ-ण्यापेक्षां आपणहि अमेरिकेस जावें व आपल्या दैवाची परीक्षा पहावी. त्याचा एक भाऊ होता त्याचें नांव कामासिंग. त्याच्याकडे तो गेला आणि त्यास आपला बेत सांगून म्हणाला:—"दादा, तूं माझ्याबरोबर चल. माझें कांहीं-ही काम तूं नाहीं केलेंस, तरी चालेल. मला जें सोनेंरुपें सांपडेल त्यांतलें निम्में मी तुला खास देईन. पण तूं मजबरोबर असावेंस असें माझ्या मनांत फार आहे. "

त्याचा भाऊ समाधानी वृत्तीचा होता. सोनें मिळवावें व आपण श्रीमंत व्हावें या गोष्टीची त्यास फारशी चाड नव्हती. शिवाय त्याच्या ठिकाणीं दूरदृष्टि अधिक होती. त्यामुळें त्याला ही कल्पना फारशी आवडली नाहीं. म्हणून, असलें धाडस करण्यामध्यें किती अडचणी येणार आहेत व सर्व गोष्टी कशा बिनभरंवशाच्या आहेत, तें त्या आपल्या भावास सांगून त्याचें मन त्यापासून परावृत्त करण्याचा त्यानें प्रयत्न केला. परंतु त्याचा कांहीं उप-योग झाला नाहीं. तेव्हां त्याजबरोबर जाण्याला तो तयार होऊन म्हणाला:— " भाऊ, मी तुजबरोबर येतों. आतां, तूं कांहीं मिळवून आणशील त्यांतला वांटा मला नको; तो तुलाच असूं दे, आणि माझें मला असूं दे. पण एवढें कर कीं, माझें कांहीं थोडें सामान आहे तें व माझीं कांहीं गुरें व माणसें

यांची तुझ्या जहाजावर सोय कर. माझी तयारी आहे."

याप्रमाणें वडील बंधूची संमति मिळाल्याबरोबर धनसिंगास आनंद झाला. मग त्यानें आपल्याजवळ होतें तें चटसारें विकून त्याचें एक जहाज घेतलें; आणि दुसरे जे कित्येकजण अमेरिकेस जाऊन सोनें मिळवून एकदम श्रीमंत होण्याच्या नादांत होते, त्यांना बरोबर घेऊन तो आपल्या प्रवासास निघाला. कामसिंग बरोबर होता, पण त्यानें सोनें काढण्यासाठीं टिकाव, सुरुंग वगैरे कांहीं बरोबर अर्थातच न घेतां, ५।४ नांगर घेतले; ५।४ कुळव घेतले; आणि निरनिराळ्या धान्यांचें कांहीं बी, बटाटे व दुसरे कांहीं भाजीपाले पेरण्यासाठीं बरोबर घेतले. तसेंच ४।५ बैल, २।४ गाई, कांहीं शेळ्या व दहापांच गडी हेही त्यानें घेतले. ही आपल्या दादाची तयारी पाहून धनसिंगास वाटलें कीं, हा किती चमत्कारिक आहे ? सोनें मिळवावयास जायचें, तिथें हें लोढणें बरोबर कशाला ? आणि हें कोणीं सांभाळावें ? पण 'वडील भाऊ आहे, त्यास आपण कशाला बोलावें ?' या विचारानें तो त्यास या वेळीं कांहीं बोलला नाहीं.

सर्व मंडळी वाटेला लागलीं. वारा चांगला मिळाला व जहाज वेगानें चालूं लागून लौकरच वाटेंतील एका बंदरास लागलें. तों तेथें धनसिंग उतरला; व खणण्यासाठीं, सोनें वितळविण्यासाठीं व तें शुद्ध करण्यासाठीं आणखी कित्येक साधनें त्यानें गोळा करून आपल्या बरोबर घेतलीं. व मेहनतीसाठीं कित्येक मजूर, त्यांचा रोज द्यावयाचें ठरवून, बरोबर घेतले. कामसिंगानें आणखी दोन बैल, दोन गाई आणि कांहीं थोडें धान्य त्या बंदरांतून खरेदी करून घेतलें. पुढें लौकरच ती सर्व मंडळी सुखरूपपणें अमेरिकेच्या किनाऱ्यास लागलीं. किनाऱ्यावर उतरतांच कामसिंग आपल्या धाकट्या भावाला ह्मणाला—"भाऊ, मीं येथवर आलों तो केवळ तुझ्याबरोबर असावें म्हणून. आतां आपण किनाऱ्यास आलों; आतां तुम्ही आपल्या उद्योगास कोठें जाणें तिकडे जा. मी येथेंच राहतों. पुरेसें सोनें

तुम्हांस मिळाल्यानंतर तुह्मी परत या; मग आपण सर्व जण जहाजांत बसून आपल्या देशास परत जाऊं. ”

हें भाषण ऐकून धनसिंगास फारच चमत्कार वाटला. तो आपल्या मित्रांना ह्मणला—“ मला आजवर वाटत असे कीं, माझा दादा मोठा शाहाणा आहे; पण तो तर अगदींच वेडा दिसतो ! तेव्हां याच्यासंबंधांत माझी व आपली सर्वांची फारच मोठी चूक झाली. या ठिकाणीं आतां हा आपले बैल व गाई घेऊन काय करणार आहे कोण जाणे ! त्याला वाटत आहे कीं, आपण जणूं आपल्या देशांतच आहों; आणि जणूं काय शेतीची पेरणीची वेळ झाली आहे. आतां हा ज्वारी लावणार आणि हुरडा खात बसणार आहे ! नाहींतर काकड्या व कलिंगडें झोडणार आहे ! आतां याच्या म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं. इतक्या दूर देशास येऊन काकड्या खात बसणें म्हणजे प्रवास फुकट घालविणें आहे ! चला, आपण आपल्या सोन्याच्या खाणींचा तपास करूं. आपली मोहीम साधली तर आपण एकदम इतके श्रीमंत होऊन बसूं कीं, जन्मभर मग आपणांस कशाची ददात म्हणून राहणार नाहीं ! ”

धनसिंगाचें हें भाषण ऐकून, त्याच्या सर्व मित्रमंडळीस आनंद झाला. ते म्हणाले:—“ बरोबर ! बरोबर ! धनसिंग, आम्ही सर्वजण तूं जाशील तिकडे येण्याला अगदीं तयार आहों. कामासिंगाला एक नसेल, पण आम्हां सर्वांना सोनें मिळवून श्रीमंत व्हावयाचें आहे.”

तोंच एक वृद्ध गृहस्थ पुढें होऊन म्हणाला—“ धनसिंग, मला संशय वाटतो. तुझा भाऊ तूं ह्मणतोस तितका अडाणी आहे असेंच शेवटीं आपल्याला दिसून येईल, कीं कांहीं निराळेंच ठरेल, कोण जाणे ! ” पण त्याच्या या ह्मणण्याला आतां कोणी फारसें महत्व दिलें नाहीं; सर्व जण पुढें निघाले. नंतर त्यांनीं पुष्कळ प्रवास केला. त्यांत त्यांना कित्येक नद्या ओलांडाव्या लागल्या; कित्यक डोंगर चढावे लागले; कित्येक पठार तुडवावे

लागले व घनदाट अरण्यांतून रस्ता न सांपडल्यामुळें खूपच हिंडावें लागलें! कित्येक वेळां उन्हांतुन फिरतांना पाण्यावांचून त्यांचे प्राण कासावीस झाले; व कित्येक वेळां भयंकर जोराच्या पावसांत सांपडून त्यांना गारांचा मार खावा लागला व भिजून चिंब व्हावें लागलें! पण इतकी दुर्दशा उडाली असताही सोन्याच्या खाणीच्या शोध करण्याचें काम त्यांनीं तसेंच नेठानें चालविलें. शेवटीं त्यांस ती खाण एकदांची सांपडली. आणि सुदैवानें त्या सर्वांना भुरपूर सोनें त्या ठिकाणीं लाभलें! ही खाण सांपडतांच त्यांचा जोर दुणावला, आणि त्यांनीं खणण्याचें व सोनें शुद्ध करण्याचें काम चिकाटीनें सारखें चालू ठेविलें. पण इतकें होत आहे, तों इकडे त्यांची बरोबर आणलेली शिदोरी संपली! अर्थात सांपडतील तीं झाडांचीं मुळें व फळें खाऊनच त्यांस आपला गुजारा करण्याची आतां पाळी आली! पण पुढें पुढें तर तींहीं मिळेनातशीं होऊन, अखेर त्यांच्यांतील कित्येक लोक अन्नावांचून उपाशीं मरूं लागले. कित्येक तर भुकेनें तळमळून तेथेंच प्राणांसही मुकले! तेव्हां त्यांचा अगदीं नाइलाज झाला. मग त्यांनीं ती खाणी खणण्याचा उद्योग थांबवून, जमलेलें सोनें बरोबर बांधून घेऊन परत जावयाचें ठरविलें. पण तेवढ्यापुरतें तरी त्यांजपाशीं अन्न कोठें होतें? त्यामुळें अन्नावांचून, कसे तरी बसत उठत, ते किनाऱ्यावर जेथें कामासिंग राहिला होता तेथवर, जेमतेम येऊन ठेपले.

यांचा सोनें संपादन करण्याचा उद्योग चालला असतां, इकडे कामासिंग काय करीत होता? पुढचें संकट त्याच्या आधींच ध्यानांत आल्यामुळें त्याच्या निवारणासाठीं, तो एका निराळ्याच दृष्टीनें उद्योग करीत राहिला. त्याला शेतीची चांगली माहिती असल्यामुळें त्यानें लागलीच जवळची एक पुष्कळ विस्तृत व चांगली पिकाऊ जमीन पाहून, आपण व आपले बरोबरीचे दहापांच इसम मिळून ती नांगरली, आणि बरोबर आणलेले बटाटे व दुसरें धान्य, खाण्यास थोडें मागें राखून, त्या ठिकाणीं पेरून दिलें.

थोड्याच दिवसांत तें पीक अतिशय भरारून येऊन, शेवटीं त्यापासून बटाटे व इतर धान्य त्याच्या अंदाजापलीकडे त्यास प्राप्त झालें! तसेंच बरोबरच्या गाई व शेळ्या त्यानें एका जवळच्या कुरणांत चरावयास सोडल्यामुळें त्यांपासून भरपूर दूध त्यास मिळूं लागून, त्यांतल्या कित्येक गाई व शेळ्या व्याल्या; व त्यायोगें त्याच्या गुरांची संख्याही वाढली! समुद्रकांठच असल्या-मुळें त्यानें तेथें एक मिठागर तयार केलें; आणि एकंदरींत भाजी, भाकरी आणि मीठ यांची भरपूर सोय करून ठेवली.

धनसिंग येऊन पोंचतांच कामसिंगानें त्याला मोठ्या प्रेमानें आलिंगन देऊन, तुमच्या कामाचें काय झालें म्हणून प्रश्न केला. तेव्हां धनसिंग म्हणालाः—" दादा, आमचें काम चांगलें साधलें. आम्हांला सोनें भरपूर प्राप्त झालें. पण अन्नावांचून आमच्यांतील कित्येकजण प्राणांस मुकले; आणि आम्ही येथें जेवढे आलों आहोंत, ते सुद्धां भुकेनें व्याकुळ होऊन मरणोन्मुख झालेले आहोंत. तर आतां दादा, आम्हांला आतां आधीं चटकन् कांहींतरी खायला दे. गेले संबंध तीन दिवस आमच्या पोटांत अन्नाचा एक घास गेलेला नाहीं. झाडांचीं पानें खात खात आम्ही कसे-बसे येथवर जिवंत आलों एवढेंच. तर ऊठ लौकर आणि थोडीशी भाकरी आण बरें."

यावर कामसिंग शांतपणानें म्हणाला—" अरे भाऊ, आपलें आधींच काय ठरलें आहे बरें? तुम्ही सोनें आणण्यास निघालां, तेव्हां तुझें माझें काय बोलणें झालें होतें त्याची आठवण कर बरें?— कीं, कोणीं कोणाच्या मिळकतींत वाटा मागूं नये. तूं जें सोनें मिळवून आणशील त्यांतल्या एकाही कणाची मला इच्छा नाहीं, हें मीं तुला त्याच वेळीं सांगितलें होतें! असें असतां आतां कष्ट करून, जमिनी लागवडून मीं जें धान्य उत्पन्न केलें तें तुला मिळावें अशी तूं अपेक्षा करतोस, याचें मला आश्चर्य वाटतें! पण आतां मला तुला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, जर तूं

आपलें सर्व सोनें मला द्यायला तयार असशील, तर मी कदाचित् तुझी व तुझ्या माणसांची कांहीं सोय पाहीन."

हें ऐकून धनसिंगास अर्थातच राग आला. आपल्या भावानें आतां अगदीं माणुसकी सोडली, आणि सुवर्णलोभाच्या पायीं त्याला आतां आपला भाऊसुद्धां ओळखत नाहींसा झाला, असें त्याच्या मनांत आलें. पण करणार काय ? त्याचा निरुपाय झाला. तो व त्याचे सोबती भुकेनें इतके व्याकूळ झाले होते कीं, त्यांना ती कामसिंगाची अट मुकाट्यानें कबूल करावी लागली ! मग आणलेलें सोनें त्याच्या पदरांत टाकून, एका वेळेपुरतें जेवण त्यांनीं मिळविलें व रात्रभर तेथेंच पडून झोंप काढली. मग सकाळीं उठतांच कामसिंग त्यांस म्हणाला—" भाऊ, आतां आपण सर्वांनीं जहाजांत बसून आपल्या देशास निघावयाचें ना ? येतोस ना आतां आपल्या घरीं ? वारा कसा अनुकूळ आहे पहा."

धनसिंग अर्थातच रागावलेला होता. तो म्हणाला—" जा; दादा, तुझा तूंच एकटा पुढें जा. तूं आमच्याजवळचें सारें सोनें असें अडवून, आमच्यापासून लुबाडून घेऊन बसलास; आणि आमच्याशीं इतका माणुसकी सोडून वागलास, त्या तुजबरोबर आतां मीं यावें होय ? त्यापेक्षां येथेंच या समुद्रकांठीं मरावयाची वेळ आली तरी काय वाईट ? जा तूं ! पुरे तुझी बंधुप्रीति !"

हें उत्तर ऐकून, कामसिंग न संतापतां बंधूजवळ जाऊन व त्यास प्रेमानें हृदयाशीं धरून म्हणाला—" माझ्या बाबा धनसिंगा, तुला हें सर्व खरेंच का वाटलें ?--कीं, तूं इतक्या अनेक दुर्धर हालअपेष्टा भोगून जें सोनें संपादन करून आणलेंस, तें तुजपासून लुबाडून घ्यावें असा माझा विचार खरोखर आहे ? मीं तुझ्याशीं अशा कठोरपणानें खरोखरच वागावें, त्यापेक्षां मला वाटतें या एवढ्याचशा काय, पण साऱ्या जगांतल्याही सोन्यालाही आग लागो ! छे छे ! अरे, सोन्याचा तुझा हव्यास किती वेड्यासारखा

आहे हें दाखवून तुला शहाणा करावा व असेल तेथें तुझ्या उपयोगास यावें, इतकाच यांत माझा हेतु होता. तुला मीं प्रथम हा सर्व दूरदृष्टीचा विचार सांगितला, पण तो तुला आवडला नाहीं. तुला वाटलें, आपल्याला सोनें मिळणार, आपण खूप श्रीमंत होणार; मग आपणांस आतां दुसरी कशाची गरज आहे ? पण आतां तुला कळून आलें कीं, जमीन नांगरून धान्य पेरण्याची हयगय केल्यास, तूं जें इतकें सोनें बरोबर आणलें आहेस तेंही भुकेनें मरावयाच्या वेळीं प्राण वांचवूं शकत नाहीं. आतां तूं पूर्वीपेक्षां अधिक शहाणा झाला आहेस. तुझें तूं आपलें सर्व सोनें परत घे. आतां तें मला काय करावयाचें आहे ? त्याचा खरा उपयोग किती थोडा आहे हें आतां तुला कळून चुकलें आहे."

आपल्या भावाचें हें भाषण ऐकून व त्याच्या मनाचा एवढा थोरपणा पाहून धनसिंगास फार नवल वाटलें व त्याचें अंतःकरण कृतज्ञतेनें भरून आलें. सोन्याचा संग्रह करण्यापेक्षां शेतकी करतां येणें हेंच खरोखर आवश्यक आहे हें त्याला आतां कळलें. नंतर ते सर्व जहाजांत बसून आपल्या देशास येऊन पोंचले. वाटेंत धनसिंगानें कामासिंगास वारंवार विनंति केली कीं, यांतील थोडें तरी सोनें तुझ्याजवळ राहूं दे. पण कामासिंगानें तें ऐकिलें नाहीं. तो म्हणाला—" ज्याला शेत नांगरून आपल्या पोटापुरतें धान्य उत्पन्न करतां येतें, त्याला सोन्याची गरज काय ? "

* * *



याप्रमाणें गोष्ट संपल्यावर गुरुजी म्हणाले— बाळ, यावरून निरुद्योगी श्रीमंती चांगली कीं कष्टाळू शेतकी चांगली, याचा विचार कर बरें !

# १८ पोपटाची सलगी.

एके दिवशीं हरी आपल्या घरून गुरुजींकडे शिकावयास आला, त्या वेळीं, पूर्वीं त्यानें जो पोपट बोक्याच्या तोंडून सोडवून घरीं नेऊन सांभाळला होता, त्यास सहज बरोबर आणलें. आतां तो पोपट अगदीं साफ बरा झाला होता, व हरीशीं त्याची आतां पुष्कळ सलगी झाली होती. तो आतां त्याच्या अंगावर बसे; खांद्यांवरून टुणटुण उडे; मनगटावर येई, आणि पेरू, डाळिंब त्याच्या हातांतून खाई. तो इतका हरीबरोबर निर्भयपणें व प्रेमानें खेळतांना पाहून व पिंजऱ्यावांचूनच नुसता हातावरून इकडे तिकडे नेतांआणतांना पाहून बाळाला मोठें आश्चर्य वाटलें व तो ह्मणाला— हरी, हा पोपट कसा रे इतका तुझ्या सलगीचा झाला ?

हरी ह्मणाला—बाळ, मीं त्यासाठीं कांहीं विशेष खटपट केली नाहीं. बिचारा प्रथम एका बोक्याच्या तडाक्यांत सांपडला असतां मीं त्यास त्याच्या हातून सोडविलें व त्याला त्या वेळीं झालेली जखम बरी होईपर्यंत घरीं ठेवून दररोज त्यास कांहीं खावयास घालीत राहिलों. आतां तो अगदीं बरा झाला आहे. तेव्हांपासून तो माझ्याशीं असा सलगीनें वागतो.

बाळ—हें मोठेंच नवल आहे तर ! कारण पांखरें म्हणजे सर्व, मनुष्य जवळ गेलें कीं भुर्र उडून जायचीं. आणि कोंबडीं, जीं पुष्कळ लोक घरीं पाळतात, त्यांस सुद्धां हात लावायला जा, कीं तीं दूर पळालींच ! ”

गुरुजींनीं तें ऐकून बाळास प्रश्न केला—“ पण बाळ, त्याचें काय कारण असावें, अशी तुझी कल्पना आहे ?

बाळ—कारण त्यांचा रानटी स्वभाव, दुसरें काय ?

गुरुजी—त्यांचा स्वभाव रानटी कशानें बनला, तें सांगशील ?

बाळ—कशानें तें नाहीं मला सांगतां येत; त्यांचा स्वभावच तसा

रानटी एवढेंच मला वाटतें.

गुरुजी— पण त्यांचा जर तसा स्वभावच असता, तर हा पोपट हल्लीं इतशीं इतका मोकळेपणें वागत आहे, हें कसें?

बाळ—त्याचें कारण, त्यानें त्याला इतके दिवस पाळलें आहे हें आहे.

गुरुजी—बरोबर. पण मग असें झालें कीं, पक्ष्यांला जर एकाद्या माणसानें ममतेनें वागाविलें, तर त्याला पाहून त्यांनीं उडून जावें हा कांहीं त्यांचा स्वभाव नव्हे!

बाळ—हो, नव्हे खरा.

गुरुजी—पण जर त्यांना कोणीं त्रास द्यावयाचा प्रयत्न केला, तर त्यास पाहून त्यांनीं उडून जावें, हा त्यांचा स्वभावच आहे, होय ना?

बाळ—हो.

गुरुजी—तरी त्यांचा स्वभाव रानटीच आहे, असें तूं म्हणणार काय? तर मग माणसें सुद्धां सर्व रानटी स्वभावाचीं म्हणावीं लागतील! कारण तींही पांखरांप्रमाणेंच, त्रास देणाराला भितात, व संकटाची वेळ दिसतांच पळून जातात. तूं सुद्धां मला वाटतें, सिंह किंवा वाघ पाहिलास म्हणजे असाच प्रकार करशील, नाहीं काय?

बाळानें मान हालवून रुकार दिला.

गुरुजी—मग तूं आपल्याला रानटी प्राणी म्हणावयास तयार आहेस काय? नाहीं. मग पक्ष्यांनाच तेवढें रानटी म्हणणें कसें योग्य आहे? तर आतां जर तुला एकाद्या प्राण्यानें आपणाशीं इतक्या सलगीनें वागावें असें वाटलें, तर तो 'रानटी स्वभावाचा' असें नुसतें म्हणून न राहतां, तूं त्यास ममतेनें वागविण्याचा प्रयत्न केला पाहिजे; म्हणजे अर्थातच त्यास तुझें भय वाटेनासें होऊन तो तुजजवळ येऊं लागेल—तुजवर प्रेम करूं लागेल; व 'त्याचा स्वभावच तसा रानटी' असें म्हणावयास जागा राहणार नाहीं. प्रत्येक गोष्ट केली म्हणजे होते. मनांत इच्छा पाहिजे कीं मार्ग सांपडतो.

इतक्यांत हरी म्हणाला:— " खरेंच गुरुजी ! तुम्हीं परवां सांगितलेली त्या गुलामाची गोष्ट अशीच आहे. अरण्यांतला भयंकर व उग्र सिंहसुद्धां त्यानें आपला मित्र केला ! आज वाचावयाला तीच गोष्ट काढूं का ? म्हणजे ती बाळालासुद्धां ऐकावयास मिळेल. "

नंतर गुरुजींनीं वाच म्हणतांच त्यानें पुढील गोष्ट काढून वाचली.

---

# १९ सिंहाच्या गुहेंत !

पूर्वीं कित्येक देशांत अशी एक चाल असे कीं, लढाईंत जे कोणी शत्रूचे लोक हातीं लागतील त्यांस धरून गुलाम करून विकावयाचें. मग त्यांस त्या विकत घेणाऱ्या धन्यानें वाटेल तसें राबवून आपलें हवें तें काम करून घ्यावें. असें करण्याला सरकारची कांहीं अडकाठी नसे. अशा एका देशांत अहमद नांवाचा एक मनुष्य गुलाम म्हणून विकत घेतलेला एका गृहस्थाचे घरीं होता. परन्तु त्याचा धनी त्यास फारच वाईट रीतीनें वागवी. त्यामुळें तो मनुष्य एकदां आपल्या जिवास कंटाळला. कारण त्यास आपले हाल टाळावयास कांहींच उपाय सुचेना. मग तो एकदां आपल्याशीं ह्मणाला— " खरोखर, जें हें या भयंकर यातनांमध्यें राहावयाचें सध्यां माझ्या नशिबीं लागलें आहे, त्यापेक्षां मरणें बरें ! तर मग हर-उपाय करून येथून पळून जाण्याला मला काय हरकत आहे ? मी पुनः यांच्या हातीं लागलों तर मला ठाऊक आहे कीं, हे माझे हालहाल करून मला ठार मारतील. पण मरणाला मी तयारच आहें. या गुलामगिरीच्या नरकयातनांत व हालांत दिवस काढण्यापेक्षां मरणें मला अधिक सुखानें पत्करेल. आतां मी निसटलोंच, तर मला या जवळच्या भयंकर अरण्यांत जाऊन प्रथम कांहीं दिवस रहावें लागेल. पण तेथील तीं हिंस्र जनावरेंसुद्धां

माझे हल्लींचे इतके भयंकर हाल करतील असें वाटत नाहीं. तेव्हां यांच हालांत दिवस काढण्यापेक्षां आपला जीव त्या जनावरांच्याच खुशाल स्वाधीन करावा हेंच मला फार बरें वाटतें.''

असा विचार करून एके दिवशीं संधी पाहून तो आपल्या धन्याच्या घरून निघाला आणि तेथून दोनतीन मैलांवर जें एक दाट अरण्य होतें त्यांत शिरला. परन्तु एका प्रकारच्या हालयातनांतून काढून दुसऱ्या प्रकारच्या खडतर प्रसंगांचा अनुभव घेण्यालाच त्याच्या नशिबानें त्यास येथें आणून ठेवल्यासारखें झालें! आतां तो आगींतून निघून फोपाट्यांत आला. कारण सबंध दिवसभर तो त्या झाडींतून फिरला, पण माणसाचें एक पाऊल कोठें उमटलेलें त्यास दिसलें नाहीं; उलट झाडींत शिरून मार्ग काढतां काढतां काटेरी झाडांनीं ओरबडून त्याचें आंग रक्तबंबाळ करून टाकलें व कांट्यांनीं व खड्यांनीं त्याच्या पायांची तर इतकी आग झाली कीं, त्यास एक पाऊल पुढें टाकवेनासें झालें! श्रम अतोनात झाले, व भुकेनें जीव कासावीस झाला! पण त्या निर्जन व भयाण प्रदेशांत त्यास खावयास काय मिळणार? शेवटीं थकून, भुकेनें प्राण व्याकुळ होऊन, पूर्ण निराशेच्या स्थितींत, त्यास एक गुहा आढळली. मग तींत जाऊन तेथें आंग टाकून देऊन तो निवांत पडून राहिला.

याप्रमाणें तो तेथें विसावा घेण्यासाठीं पडून राहिला असतां एकदोन क्षण झाले असतील नसतील, तोंच एक भयंकर गर्जना त्याचे कानीं आली. ती आरोळी वनराजाची होती. ती ऐकून तो अतिशय घाबरला, आणि येथून आपण पळून जावें म्हणून तो जों मनांत आणीत आहे, इतक्यांत एक मोठा भयंकर सिंह त्या गुहेच्या द्वारांतून आंत आला! आतां निसटून जाण्यास कांहींच उपाय शिल्लक राहिला नाहीं. तेव्हां आतां आपलीं शंभर वर्षें पूर्ण भरलीं असें त्यास वाटलें! पण तो सिंह धांवून, खवळून पुढें यावा तो न येतां, सौम्यपणानें, अगदीं सावकाश पावलें टाकीत त्याच्या-

गधळ आला व तो कांहीं वेदनांनीं कण्हत असल्यासारखा दिसला. त्यामुळें त्यास फार आश्चर्य वाटलें व ' याला कांहींतरी दुःख होत असलें पाहिजे; व त्यावर आपण कांहीं उपाय करावा या बुद्धीनें हा प्राणी इतका संथपणानें आपल्याकडे येत असावा ' अशी कल्पना त्याच्या मनांत आली.

तो मनुष्य मूळचाच मोठा धाडसी होता, त्यामुळें त्यानें त्या तशा स्थितींतही त्या सिंहाला काय झालें आहे हें पाहण्याचें मनांत आणलें; आणि त्या सिंहानेंही त्यास तितकी सवड दिली. तो जवळ येतांच तो एका पायानें लंगडतो आहे असें त्याच्या लक्षांत आलें. पायाचा तो भाग खूपच सुजलेला होता. तेथें त्यास एखादी जखम लागली असावी असें त्यास वाटलें. आणि त्या सिंहाची वृत्ति अद्यापही अगदीं थंड असलेली पाहून त्यानें आणखी धैर्य केलें; आणि त्याच्या विशेष जवळ जाऊन त्यानें तो सुजलेला पाय हलक्या हातानें हळूच वर उचलला ! नंतर चतुर वैद्य जसा एकाद्या रोग्याची जखम वगैरे पाहतो, त्याप्रमाणें त्यानें ती सूज निरखून पाहिली. तोंच त्यास त्याच्या टांचेच्या मृदु भागांत एक भला मोठा भसाडा कांटा शिरलेला आढळून आला. तेंच त्या सुजेचें आणि लंगडण्याचें कारण होतें. इतकी सलगी करूनही हा सिंह आपली उग्रता कांहींच प्रकट करीत नाहीं, उलट अत्यंत सौम्यपणा धरून मोठ्या आर्जवी वृत्तीनें आपणास जणूं आणखी पुढेंच सरावयास सांगत आहे असें पाहून, त्यानें आपल्या मनांतील बहुतेक भय दूर केलें; आणि ती सूज हळूहळू दाबून तींतून पुष्कळसा पू बाहेर काढला, आणि थोड्याच अवकाशांत त्या सिंहाच्या वेदना कमी करून त्यास चांगलें बरें वाटावयास लागलें !

वेदनांचा जोर कमी होतांच त्या सिंहानें आपणास झालेला आनंद व कृतज्ञता त्या मनुष्यास दाखविण्याचा पुष्कळ प्रकारें प्रयत्न चालविला. पाळलेल्या कुत्र्याप्रमाणें त्यानें त्याजपुढें कित्येक उड्या मारल्या; आणि आपलें शेंपूट वारंवार हालवून, त्यानें त्या आपल्या उपकारकर्त्याचे हातपाय

चाटण्यास सुरवात केली. पुढें तो जेव्हां जेव्हां एकादी शिकार साधण्यासाठीं बाहेर पडे, तेव्हां तेव्हां कांहीं तरी शिकार आपल्या त्या नव्या पाहुण्याच्या मेजवानीस घरीं घेऊन आल्यावांचून राहिला नाहीं. तो इस-मही दुसरा कांहीं उपाय नसल्यामुळें त्या सिंहाचा तो तसा रानटी किंवा राक्षसी पाहुणचार घेत कित्येक दिवस त्या गुहेंत राहिला. पण तेथेंही त्याचें दैव त्यास आणखी आडवें आलें. कारण, एकदां तो गैरसावधपणें त्या अरण्यांत भटकत असतां, त्याच्या शोधार्थ पाठविलेल्या कांहीं शिपायांची व त्याची अकस्मात् गांठ पडली, आणि लागलीच त्यांनीं त्याला पकडून कैद केलें आणि त्याच्या धन्याकडे नेलें ! तेथें गेल्यावर त्याच्या गुन्ह्याची चौकशी झाली. तेथें गुलामांच्या संबंधांत सरकारी कायदे फार कडक होते. त्यामुळें चौकशीअंतीं जेव्हां चोरून पळून गेल्याचा आरोप त्याबर शाबीत झाला, तेव्हां एकाद्या महाभयंकर अशा सिंहाला कित्येक दिवस उपाशीं ठेवून मग याजवर सोडावें, व त्याजकडून यास खाववून ठार करावें, अशी कडक शिक्षा त्या शहरच्या न्यायाधीशानें त्यास सांगितली !

पुढें लौकरच तो ठरलेला शिक्षेचा दिवस उगवला. वेळ होतांच सर्वथा काळाच्या स्वाधीन झालेल्या त्या दुर्दैवी मनुष्याला हात बांधून एका मोठ्या पटांगणांत आणून उभें केलें. तो भयंकर प्रकार पाहण्याकरितां हजारों प्रेक्षकांच्या झुंडीच्या झुंडी येऊन, त्यांची भोंवताली खूप गर्दी होऊन गेली ! तोंच सर्व लोकांना एक भयंकर गर्जना ऐकूं आली, आणि लगेच एक विलक्षण अक्राळविक्राळ सिंह आपली आयाळ उभारून, डोळे निखाऱ्या-सारखे लाल करून व मृत्यूच्या मुखाप्रमाणें आपला जबडा पसरून, उस-ळून पुढें येऊन ठेपला ! भीति आणि दुःख यांचें लागलीच सर्वत्र साम्राज्य पसरलें. सर्वांचे डोळे त्या मृत्यूच्या मुखांत द्यावयाकरितां उभा केलेल्या माणसाकडे लागले; व आतां त्याचें मरण टळत नाहीं हें पूर्ण निश्चित झालें ! पण चमत्कार असा कीं, त्या सिंहानें पुढें असलेल्या त्या गरीब

बिचाऱ्या गुलामाचा एकदम फडशा करून टाकावा, त्याऐवजीं तो बांकत बांकत त्याजपुढें आला, आणि त्याच्या पायाशीं एकाद्या पाळीव कुत्र्या-प्रमाणें हळूच बसून ते तो चाटूं लागला ! आईला जसें पुष्कळ वेळ चुक-लेलें मूल पुनः भेटावें, त्याप्रमाणें त्या इसमाला पाहून त्या सिंहाला फार आनंद झालेला दिसला ! तें पाहून सर्व प्रेक्षक तर आश्चर्यानें थक्क होऊन गेले ! न्यायाधीशाची स्वारी त्या ठिकाणीं हजर होती. त्यानें तो प्रकार पाहून मोठ्यानें ओरडून ह्मटलें—' सोडा; या गुन्हेगारास मोकळा करा !" आणि मोकळा केल्यावर त्याला तो ह्मणाला—" अहमद, हा काय प्रकार आहे रे ? हा सिंह तुजपुढें एवढा गरीब कसा झाला ? "

मग न्यायाधीशाची आज्ञा झाल्यावर त्या गुलामानें आपण प्रथमतः अरण्यांत कसे गेलों, तेथें गुहेंत त्या सिंहाची व आपली भेट कशी झाली, व त्याच्या पायाची सूज बरी करण्याचें जिवावरचें साहस करून आपण त्याशीं मित्रपणा कसा जोडला, वगैरे सर्व प्रकार त्या जमलेल्या मंडळीसमक्ष त्यास निवेदन केला. शेवटीं तो म्हणाला–" महाराज, हाच तो सिंह. यानेंच त्या अरण्यांत इतके दिवस मला जगविलें." तेव्हां ती त्याची विल-क्षण गोष्ट ऐकून सर्वांना फार नवल वाटलें. अत्यंत उग्र असे हिंस्र पशुसुद्धां उपकारकर्त्यांचें ऋण जाणतात; सौम्य होतात; आणि त्यांच्यावर सुद्धां असा सौजन्याचा चांगला परिणाम होतो, हें ध्यानांत येऊन त्यांस आश्चर्य वाटलें व तो गुलाम असल्या संकटांतून निभावला याचा त्यांस आनंद झाला. मग त्या सर्वांनीं त्या गुलामाला त्याच्या अपराधाबद्दल माफी द्यावी म्हणून एक-मतानें त्या न्यायाधीशाला विनंती केली. न्यायाधीशानें ती गोष्ट तत्काळ मान्य केली व त्यास सोडून देण्यांत आलें.

× × × ×

गोष्ट संपल्यावर हरी म्हणाला––गुरुजी, मला एक गोष्ट ठाऊक आहे, ती सांगूं !–एक लहान मुलगा आपल्या बागेंतल्या एका नागाला रोज दूध

घालीत असे. त्याला त्याचे आईनें दूध दिलें कीं, तो एक लहान बाटी घेऊन बागेंत जाऊन एका झाडाच्या मुळाशीं ठेवी व शीळ घाली; त्याबरोबर तो नाग बाहेर येऊन तें दूध पिऊन जाई !

बाळ आश्चर्य करून म्हणाला:—हां ! आणि तो त्यास चावला नाहीं ?

हरी—नाहीं, मुळींच नाहीं. कधीं कधीं तो नाग घाई करूं लागून ती बाटी लवंडील असें वाटलें, तर तो मुलगा त्यास आपल्या छडीनें दबवी; तरी पण त्यानें त्यावर कधीं फुससुद्धां केलें नाहीं !

## २० गाईला गोग्रास.

वरील दोन्ही गोष्टी ऐकून बाळाला नवल वाटलें; तसाच आनंदही झाला. नंतर त्यानें आपणही एकादें जनावर असें आपल्या सलगीचें करण्यासाठीं प्रयत्न करून पाहावा असें मनांत आणलें. आणि गाईला गोग्रास पाहिजे म्हणून घरून त्यानें थोडी भाकरी मागून घेतली; व बाहेर मोकळ्या जागेंत येऊन आतां हा कोणत्या गाईला द्यावा म्हणून तो इकडे तिकडे पाहूं लागला. तों एक गाईचें बांसरूं जवळ चरतांना त्यास दिसलें. मग त्यानें त्याला मोठ्या प्रेमानें ' ये, ये हंमा ! ये. मी तुला ही पहा भाकरी आणली आहे. हंमा ! ' म्हणून हांका मारल्या. पण तें जवळ येईना, असें पाहून तो स्वतःच त्याजवळ गेला. त्याबरोबर तें बांसरूं बुजलें आणि पळूं लागलें. तेव्हां बाळ म्हणाला—“ अरे बांसरा, मी तुला चांगला भाकरी घालायला आलों, आणि तूं असें पळून चाललेंस ? हें चांगलें आहे का ? पण थांब, तुला जर तें कळत नाहीं, तर तुला आतां मी पकडून ती खायला घालतों, म्हणजे तुला खरें वाटेल. ” आणि असें म्हणून त्याच्यामागें थोडेंसें धांवत जाऊन त्यानें त्याला पकडलें व त्याचें तोंड धरून

तो त्यास कीं भाकरी चारण्याचा प्रयत्न करूं लागला! पण तें वांसरूं त्यायोगें अधिकच बुजलें, जोरानें हंबरूं लागलें; आणि मानेस एक जोराचा हिसडा देऊन त्यानें बाळाच्या हातून आपली सुटका करून घेतली. त्या झगड्यांत बाळाला जोराचा धक्का बसून तो मागें जमिनीवर पडला. तेव्हां त्या वासराचा त्यास मोठा राग आला. मग जरा यत्न करून तो उठूं लागला, तोंच तेथें जवळच चरत असलेली त्या वासराची गाय, वासराचा हंबरडा ऐकून पाठीमागून धांवत येत होती; ती त्याच्या अंगावरून उडी घेऊन गेली! पुनः दुसरा एक मोठा धक्का लागून बाळ आणखी आपटला. तेव्हां बाळाचा राग फारच वाढला. मग पुनः उठून त्यानें त्या गाईची पाठ धरली. व तिच्या गळ्यांत गुंडाळून राहिलेला कासरा जमिनीवर लांबवर लोळत चालला होता तो पकडला, व त्या गाईला तो ओढूं लागला. पण बाळाचें बळ किती? त्यास ती गाय अर्थातच आवरेना. उलट त्यालाच त्या कासऱ्याबरोबर ती पुढें ओढून नेऊं लागली! अशी ओढाताण चालली असतांना ती गाय एका कुंपणावरून उडून दुसऱ्या एका परड्यांत गेली. तों तेथून ५।४ कुत्रे जोरानें भुंकत त्याजवर धावून आले, तेव्हां बाळाची फार धांदल उडाली; व आतां गाईचा पाठलाग करणें शक्य नाहीं असें त्यास वाटून त्यानें तो हातचा कासरा सोडला. तोंच बाळाची स्वारी पुनः तिसऱ्यांदां आपटली. आणि आतां आपटली ती चिखलाच्या डबक्यांत! भोंवतीं सारखा भुंकणाऱ्या कुत्र्यांच्या वेढा! मग काय विचारावें? चिखलानें बाळाचे कपडे घाण झाले. उठायला कांहीं लौकर येईना. आणि वर यावें तर कुत्रे अंगावर भुंकताहेत! अशा स्थितींत बाळाची फारच त्रेधा उडाली! कसाबसा प्रयत्न करून बाळ वर येतो, तों गुरुजींची स्वारी समोरून चाललेली! मग तर बाळाच्या फजितीस पारावारच राहिला नाहीं! पण गुरुजींना पाहतांच त्याच्या मनांत आलें कीं, यांनींच सांगितल्यावरून आपण असें करावयास गेलों व त्याचा

हा असा परिणाम झाला. मग त्यास त्यांचा रागच आला. मग, काय झालें म्हणून जेव्हां गुरुजींनीं विचारलें, तेव्हां बाळ म्हणाला:—" गुरुजी, जें हें झालें त्यास कारण काल तुम्हीं सांगितलेली गोष्ट ! तुम्ही म्हणालां, जनावरांबर माया करावी. ती मी माया करावयास गेलों, आणि त्याचें हें काय फळ झालें पहा ! "

गुरुजी म्हणाले–" अरेरे ! बाळ तुला या जनावरांनीं फारच त्रास दिला ! पण बाळ, तुला फारशी दुखापत झाली नाहींना ? व इतकें सगळें माझ्या सांगण्यामुळें झालें ना ? तर मग मीं फारच मोठी चूक केली ! "

बाळ ह्मणाला:—मला कांहीं फारसें लागलें नाहीं गुरुजी ! कपडे मात्र माझे सारे भरले आहेत. आतां ते काढून मला आधीं धुवावयास दिले पाहिजेत व दुसरे आईकडून घेऊन घातले पाहिजेत.

गुरुजी–मग बाळ, जा तूं आतां घरीं. कपडे काढून दुसरे घाल आणि मग माझ्याकडे ये. मग कोणाचें काय चुकलें तें पाहूं अं ?

नंतर बाळानें घरीं जाऊन कपडे बदलले व मग तो गुरुजींकडे आला. गुरुजी घरींच होते. बाळ येतांच गुरुजी ह्मणाले:—बाळ, तुला फार त्रास झाला हें खरें; आणि हें बरें झालें नाहीं. पण बाळ, गाईचा कासरा धरून तिच्या मागें आडरानांतून धावावें, असें मीं तुला सांगितलें असें मला आठवत नाहीं ! तुला आठवतें मीं तसें सांगितलेलें ?

बाळ:—नाहीं गुरुजी; पण तुम्हीं सांगितलें कीं जनावरांना खायला घालावें, म्हणजे तीं आपल्याशीं सलगीनें वागूं लागतात. म्हणून मी त्या वासराला हांक मारून गोग्रास भरवीत होतों.

गुरुजी:—पण जनावरांबर माया करण्याचा हा कोठला प्रकार ? तूं हा भलताच मार्ग काढलास, त्याला मीं काय करावें बरें ? तुझ्या मनांत काय आहे हें त्या वासराला प्रथम कळावें तरी कसें ? तूं त्यास पकडून धरल्याबरोबर भयामुळें साहजिकच तें पळून जाऊं लागलें; व लागलीच आपल्या

बांसराच्या हंबरण्यानें त्याची गायही तेथें धांवून आली. यांत कोणाची काय बरें चूक आहे ? जें झालें तें सर्व तुझ्या अडाणीपणामुळें झालें. जर तुला या जनावरांच्या संबंधांत असा कांहीं यत्न करावयाचा असेल तर तूं प्रथम त्यांच्या संवयी व मनोवृत्ति कशा आहेत हें माहित करून घ्यावयास नको काय ? तें माहीत करून न घेतल्यास त्या मुलासारखी तुझी अवस्था होईल. एक मुलगा आपला माशा धरूं लागला. तों एक गांधील माशी त्याच्या हाताला डसली. त्यानें त्याच्या हाताची आग सबंध दिवसभर होत होती ! दुसरा एक मुलगा एकदां एका नदीच्या कांठीं गेला. तेथें एक विरोळा वेटोळें करून स्वस्थ बसला होता. त्याला त्यानें काठीनें डिवचलें. त्याबरोबर तो त्या काठीला गुंडाळून, परत त्याच्या अंगावरच आला ! लागलीच चावावयाचा, पण कसा बसा तो प्रसंग टळला एवढेंच.

बाळ:—मग गुरुजी, हरी काल कसें म्हणत होता कीं, बागेंत वाटी ठेवून एका मुलानें नागाला रोज दूध पाजिलें ? तो नाग त्यास चावला नाहीं तो ?

गुरुजी:—तें खरें आहे. कारण प्राय: असा एकही प्राणी नाहीं कीं, त्याला जर आपण दुखविलें नाहीं तर तो आपल्याला चावेल, की पीडा देईल. कदाचित् त्यास भूक लागली असली तर भक्ष्य मिळण्यासाठीं तो एक तसें करील. पण एकंदरींत बहुतेक प्राणी फार निरुपद्रवी असतात. सापसुद्धां निरुपद्रवी असतात. कांहीं थोडे साप मात्र विषारी असतात. तर यासाठीं बाळ, या जनावरांच्या संवयींची व स्वभावांची चांगली माहिती होईपर्यंत तूं त्याच्यांत मुळींच पडूं नयेस हें चांगलें. तुला जर हें आधीं कळतें, तर त्या वासराला पकडून त्यास खाऊं घालण्याचा किंवा पळणाऱ्या गाईचा कासरा धरून तिला अडवण्याचा प्रयत्न तूं केला नसतास. त्यांतल्या त्यांत एवढें बरें झालें कीं, एखाद्या द्वांडग्या जनावराशीं तूं असा खेळ खेळत बसला नाहींस. नाहीं तर त्या शिष्याची जशी एका हत्तीनें मेधा उडवून दिली, तशी तुझी मेधा उडाली असती !

# २१ हत्तीचें चातुर्य.



बाळः—ती हत्तीची गोष्ट आम्हांला सांगतां?

गुरुजीः—हो; पण बाळ, तूं हत्ती पाहिला आहेस का?

बाळः—हो. हत्तीखाना आमच्या घरापासून फार लांब नाहीं. तेथें नेहमीं हत्ती बांधलेला असतो.

गुरुजीः—तो कसा असतो तें वर्णन करून सांग पाहूं?

बाळः—तो खूप मोठा थोरला असतो. त्याला एक मोठी थोरली जाड सोंड असते. तो ती इकडे, तिकडे, खालीं, वर, हवी तशी फिरवितो. तो त्या सोंडेनेंच पाणी पितो, आणि गवत किंवा रोट जें कांहीं त्याचें खाणें असतें तें तो त्या सोंडेनें उचलून तोंडांत घेतो. तो जर मोकळा सुटला तर कोणाला तरी आवरेल का हो गुरुजी?

गुरुजीः—बरेंच वर्णन केलेंस. आतां हरी, तुला त्याचें आणखी कांहीं वर्णन करतां येईल का?

हरीः—हो, गुरुजी. हत्ती हा सर्व जनावरांमध्यें आकारानें मोठा असतो याची उंची सात आठ हात असते. हा एवढा मोठा बळवान् असतो, तरी माणसाळला म्हणजे फार गरीब होतो.

गुरुजीः—बरोबर. आणखी हे प्राणी जेथें मूळ रानांत असतात, तेथें सुद्धां सहसा कोणाला कांहीं इजा करीत नाहींत. रानांत झाडपाल्यांवर त्यांचा निर्वाह होतो. सोंडेनें हे झाडाच्या फांदीला बिळखा घालतात, व हिसडा मारून तोडून हवा तितका पाला काढतात.

बाळः—गुरुजी, हें एवढें थोरलें जनावर कसेंहो माणसाळतें? आणि असें रानांतून पकडून तरी कसें आणितां येतें?

गुरुजीः—खरें म्हटलें तर तें कांहीं सोपें काम नाहीं. पण त्यांना पकड-

त्यासाठीं, पूर्वींचे माणसाळलेले जे हत्ती असतात, त्यांना शिकवून तयार करतात; व त्यामुळें हें काम फार सोपें होतें. त्याची तुम्हांला सर्व हकीगत सांगतों:—प्रथम, कोणच्या रानांत हत्ती आहेत त्याचा तपास करतात; नंतर तेथें कांहीं एका जागेवर सर्वांगानें एक भला मोठा खोल चर खणून, व चारी बाजूंस मोठमोठे खांब रोवून कुंपण घालतात व त्यास एक लहानशी वाट ठेवितात. नंतर आपले जवळचे माणसाळलेले एकदोन हत्ती त्या रानांत मोकळे सोडितात. त्यांना शिकविलेलें असतें, त्याप्रमाणें ते त्यांतून एका हत्तीला वळवून भुरळवून त्या वाटेशीं आणितात आणि तेथून त्यास आंत घेतात. तो आंत येतांच एक मनुष्य तें दार बंद करितो. त्याबरोबर त्या हत्तीला आपण जाळ्यांत सांपडलों असें कळून येऊन मग तो खवळतो व निसटून जाण्यासाठीं धडपड करूं लागतो. त्या वेळीं ते माणसाळलेले हत्ती त्याजपाशीं येऊन दोघे मिळून त्याजवर हल्ला करून त्यास अगदीं खूप बडवून काढतात ! इतके कीं, शेवटीं तो हत्ती थकून अगदीं स्वस्थ पडतो. याप्रमाणें तो निर्बल झालेला पाहतांच एक मनुष्य हळूच त्याच्या मागून एक मोठा थोरला सोल त्याच्या पायाला बांधतो; व त्याचें दुसरें टोंक एक दोन मोठ्या झाडांच्या बुंध्यांला बांधून ठेवतो. मग त्याला तेथें तसाच उपाशीं कांहीं दिवस राहूं देतात. मग तो अगदीं मऊ येतो. मग त्यास, जेथें त्याची जागा केली असेल तेथें घेऊन येतात व सांखळदंडानें बांधून टाकितात.

बाळ—पण गुरुजी, त्या शिंप्याची गोष्ट सांगावयाची राहिलीच.

गुरुजी—तीच सांगतों ऐक. ती सुरतेची गोष्ट. तेथें पूर्वीं एक फार मोठा हत्तीखाना असे. तेथें रोज जेथून हत्ती पाण्यावर नेत, त्या वाटेवर एका शिंप्याचें घर होतें. त्या शिंप्यानें वाटेनें जातांना त्यांपैकीं एका हत्तीला रोज कांहीं फळें वगैरे खावयाला देऊन, कित्येक दिवस त्या गोष्टीची त्यास संवय लाविली. तो हत्ती दारावरून जाऊं लागला म्हणजे त्यानें

एका खिडकीवाटे आपली सोंड आंत घालावी, व मग त्या शिंप्यानें त्यास कांहीं एकादें फळ खावयास द्यावें, असा क्रम नेहमीं चालत असे. पण एके दिवशीं नेहमींप्रमाणें हत्तीने आपली सोंड आंत केल्याबरोबर त्या शिंप्याच्या मनांत काय आलें कोण जाणे, त्यानें त्या हत्तीला फळ वगैरे कांहीं एक न देतां, उलट त्याच्या सोंडेला आपले हातांतील सुई मात्र टोचली ! ती हत्तीला बोचल्याबरोबर हत्तीनें लागलीच आपली सोंड परत घेऊन तो पुढें इतरांबरोबर मुकाट्यानें पाण्यावर गेला. नंतर पाणी पिऊन परत येतांना त्यानें तेथल्या एका डबक्यांतलें घाण खातेऱ्याचें पाणी आपल्या सोंडेमध्यें खूप भरून घेतलें, आणि परत त्या गृहस्थाच्या खिडकीपाशीं येतांच तें सर्व त्याच्या अगदीं मस्तकावर ओतलें ! हत्तीच्या सोंडेंत पाणी म्हणजे कित्येक घागरी मावतें ! तेव्हां एवढ्या खातेऱ्याचे पाण्याचा त्याजवर वर्षाव झाल्याबरोबर तो बिचारा त्यांत गुदमरून घाबरून अर्धमेला झाला व त्याचे सारे कपडे व झाडून सारें दुकान घाणीघाण होऊन गेलें ! याप्रमाणें त्या गृहस्थानें खोडसाळपणा करून आपणास त्रास दिल्याबद्दल त्या हत्तीनें मोठ्या शहाणपणानें त्याला असें छानदार शासन केलें !

हरी— गुरुजी, सोंडेंत सुई खेंचून त्यानें जी हत्तीची खोडी केली, त्या मानानें, हत्तीसारख्या एवढ्या बलाढ्य प्राण्यानें त्यास, खरें पाहिलें तर उचलून फेकून देऊन ठार करावयाचें; पण नुसत्या घाण पाण्याचा मानावरच त्यानें भागविलें. त्यावरून मला वाटतें-हत्ती हें जनावर फारच सौम्य स्वभावाचें व उदार वृत्तीचें म्हटलें पाहिजे. आणि असल्या सौम्य व उदार जनावराशीं माणसांनीं असें खोडसाळपणानें वागावें हें त्यांना केवढें तरी लाजिरवाणें आहे !

गुरुजी:— अगदीं खरें बोललास. आतां हत्ती हा जरी इतका सौम्य आणि आज्ञाधारक आहे, की पाळीव कुत्र्याप्रमाणें तो नेहमी धन्याच्या शब्दांत राहतो, तरी कधीं कधीं त्यास मद चढतो, मग त्या वेळीं त्यास

इतका क्षोभ येतो कीं, तो कोणालाही आवरतां येणें शक्य नसतें. अशा वेळीं त्याच्या पुढें जावयाचें म्हणजे जिवावरचें काम असतें; व मग त्यास ताळ्यावर आणणें तर महा कर्म कठीण ! दसऱ्याचे दिवशीं आपले शाहु-महाराज हत्तीवर अंबारी टाकून तींत बसून शिलंगणास जातात हें तुला ठाऊकच आहे. त्या वेळीं हत्तीला चालविणारा महात, त्या अंबारीच्या पुढच्या जागीं हत्तीच्या मानेवर बसलेला असतो हें तुम्हीं पाहिलेंत ना ? त्याच्या हातांत अंकुश असतो. त्यास एक अणकुचीदार लोखंडी आंकडा बसविलेला असतो. घोड्याच्या चाबकाप्रमाणें तो अंकुश हातीं घेऊन तो हत्तीला चालवितो. हत्तीला सांभाळण्याच्या संबंधांत महाताला फार शाहाणपणा ठेवावा लागतो. थोड्या दिवसांपूर्वी येथेंच एक गोष्ट घडली, ती मला आतां आठवली. ती तर फार मौजची आहे. ती तुला सांगतें ऐक. हत्तीखान्यांतला हा हल्लींचा हत्ती असाच एके दिवशीं एकाएकीं क्षुब्ध होऊन त्यानें आपले पायाची साखळी तोडली. आणि वाड्या-पुढील रस्त्यावरून बेफामपणानें तो धांवत चालला ! तें पाहतांच सर्व लोक अगदीं घाबरून गेले. महात कोणीकडे गेला होता कोण जाणे ! त्यामुळें त्याच्या पुढें जाऊन त्यास पकडण्याची छाती कोणासच होईना. अशा वेळीं हत्ती सुटला म्हणून कळतांच महाताची बायको सहज काय प्रकार आहे हें पाहण्यासाठीं, आपलें लहान मूल कडेवर घेऊन पुढें आली. ती कित्येक वेळां आपल्या नवऱ्याबरोबर स्वतः त्या हत्तीला रोट चारीत असे. पण ती पुढें यायला व तिकडून हत्ती धावत येण्याला एकच गांठ पडली. मग काय विचारावें ? ती बिचारी घाबरून जोरानें पळू लागली. पण पळणार किती ? हत्ती तर पाठीशींच आलेला. तेव्हां तिनें आपलें कडेचें पोर पुढें केलें व जोरानें ओरडून ती त्या हत्तीला म्हणाली– " अरे मेल्या दुष्ट जनावरा ! हे आमचे उपकार फेडतोस काय ! आम्ही तुला रोज रोट चारले, आणि तुला आज इतके दिवस संभाळलें, तें तूं आमचे

असे उपकार फेडशील म्हणून काय ? चांडाळा, चिरड एकदां या माझ्या मुलाला आणि मला !-आणि आम्ही जी तुझी सेवाचाकरी केली त्याचा एकदां कर असा शेवट, म्हणजे झालें ! "

पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, तिची अशी ओरड चालली आहे तों तो हत्ती त्या मुलास व तीस तुडवून तसाच पुढें जावयाचा, पण एकदम थबकला ! जणूं काय त्यास असेंच वाटलें कीं, या बिचाऱ्या मुलाला—आपल्या अन्नदात्याला—आपण तुडवून जावें, ही केढी लज्जास्पद गोष्ट आहे ! त्यानें तेथें येतांच त्या बाळाकडे नीट लक्षपूर्वक पाहिलेंसें केलें. त्याबरोबर त्याचा उन्मृंखलपणा संपला व तो तेथें स्वस्थ उभा राहिला ! लागलीच तिकडून महात आला व त्यानें ती संधी साधून त्यास पकडून, चुचकारून परत आपल्या ठाण्यावर नेलें !

बाळ म्हणाला— खरोखर, किती चमत्कारिक गोष्ट ही ! आणि ही खुद्द येथें साताऱ्यास घडली ना ?

हरी म्हणाला— " पण बाळ, गोष्टीचें तात्पर्य लक्षांत आलें कां ? जनावरांशीं माया लावायला जातांना, प्रथम त्यांचे स्वभाव माहीत करून घेतले पाहिजेत, हें तूं यावरून शिकावयास पाहिजे, समजलास ?

---

## २२ एक सुस्वभावी मुलगा.

दुसरे दिवशीं नेहमींप्रमाणें गुरुजी व मुलें ओवरींत येऊन त्यांचें दुग्धपान चाललें असतां गुरुजी म्हणाले—" सर्व जीवांशीं मोठ्या प्रेमाचें व गोड वर्तन करावें असें मी तुम्हांस वारंवार सांगतों, त्यासंबंधांत मला एक गोष्ट वाचतांना सांपडली आहे. बाळ, तूं ती आज वाचून दाखवितोस ?

बाळ आनंदानें व उत्सुकतेनें म्हणाला— हो. द्या इकडे गुरुजी तें पुस्तक.

मला आतां वाचावयाची फार हौस वाटते. मी वाचावयाला शिकलों हें किती उत्तम झालें असें मला वाटतें. आतां मला केव्हांही कंटाळवाणें होत नाहीं. हवें तेव्हां येथें यावें, व नानातऱ्हेचीं पुस्तकें वाचावयास घ्यावीं. आतां ती गोष्ट मी वाचतों—आपल्यावरून होईल तेवढी उत्तम वाचतों.

गुरुजी— " वाचण्याच्या नादासंबंधानें बहुधा सर्वांना असाच अनुभव आहे. मनुष्याला वाचावयाची गोडी लागली म्हणजे त्याचा ज्ञानाचा कंटाळा पार नाहींसा होतो. मग त्याला सदैव आपली करमणूक करून घ्यायला कांहीं हरकत येत नाहीं. आणि वाचावयास येत असूनही जर कोणाचा वेळ कंटाळवाणा जात असेल, तर मग हरी, काय रे म्हणावें त्यास ? नशीब त्याचें, दुसरें काय ? असो.

नंतर बाळानें पुढील गोष्ट वाचली:—

\+ + + + +

एके गांवीं एक मुलगा होता. एके दिवशीं त्याच्या वृद्ध आईबापांनीं त्यास कांहीं पैसे देऊन जवळच दोन कोसांवर असलेल्या एका गांवाहून कांहीं जिन्नस आणावयास सांगितलें. परत येण्यास सायंकाळ होईल, म्हणून दुपारच्या जेवणापुरती दशमी त्यांनीं त्यास बांधून दिली. मग सकाळीं ८ वाजतां तो मुलगा बाजारास जावयास निघाला. थोडें अंतर चालून जातो तों रस्त्यावरचा एक कुत्रा त्याजकडे आला; आणि वारंवार पायांत घोटाळून, पाय चाटण्याचा प्रयत्न करून, शेपूट हालवून, जणूं अन्नासाठीं त्याची विनवणी करीत आहे असें दाखवूं लागला. तें पाहून त्या मुलाला त्याची दया आली. मग तो मनाशीं म्हणाला— " आतां काय बरें करावें ? हा कुत्रा भुकेनें अगदीं व्याकूळ झालेला दिसतो. मी यास आपली थोडीशी दशमी सोडून घातली तर बाकीची मला दुपारला पुरणार नाहीं; व मग दिवसभर मला अर्धपोटींच राहावें लागेल. पण याचा तर जीव फार कासावीस झाला आहे, तर यास दशमी थोडी द्यावीच.

मग पुढें कांहीं होवो." असें म्हणून त्यानें त्यास एक भाकरी काढून दिली. ती त्यानें अधाशासारखी एका क्षणांत गट्ट केली. त्यावरून तो कुत्रा किती दिवस उपाशीं होता कोण जाणे, असें त्यास वाटलें.

यानंतर तो आणखी जरासा पुढें गेला. तों रस्त्याच्या एका बाजूस एक म्हातारी गाय कण्हत पडलेली त्यानें पाहिली. जवळ जाऊन पाहतो तों, खायला नसल्यामुळें ती बिचारी थकून पडली आहे व त्यामुळेंच तिला उठवत नसावें असें त्यास दिसून आलें. तेव्हां तो पुनः विचारांत पडला. 'या गाईला जवळचें कोठलें तरी गवत आणून द्यायला जर मी गेलों तर मला पुढें बाजारास जाऊन परत येण्यास कदाचित् रात्र होईल. आणि परत या खिंडींतून जातांना आपल्याला कोणी चोर भेटला तर ? किंवा वाट चुकली तर ? पण तें कांहीं होवो. या गाईसाठीं आपण थोडी तरी खटपट करावीच.' असें म्हणून त्यानें जवळचें थोडेंसें चांगलें गवत उपटून आणून तिच्यापुढें टाकलें व लगतच्याच झऱ्यावरून ओंजळीनें २।३ वेळ पाणी आणून तें तिला पाजलें तों ती गाय तेवढें गवत खाऊन आणि पाणी पिऊन जरा हुषार झाली आणि १-२ वेळ उठावयाचा प्रयत्न करून उठली व हळूहळू चरूं लागली. तें पाहून त्यास संतोष वाटला.

मग तो जरा पुढें जातो तों एक माणूस नीट वाट न सांपडून चिखलांत चांचपडत चांचपडत भलतीकडेच चाललेला त्यानें पाहिला. तेव्हां त्यानें त्यास विचारलें-"बाबा, तुम्ही कोणीकडे चाललां आहां ?"

तो म्हणाला-जी धनीसाहेब ! मी त्या विनुपंताच्या मळ्याकडे जात आहें. मी आंधळा आहें महाराज. मला दया करून तेवढें वाटेला लावतां का ? आतां मी चिखलांत डुबतों बघा. देव तुमचें बरें करील."

मुलगा—थांब, मी तुला वाट दाखवतों. तुझ्या हातांतली काठी जरा पुढें कर. मी ती धरतों व मग तूं माझ्या मागून ये.

असें म्हणून तो त्या राबडींत शिरला, तों त्याचा जोडा भरला. तरी

तसाच पुढें घुसून तो त्या आंधळ्यापर्यंत गेला; आणि हळूच आपला तोल संभाळून, जरा पुढें वांकून, त्यानें ती आंधळ्याची काठी पकडली. व मग त्याला तेथून हळूहळू परत नीट वाटेवर आणून सोडलें. तेव्हां त्या आंधळ्यानें त्याला कितीतरी दुवा दिला! आणि "जा आतां माझ्या बाब्या; मी आतां आपल्या मळ्याची वाट काढीत काढीत जातों. उपकार मोठे झाले बरें बाबा!" असें म्हणून तो आपली काठी टेकीत टेकीत पुढें चालूं लागला.

इतकें होत आहे तों बाराचा सुमार झाला. तेव्हां येतांना रात्र होईल, अशा भीतीनें तो मुलगा अगदीं झपाझप पावलें टाकीत त्या बाजारच्या गांवाकडे चालला. तोंच पुढें रस्त्यावर दोन्ही पायांनीं लंगडा असा एक माणूस, दोन्ही हात जमिनीवर टेकून, खरडत खरडत येत असलेला त्यानें पाहिला. मुलगा जवळ येतांच लंगडा म्हणाला "माझ्या बाळा! मला एक भाकरीचा तुकडा देतोस का? बाबा, या रानांतला, गुन्हाळांमध्यें उत्तम गूळ बनवून देणारा, आबा गुळव्या म्हणतात तो मी. मीं आजपर्यंत दरएकाचे गुन्हाळांत जाऊन ज्याचा त्याचा गूळ उत्तम बनवून दिला. पण एकदां गुळाची काहिल ओततां ओततां माझ्या अंगावर आली. व त्या वेळीं माझे दोन्ही पाय भाजून जळून गेले. आणि दुर्दैवानें माझा प्राण तेवढा वांचला! आतां मला कोणी विचारीत नाहीं. आणि मी असा अन्नावांचून उपाशीं मरत, मरणाची वाट पहात बसलों आहें."

तें ऐकून मुलाला फार वाईट वाटलें. त्याला त्याची फार दया आली. त्याच्याकडे दुर्लक्ष करून त्यास पुढें जावबेना. त्यानें जवळची राहिलेली सर्व दशमी काढून त्यास दिली. आणि फडकें झाडून तो म्हणाला— "बाबा रे, जें कांहीं मजजवळ होतें तें एवढेंच. तें सारें तुला घे." असें म्हणून तो पुढें निघाला व अगदीं भराभर पावलें टाकीत त्या बाजाराच्या गांवीं गेला. जें कांहीं विकत घ्यावयाचें तें चटकन बांधून घेतलें. आणि

लागलीच परत घराकडे वळला. पण तो सर्व बाजार उरकेपर्यंत त्यास तेथेंच सायंकाळ झाली. परत निघतो तेवढ्यांत सूर्य मावळला, व सरासरी एक कोस तो पोंचला असेल नसेल तों पूर्ण काळोख पडला. चांदणें नाहीं, कांहीं नाहीं. तसाच पुढें जाण्याचा प्रयत्न करतां करतां तें बिचारें लहान पोर, एका फूटवाटेवर आपली वाट चुकून दुसऱ्याच पांदीत शिरलें. तो रस्ता एका झाडींत चालला होता. त्यांतून जरा पुढें जातांच लौकरच त्यास वाट अन्दाच सांपडेनाशी झाली. तें पोर फार घाबरून गेलें. पोटांत अन्न नाहीं, चालून चालून जीव थकून गेलेला; आणि घरीं आईबाप वाट पहात बसले असतील ही काळजी. पोरस्वभावानें चोराची वगैरे धास्ती. या सर्व गोष्टींनीं त्याची काय स्थिति झाली असेल याची कल्पना करा. त्याचा धीर सुटला, तें मटकन खालीं बसलें आणि रडूं लागलें!

अशीं कांहीं मिनिटें जातात तोंच सकाळचा तो कुत्रा, तोंडांत एक लाहानसें बोचकें घेऊन त्याच्यापाशीं आला व शेंपूट हालवून त्यास कांहीं खुणावित आहे असें कळून आलें. तें बोचकें रस्त्यावरच्या कोणा वाटसरूचें चुकून खालीं पडलेलें त्या कुत्र्यास सांपडलें होतें. त्या मुलानें तें घेऊन सोडून पाहिलें, तों त्यांत पुष्कळशी मेवामिठाई होती. ती त्यास अगदीं वेळेवर मिळाल्यामुळें त्यास फार आनंद वाटला. ती त्यानें खाल्ली. तो म्हणाला—" ही कोणाची असेल कोण जाणे; तरी वेळेवर ही माझ्या उपयोगीं आली खरी. पण पहा, या कुत्र्याला मीं नुसता भाकरीचा एक तुकडा दिला; तर यानें मला आतां ही केवढी सुरेख मेजवानी दिली! यावरून कुत्र्यावर केलेले उपकारही असे चांगले उपयोगास येतात, असें सिद्ध झालें नाहीं काय? " असो. नंतर जराशी हुषारी वाटून त्यानें पुनः त्या झाडींतून वाट काढण्याचा प्रयत्न चालविला. परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. पायाला कांटे बोचले, व दोन तीन वेळ चिखलांत पाय घसरून तो पडला: मात्र. त्यायोगानें पुनः तो फार निराश झाला. तोंच त्यास सकाळीं

वाटेंत भेटलेली म्हातारी गाय आढळली. ती हळूच रानांतून गांवाकडे चालली होती. इतक्यांत चंद्रही उगवून थोडासा वर आला. तेव्हां तो ह्मणाला—' हीच ती सकाळची गाय. ही मला कशी वेळेवर भेटली. आतां हिच्यामागून मी गेलों तर आपल्या गांवास खास पोंचेन. ही या रानांत नेहमीं फिरणारी असल्यामुळें ही आपली वाट नेमकी शोधून काढील. ' असें म्हणून तो तिच्या मागून चालला. मग लौकरच तो त्या झाडींतून बाहेर पडून एका गाडीरस्त्यास लागला. तो ह्मणाला—यावरून केलेला उपकार केव्हांही फुकट जात नाहीं, हेंच पुनः सिद्ध झालें.

नंतर रस्त्यास लागतांच, सकाळचा आंधळा माणूस त्या लंगड्या गुरुव्याला खांद्यांवर घेऊन गांवाकडेच चालला होता, तो त्यास भेटला. ती त्यास चांगली सोबत मिळाली व आतां त्याच्या मनांतली चोराची वगैरे धास्ती अगदीं नाहींशी झाली. त्या दोघांनीं हाच आपला सकाळचा उपकारकर्ता मुलगा असें ओळखून त्याचे घरापर्यंत त्यास सोबत केली. नंतर ते पुढें निघून गेले. तो इमानी कुत्रा त्याजबरोबर आलेलाच होता. त्यास त्यानें आपल्यापाशीं कायमचें ठेवून घेतलें व पुढें त्या दोघांचें प्रेम फारच जमलें. या वेळेपासून त्या मुलानें मनाशीं असा निश्चय केला कीं, दुसऱ्यांनीं आपल्या उपयोगीं पडावें, असें जर आपल्या मनांत असलें, तर आपणही लोकांच्या उपयोगीं पडण्याचा एकही प्रसंग वाया जाऊं देऊं नये.

गोष्ट संपल्यावर बाळ म्हणाला—खरेंच, गोष्ट फार छान आहे. मला आवडली. आणि ही कल्पित नसून खरीच असली पाहिजे. कारण आपला हरीच पहा; सर्वांना आवडतो. कारण याचा स्वभावही अगदीं त्या गोष्टींतल्या मुलासारखाच आहे. गुरुजी, परवां कीं नाहीं, एक खूप मोठा कुत्रा होता, तो हरीजवळ आला व हरीचे पाय चाटूं लागला; पण मला तर त्या वेळीं त्याच्या अंगाला हातसुद्धां लावावयाची छाती झाली नाहीं ! तें पाहून मला परवांच्या ' सिंहाच्या गुहेंतील ' गोष्टीची आठवण झाली.

गुरुजी:—इतकी का तुला भीति वाटली ! खरें म्हटलें तर तो कुत्रा तुझ्यासुद्धां तितका सलगीचा होईल. मात्र तूं त्याच्याशीं तसें प्रेमानें वागलें पाहिजे. कारण कुत्र्याइतकें चाणाक्ष व विश्वासू जनावर दुसरें नाहीं. बरें— हरी, ही गोष्ट बाळानें वाचून दाखविली; आतां तूं ही दुसरी एक गोष्ट त्यास वाचून दाखव बरें.

असें म्हणून त्यांनीं पुस्तक उघडून दिल्यावर हरीनें पुढील गोष्ट वाचली.

---

## २३ एक द्वाड पोर.

एक द्वाड मुलगा होता. त्याचें कारण, त्याचा दोष थोडाच होता; पण दुर्दैवानें त्याचा बापच चांगल्या प्रकारचा नसल्यामुळें, त्यानें अर्थातच आपल्या मुलाला चांगला किंवा लवाबा तो लाविला नव्हता. त्यामुळें, जो मुलगा एरवीं चांगला भला निपजावयाचा, आणि सुखानें त्याचे दिवस जावयाचे, त्याचे ऐवजीं तो आतां स्वभावानें दुष्ट, कुरापती काढणारा व सर्वांना अगदीं नकोसा वाटावा असा बनून राहिला ! त्याच्या द्वांडगेपणा-मुळ त्यास त्याच्यापेक्षां जीं मोठीं मुलें असत, तीं यथेच्छ झोडीत; व कधीं कधीं लहान मुलेंसुद्धां दोघें चौघें मिळून बडवीत. कारण, एखादी कुरापत काढल्यावर ही स्वारी कधीं धैर्यानें पुढें येईल असें नसे; तर थूं थूं करून कोठच्या कोठें निघून जावयाची; इतकें याचें धैर्य. त्याच्याजवळ एक कुत्रा असे. तो म्हणजे याचीच हुबेहुब प्रतिमा. तोही सदोदित ज्याच्या त्याच्यावर भुंकावयाचा; एकादी गरीब गाय, किंवा शेळी दिसली कीं, धांवून तिच्यामागें लागावयाचा. असा तोही अतिशय खाष्ट व त्रासदायक असे. या कारणानें तो मुलगा व तो कुत्रा दोघेही त्यांच्या शेजाऱ्यापाजा-ऱ्यांना अगदीं नकोसे झाले होते.

घरांत त्याचा बाप एकटाच होता. तो रोज घरीं त्याला भाकरी करून थाली, आणि आपण सारा दिवस कोठें तरी सोबत्यांच्या घरांत गप्पा इकें मारण्यांत किंवा दुकानांतली मेवामिठाई घेऊन खाण्यांत घालवी. एके दिवशीं कांहींएक सण होता. तेव्हां त्यानें नेहमींप्रमाणें आपल्या मुलाला सांगितलें-" घरांत तुला भाकरी झांकून ठेविली आहे; भाजीही तेथेंच आहे. भूक लागली म्हणजे घे आणि खा. शिवाय कांहीं खाऊबगैरे विकत घेण्यासाठीं हे दोन आणे तुला देऊन ठेवतों. आतां मी बाहेर जातों, तो सायंकाळीं येईन. तोंबर तूं खेळ, हिंड, काय बाटेल तें कर. माझी बाट पाहूं नको. मी जातों." असें सांगून स्वारी बाहेर निघून गेली. मुलाला मोठा आनंद बाटला. आतां आपणास सारा दिवस मोकळा, असें वाटून त्यानें आपला कुत्रा बरोबर घेतला; आणि बाप बाहेर पडतांच, त्याच्या मागोमाग आपणही भटकावयास चालला.

जरा थोडासा चालल्यावर त्यास एक मेंढरांचा कळप रस्त्यानें चाललेला आढळला. त्याबरोबर याचा कुत्रा त्या कळपावर भुंकत ओरडत धावून गेला. तेव्हां त्या कळपाबरोबर असलेला शेतकऱ्याचा पोर पुढें होऊन म्हणालाः—" बाबारे, जरा तुझें कुत्रें आवरून घर; माझीं मेंढरें त्या उजव्या हातच्या फाटकांत जावयाचीं आहेत. तीं त्या कुत्र्याच्या धावण्यानें इकडे तिकडे पळून जातील व मग मला सांपडायचीं नाहींत. तूं जरा थांब!"

" हो हो, थांबेन तर काय? मला दुसरा काय उद्योग आहे? तुझीं सारीं मेंढरें फाटकांत जात तोंपर्यंत येथें उभा राहायला मी अगदीं रिकामाच आहें! मला दुसरें काम काय? शहाणा! थांब म्हणतो आहे!"

याप्रमाणें उत्तर देऊन लागलीच त्यानें आपल्या कुत्र्याला चिथवून त्या मेंढरांच्या गर्दींत जोरानें सोडलें. ' छू छू, वाघ्या, पकड!' असें म्हणतांच वाघ्या कळपांत घुसला आणि भुंकून, व सांपडेल त्याचा लचका तोडून त्यानें त्या सर्व कळपाची दाणादाण करून सोडली. या पराक्रमाबद्दल त्या

कुत्र्यालाही त्याच्या धन्याप्रमाणें आनंद झाला. पण याप्रमाणें फार आनंदून जाऊन कुत्रा आपलें शौर्य दाखवीत असतांच त्या आनंदांत एकदम विरजण पडलें. त्या कळपांत एक बोकड होता. तो चांगला रगदार होता. त्याजपुढें कुत्रा येतांच त्यानें त्याला जोरानें ढुशी मारिली. पण ती इतकी मर्मावर लागली कीं, कुत्रा लागलीच तेथें खालीं पडला. तोंच लागलीच एकामागें एक अशा पांचचार ढुशा देऊन त्या बोकडानें त्यास अगदीं पालथें पाडून धूळ खावयास लावलें. मग तो बोकड परत वळल्यावर तें कुत्रें बिचारें कसें बसें उठून, कीं कीं करीत, व लंगडत धडपडत बाजूस पळालें. त्या पोराला त्या मेंढरांची त्रेधा उडालेली पाहून जितका आनंद झाला, तितकाच त्याचा कुत्रा धूळ खातांना पाहून झाला! कारण, त्याचें त्या कुत्र्यावर तरी खरें प्रेम कोठें होतें! तें कुत्रें भिऊन पळतांना पाहून तो खो खो हसूं लागला. परंतु, इतक्यांत दुसराच एक मुलगा त्या रस्त्यानें आला. त्यानें त्याला त्या हसण्याचें फारसें सुख घेऊं दिलें नाहीं. कारण तो सर्व प्रकार पाहून त्यास फार चीड येऊन त्यानें एक धोंडा उचलून त्याला नेमका मारला. तो त्याच्या कोपराबर बसला. त्याबरोबर त्यास अशी जोराची कळ आली, तीखरशीं तो मटकन् खालींच बसला! आणि खूप कर्कशपणानें ओरडावयास त्यानें सुरवात केली. तो आरडा ऐकून त्या कळपाचा धनी पलीकडे फाटकांत होता तोही तेथें येऊन पोंचला. मग या पोराची त्रेधा काय विचारावी! आतां येथें आपली हड्डी खूप नरम होणार हें ओळखून त्यानें तेथून मुकाट्यानें खूप जोरानें पोबारा केला!

परंतु दुसऱ्याच क्षणीं, ती कोपराची कळ राहिली न राहिली तोंच पुनः कुचाळ्या करण्याची त्याची लागलीच तयारी झाली! समोर एक गवळ्याची मुलगी रस्त्याच्या कडेला फाटकापाशीं उभी होती व तिच्या पायांपाशीं एक दुधाची मोठी कासंडी भरलेली दिसत होती. ती हा मुलगा रस्त्यावरून चाललेला पाहून त्यास म्हणाली— " बाबारे, अरे मुला!

एवढी चरवी मला उचलून दे बरें ! आईनें मला हें दूध आणावयाला अगदीं सकाळीं पाठविलें. ती मी येथवर, एक मैलपर्यंत ही चरवी कशी-बशी घेऊन आलें; पण मला तें ओझें भारी जड होऊन माझी मान आतां दुखूं लागली. म्हणून मी येथें जरा विसांव्यासाठीं टेकलें. पण मला आतां लौकरच घरीं गेलें पाहिजे. आज आमचे येथें खीर करावयाची आहे. मला उशीर झाला तर मग खीर कशी होईल ? आणि शिवाय आई मला रागें भरेल रे ! तर जरा हात लावतोस बाबा ? ”

मुलगा म्हणाला:– “ काय ? तुम्ही आज खीर करणार आहांत ? खरेंच खीर करणार ? आणि खाणार ? होय पोरी ? ”

मुलगी म्हणाली:–“ हो तर; आणि आम्ही आज पोळ्या करणार आहोंत सुरेख ! कारण आज आमच्याकडे आमचे बासुकाका, जनुकाका आणि माझे आजोबा, आणि माझा अप्पा, नाना, सगळे दुपारीं जेवावयाला यायचे आहेत ! आणि संध्याकाळीं तर आमचे येथें काय मजा मजा आहे ! खरेंच; खोटें नाहीं सांगत मी. तर चल लौकर, व एवढी कासंडी मला उचलूं लाग बरें ? दिवस पहा किती वर आला आहे तो ?”

तेव्हां ‘ हो, हो; हा पहा मी आलों ’ असें म्हणून त्यानें त्या भांड्यास हात दिला, व डोक्यावर जणूं काय ती नीट बसवितों आहें असें दाखवून त्यानें ठेंच लागल्याचा बहाणा केला, आणि तें सर्व दूध तिच्या डोक्यावरच सांडून पालथें केलें । सारें दूध पालथें झालेलें पाहून ती पोर खूप घाबरली आणि रडूं लागली. तें पाहून त्या द्वाड पोरास अगदीं मनापासून आनंद झाला व तो तिजकडे पाहून खदाखदा हंसूं लागला ! नंतर, “ पोरी, तुझ्या बासुकाकाला, नि जनूकाकाला, नि आजोबाला, नि आप्पाला, नि नानाला माझा नमस्कार ! बरें का ? ” असें म्हणून मोठ्या विजयाच्या तोर्‍यांत स्वारी तेथून पुढें चालती झाली.

या प्रसंगांत असा हा आपला खोडसाळपणा चांगला साधला व कांहीं

मानगड उत्पन्न झाली नाहीं, असें पाहून त्या द्वाड मुलाला आणखी दुष्टपणा करावयाला जोर आला. तो आपल्या अंगच्या हुषारीबद्दल आपणास शाबासकी देत जों पुढें चालला, तों जवळच एका शाळेचें एक पटांगण आढळलें. तेथें कांहीं मुलें जमून चेंडूचा खेळ खेळत होतीं. त्यांना खेळतांना पाहून यानें त्यांस विचारलें–' अरे मुलांनो, मला खेळांत घेतां का?' तेव्हां हो म्हणून त्या मुलांनीं यास आपल्यांत घेतलें. मग थोडा वेळ खेळण्यांत गेल्यावर, कांहीं खोडसाळपणा न करितां इतका वेळ व्यर्थ गेलेला पाहून त्याला अगदीं चैन पडेनासें झालें. मग चेंडू फेकण्याची याची पाळी येतांच यानें ती एक बरी संधी समजून, चेंडू नीट सरळ न फेंकतां, एका अंगाला एक मोठें चिखलाचें डबकें होतें त्यांत नेमका फेंकला. त्याबरोबर चेंडू कोठें गेला तें पाहण्यासाठीं सर्व मुलं एकदम तिकडे धांवलीं! तेव्हां या स्वारीनें सर्वांच्या मागून जाऊन, तीं सर्व त्या चेंडूकडे लक्ष देऊन पाहात आहेत तों हळूच एकाला जरा अलीकडे ओढून परत पुढच्याचे अंगावर ढकलून दिलें! तों त्याचा दुसऱ्यास, दुसऱ्याचा तिसऱ्यास धक्का लागून पटापट तीं सर्व मुलें त्या डबक्यांत पडलीं! मग या द्वाड मुलाचा आनंद काय विचारावा? त्याला अगदीं मनापासून आनंदाच्या उकळ्या फुटल्या! पुढें तो याचाच खोडसाळपणा आहे असें कळतांच तीं सर्व मुलें भराभर त्या चिखलांतून तशींच बाहेर धावलीं, व यास धरून तीं याची चांगलीच चांदी आटवणार होतीं; पण लागलींच त्यानें आपला कुत्रा छू छू करून त्यांजवर सोडला व नेहमींप्रमाणें आपण स्वतः पसार झाला. याप्रमाणें या दुसऱ्याही प्रसंगांतून स्वारी पुनः आणखी बचावली.

यानंतर या स्वारीची व एका गाढवाची गांठ पडली. तें बिचारें एका उकिरड्यावर चरत होतें. यानें आसपास कोणी नाहींसें पाहून जवळच पडलेला एक फुटका डबा घेतला आणि हळूच तो त्या गाढवाच्या शेपटीस

बांधून दिला. आणि मग तें पळावयास लागल्यावर जी मौज होईल ती पाहण्यासाठीं आपला कुत्रा त्याच्या मार्गे भुंकत सोडला ! जसें जसें गाढव जोरानें पळे, तसातसा तो डबा फडफडून जोरानें वाजे. मग तें गाढव भुजून अधिकच जोरानें पळे ! असें होतां होतां कुत्रा अगदींच लगत आल्याबरोबर त्या गाढवानें त्यास एक लाथेचा हिसडा दिला. तो अगदी त्याच्या तोंडावर लागून तत्क्षणीं तो कुत्रा घायाळ झाला व जमिनीवर लोळत पडला. तेथून तो कांहीं उठला नाहीं. तेथेंच त्याचा प्राण गेला ! पण अशा प्रकारें कुत्रा आपणास अंतरला म्हणून त्या द्वाड पोरास यत्किंचितही खेद वाटला नाहीं. कारण त्याचें त्याजवर प्रेमही तितपतच होतें. त्यास अगदी निर्लज्जपणानें तेथेंच कण्हत मरत सोडून तो पुढें चालूं लागला. तोंवर मध्यान दुपार झाली. हिंडतां हिंडतां थकून त्यास आतां भूक लागली. बापानें दोन आणे दिलेच होते. ते एका दुकानदारास देऊन त्यानें त्याजपासून पेढे घेतले व ते खात खात तो रस्त्यानें चालूं लागला. थोड्याच अंतरावर गेल्यावर, समोरून एक आंधळा माणूस हळूहळू काठी टेकीत टेकीत व रस्ता चांचपत येतांना त्यास दिसून आला. तेव्हां तो त्या आंधळ्याजवळ जाऊन म्हणाला—" म्हातारेबाबा, या रस्त्यानें एक मुलगी येतांना तुम्ही पाहिलीत का ? हिरवें लुगडें नेसलेली, व डोक्यावर चुंबळ व दुधाची कासंडी घेतलेली ती आहे. "

म्हातारा म्हणाला:—" नाहीं बाबा. मी कसला ती मुलगी पाहातों ? आज वीस वर्षें झालीं माझे डोळे जाऊन. गणू आंधळा म्हणतात तो मी बाबा."

अर्थात् हा आंधळा म्हणजे गरीब बिचारा प्राणी. त्याला पाहून कोणाच्याही पोटांत करुणा यावी; पण अशाही गरीब बापड्याला कांहीं तरी त्रास दिल्याशिवाय त्या द्वाड पोराच्यानें राहवलें नाहीं. तो त्यास म्हणाला, " गणू, तुला पाहून मला तर भारी वाईट वाटतें. तर माझ्याजवळची ही थोडीशी मिठाई मी तुला देऊं का ? ये इकडे असा. "

म्हातारा म्हणालाः– "बाळा, देव तुझें कल्याण करो. मला जरासा तुझा हात तेवढा देतोस ? म्हणजे मी तुजकडे येतों." मग त्यानें त्यास हात देऊन एका बाजूस घेतलें व रस्त्याच्या कडेला जेथें चिखल झाला होता तेथें त्यास नेऊन तो म्हणाला– "गणू, बैस खालीं. तुला बसावयाला ही जागा चांगली आहे. आणि हा घे एक पेढा तुला." असें म्हणून त्यानें रस्त्यांतला थोडासा चिखल हातांत घेऊन तो त्याच्या तोंडांत घातला! पण त्या म्हाताऱ्यास तत्काळ याचें कपट ओळखलें. जिभेला चिखलाचा स्पर्श होतांच त्यानें त्या द्वाड पोराचीं बोटें अशीं कडकडून चावून फोडून काढलीं कीं, लागलेंच तें पोर कें कें करून ओरडूं लागलें! व हात सुटावा म्हणून अगदीं गयावया करूं लागलें! तेव्हां हात सोडतां सोडतां तो आंधळा म्हणाला– "निर्लज्जा! तुला अगदींच शरम नाहीं वाटत! माझ्यासारख्या गरीब आंधळ्याची तूं अशी कुचेष्टा करतोस तें! काय, मी कधीं कांहीं तरी तुझ्या वाटेस गेलों आहें? बरें, आतां जरी तूं थवड्यावरच सुटलास, तरी खूणगांठ बांधून ठेव कीं, लौकरच तूं ताळ्यावर झाला नाहींस तर तुला पुनः चांगलें प्रायश्चित्त भोगावें लागेल."

आतां तुम्हांला असें वाटेल कीं, त्या आंधळ्यानें त्या द्वाड पोराची खोडकी चांगलीच मोडली; आतां त्यानें आपला दुष्ट स्वभाव सोडून दिला असेल. पण ती तुमची चूक आहे. वाईट संवय लागलेली सुटणें इतकें सोपें नाहीं. तो मुलगा तेथून पुढें निघाला, तों त्यास एक काठी टेकीत चालल्लेला लंगडा भिकारी आढळला. त्यानें याजपाशीं एक पैसा मागितला. त्याबरोबर या मुलानें जवळचा एक पैसा काढून त्याच्या पुढें फेकला. पण तो उचलून घेण्यासाठीं तो लंगडा भिकारी कसाबसा खालीं वाकूं लागतांच यानें त्याच्या टेकलेल्या काठीस एक जोराचा धक्का देऊन त्यास तोंडघशीं पाडिलें; व चटकन् पुढचा पैसा उचलून खिशांत टाकून खदाखदा हंसत स्वारी पुढें चालती झाली!

पण आतां त्याच्या खोड्या संपावयाची वेळ आली. कारण, तो त्या लंगड्यापासून जों पळाला तों वाट चुकून नेमका एका गृहस्थाच्या पेरूच्या बागेंत शिरला. तोंच त्या बागवाल्याचा कुत्रा धावत त्याच्या अंगावर आला. मग तेथून निसटण्यासाठीं तो कुंपणांत शिरतो तोंच त्या कुत्र्यानें त्याच्या पायाचा लचका धरला! त्याबरोबर त्यानें खूप मोठी किंकाळी फोडली. तों ती ऐकून त्या बागेचा धनी बाहेर आला व पाहतो तों हा द्वाड पोर. तेव्हां त्यानें त्या पोराला लागलीच कानाला धरून पुढें ओढलें आणि म्हणालाः—"बरे सांपडलांत बच्च्याजी! सांपडलास कीं नाहीं! तुला वाटलें–रोज खुशाल बागेंत जावें व पेरू पळवावे; आपल्याला कोण पाहणार आहे? पण आतां त्या गमजा विसरा. आतां त्या साऱ्या पापाचें घे प्रायश्चित्त! अरे चोरा!"

असें म्हणून त्यानें त्याला भराभर छपाटीनें चोप द्यायला सुरवात केली. 'अहो, मी तो नव्हे; मी देवाशपथ तुमच्या बागेंत कधीं आलों नाहीं. मी तुमचा एक सुद्धां पेरू घेतला नाहीं. मला नका मारूं!' म्हणून त्यानें त्याची पुष्कळ विनवणी केली, पण व्यर्थ. मग भरपूर मार दिल्यावर त्यानें त्यास 'तूं कोणाचा मुलगा? कोठें राहतोस?' वगैरे विचारलें. मग त्यानें आपलें नांव-गांव सांगितल्याबरोबर तो म्हणालाः—"अरेच्या! र मग सकाळचा तो द्वाड पोरगा तूंच! तूंच सकाळीं माझ्या मेंढरां-र आपला कुत्रा सोडलास! त्या वेळीं माझीं कित्येक मेंढरें कोणीकडे ळून गेलीं तीं अजून सांपडलीं नाहींत! मग आतां तुला मी सोडीन होय! ांव कशाला?" असें म्हणून त्यानें आणखी जोराजोरानें त्यास खूप छड्या गावल्या. याच्या साऱ्या विनवण्या चालल्याच होत्याः—"अहो, मी । नव्हे, मी तो नव्हे, मला सोडा!" पण त्यांकडे लक्ष न देतां त्यानें ास यथेच्छ झोडलें. व पुरेसें झाल्यावर फाटकांतून बाहेर काढून दिलें. ी त्याचा आक्रोश चालूच होता. पण या वेळीं त्यास चांगलीच अद्दल

पडली. या वेळीं मात्र त्याच्या मनांत थोडेंसें आलें कीं, " आतां निमूट-पणें आपल्या घरीं जावें. आतां असल्या कुचाळ्या करून उपयोग नाहीं. एकादे वेळीं बाजू अंगावर येणार. "

तरी त्याचीं पापें अद्याप संपलीं नव्हतीं. तो फाटकाबाहेर येतो तोंच तो लंगडा तेथें येऊन पोंचला. त्यानें त्याला लागलीच पकडलें, व हातांतील काठीनें त्यास पांचचार रट्टे लगावले! मुलगा पुष्कळ ओरडला; गयावया करूं लागला; पायां पडूं लागला; परंतु त्यानें त्याला नुकतेंच तोंडावर पाडलें होतें, त्यामुळें पुरेसें वाटेपर्यंत त्यानें त्यास झोडावयास कमी केलें नाहीं. मग त्याच्या हातून सुटल्यावर पुढें रस्त्यानें स्वारी रडत ओरडत जों जाऊं लागते, तोंच एका रस्त्याचे वळणांतून सकाळची चेंडू खेळणाऱ्या मुलांची टोळी पुढें आली! मग काय विचारतां? त्यांनीं एक मोठीच आरोळी ठोकली! व सारे जण एकदम त्याजवर चालून आले! आतां याजजवळ त्याचा कुत्राही नव्हता. तेव्हां सर्वांनीं मिळून त्यास यथेच्छ कुटलें. एकानें टोपी उडविली; एकानें शेंडी खेचली, ती अशी कीं, प्राण कासावीस होऊन त्यास अगदीं शंख करायची पाळी आली! एकानें चिमटे काढले; एकानें यथेच्छ बुकललें! एकानें तंगडी धरून फरफटत रस्त्यांतून ओढलें; एकानें ढुंगणावर एक लाथ दिली; आणि एकानें गटारांतला ओंजळभर चिखल आणून तो त्याच्या तोंडावर माखला! याप्रमाणें रस्त्यांत खूप गर्दी चालली असतां, त्याच्या सुदैवानें समोरून एक थोर गृहस्थ आलेला त्या मुलांनीं पाहिला. मग त्यास पाहातांच भिऊन, या पोरास तेथें सोडून देऊन तीं सर्व मुलें तेथून पुढें निघून गेलीं.

तो द्वाड पोर आतां रस्त्यावर अगदीं कण्हत विव्हळत पडला होता. तों ती सकाळची दूधवाली पोर त्या रस्त्यानें चाललीं असतां तिनें तें पाहिलें; व तीस त्याची करुणा येऊन तिनें त्यास तेथून उचलून जवळच असलेल्या आपल्या घरांत नेलें. घरांतल्या सर्व मंडळींनीं तो प्रकार

पाहिल्यावर त्यांनाही त्याची दया आली. मग त्यांनीं त्यास एका घोंगडीवर निजविलें. दुधाची कासंडी पालथी करणारा तो हाच मुलगा असें त्या मुलीच्या लक्षांत आलें. पण तिचा स्वभाव फार सात्विक आणि ममताळू होता. तिनें त्याची त्या वेळीं सर्व उत्तम व्यवस्था केली. मग थोड्या वेळानें तो मुलगा नीट सावध होऊन पाहतो तों ती मुलगी समोर. या वेळीं मात्र त्यास अगदीं खरा पश्चात्ताप झाला. आतांपर्यंत त्यास बरींच प्रायश्चित्तें मिळालीं होतींच; त्यांवर, या मुलीनें अपकाराची उपकारानें केलेली फेड, हें भिजून मऊ झालेल्या जमीनीवर सुंदर बी पडावें त्यासारखें झालें. मग त्यास त्यायोगें चांगलें पीक आलें. त्यानें त्या वेळीं अगदीं अंतःकरणापासून निश्चय केला कीं, कोणालाच यत्किंचित्‌ही त्रास न देतां, हरएक संधी साधून, कोणाच्याही जितकें उपयोगास येतां येईल तितकें -यावयाचें; चुकावयाचें नाहीं.

× × × ×

गोष्ट संपल्यावर बाळ म्हणाला—या दोन्ही गोष्टी किती वेगवेगळ्या तऱ्हेच्या आहेत पहा! पहिल्या गोष्टींत तो सुस्वभावी मुलगा सर्वांचा आवडता झाला आणि दुसरींत तो द्वाड पोर सर्वांना अगदीं तिरस्कारार्ह वाटूं लागला. फक्त ती दूधवाली मुलगी मात्र त्याच्याशीं प्रेमानें वागली. परंतु त्यानें तिला इतका त्रास दिला असून तिनें त्याच्या उपयोगीं पडावें हें नवल आहे! तर ती फार थोर मुलगी असली पाहिजे.

गुरुजीः—सारांश असा कीं, आपण लोकांवर प्रेम करावें, त्यांच्या उपयोगीं पडावें; तरच लोक आपणांवर प्रेम करतील, किंवा आपले उपयोगीं पडतील. शिवाय असा कोणीहि मनुष्य नाहीं कीं, त्याला गरीब व हलक्या लोकांच्या मदतीची गरज पडावयाचीच नाहीं. सर्वांवर वेळ येतच असते. यासंबंधांत मी तुला आणखी एक गोष्ट वाचावयास देणार आहें; परंतु आज आतां वाचन बरेंच झालें. तर आतां आपण थोडेसे बाहेर फिरावयास जाऊं.

बाळ:—नको गुरुजी; आपण ती गोष्टच वाचूं या. आजचा दिवस फिरावयास नाहीं गेलें म्हणून काय झालें ?

गुरुजी:—छे छे ! ही समजूत फार वाईट. वाचन हें चांगलें असलें तरी वाचावयाच्या वेळींच तें चांगलें. फिरावयाच्या वेळीं फिरणें हें वाचनापेक्षां चांगलें. प्रत्येक गोष्टीची वेळ ठरलेली असावी. गोष्ट चांगली असली तरी ती वाटेल त्या वेळीं किंवा वाटेल तितका वेळ करीत राहणें योग्य नाहीं. नियमितपणा सर्वत्र पाहिजे. तो एकदां सुटला, कीं सारेंच अव्यवस्थित होऊन, एक कांहीं धड हातीं लागणार नाहीं. तर या वेळीं वाचनासाठीं आपण फिरणें गमवितां कामा नये. आतां ती गोष्ट आपण उद्यां वाचूं.

मग ते सर्व फिरावयास गेले. दुसरे दिवशीं ठरलेली वेळ होतांच बाळानें त्या गोष्टीची आठवण केली. तेव्हां गुरुजींनीं आपलें पुस्तक काढून पुढील गोष्ट बाळास वाचावयास सांगितली.

---

# २४ हनुमंता शिलेदार.

आप्पाजीपंत देशमूख या नांवाचे एक मोठे श्रीमान् गृहस्थ पुष्कळ दिवसांपूर्वी बडोदें येथें राहात असत. त्यांच्या पदरीं हनुमंता नांवाचा एक मराठा इसम नोकरीस होता. हनुमंता फार प्रामाणिक व खरा स्वामिनिष्ठ नोकर होता. त्याचे अंगचे थोर गुण पाहून आप्पाजीपंतांनीं त्याला हनुमंता शिलेदार असें नांव प्रेमानें ठेविलें होतें. अर्थातच त्यांची त्याच्यावर फार मर्जी बसली होती. इतकी कीं, कोणी परक्या मनुष्यानें त्या दोघांस पाहिलें तर हा एक आप्पाजीपंतांचा पाठचा भाऊच आहे, असें त्यास वाटावें. हनुमंताला बरोबर घेऊन आप्पाजीपंत भोजनास बसत. त्यास कपडेलत्ते वगैरे फाटके असले तर त्यांस कधीं खपत नसे. हनुमंता

एकादे वेळीं कांहीं कामाला बाहेर गेला, व त्यास परत यावयास वेळ लागला, तर तो येईपर्यंत आप्पाजीपंत कांहीं जेवावयाचे नाहींत; आल्यावर, त्याला कां उशीर लागला वगैरे विचारून, त्याचें पान वाढण्यास सांगून मग जेवावयास बसावयाचे. त्यांचें हें हनुमंतावरील प्रेम व सलगी पाहून कित्येकांस फार चमत्कार वाटे. स्वतः आप्पासाहेबांच्या कुटुंबाला तर ही सलगी अगदीं नापसंत होती. त्या बाईला वाटे, "आपण थोर मोठ्या घराण्यांतले लोक, आपण त्या गरीब हलक्या माणसाशीं बरोबरीनें कसलें वागावयाचें ? असें करण्यानें आपल्या योग्यतेला कमीपणा येतो. मनुष्य चांगला असला म्हणून काय झालें ? श्रीमंत व गरीब लोकांनीं नेहमीं आपापले पायरीप्रमाणें वागलें पाहिजे." उलट आप्पाजीपंत म्हणत:— "संपत्तीवर माणसाचा थोरपणा अवलंबून नाहीं. गुणांनीं थोर तोच थोर. त्यास सर्वांनीं सारखाच मान दिला पाहिजे. गुणांच्या पुढें संपत्तीची योग्यता काय आहे ? दैववशात् कोणी श्रीमंतांचे कुळांत जन्मतात; कोणी गरीब आईबापांचे पोटीं येतात; पण तेवढ्यावरून त्यांची थोरवी कांहीं कमीजास्त होत नाहीं. अथवा जे थोर गुणाचे लोक असतील तेच खरे श्रीमंत. मग त्यांजपाशीं द्रव्य पुष्कळ असो अथवा नसो."

हनुमंतासंबंधानें आप्पाजीपंतांच्या घरांत, त्याला वागवण्यासंबंधांत असे दोन पक्ष होते. एक आप्पाजीपंतांचा व दुसऱ्या त्यांच्या कुटुंबाचा. आप्पाजीपंतांनीं आपले विचार आपले कुटुंबास वारंवार सांगावे; परंतु ते त्या बाईस अद्याप मानवूं लागले नव्हते. ती एके दिवशीं आप्पाजीपंतांस म्हणाली, "नोकरीस ठेवलेला एकादा गडी, त्याची योग्यता ती किती थोर असणार ? पोटासाठीं कोठेंही कांहीं काम करावयाचें हें त्याचें शील; मग जेव्हां तेव्हां त्या हनुमंताचें एवढें काय प्रेम वाटतें कोण जाणे ! त्याची योग्यता म्हणे मोठी आहे, मोठी आहे ! पण ती आहे तरी किती ? आणि ती कशी काय पाहून ठेवली आहे, ती मला तरी एकदां सांगावी !"

आप्पाजीपंतः—" पोटासाठीं कांहीं तरी काम करणारा तो माणूस नाहीं. हवें तर त्याचें प्रत्यंतर घे. प्रामाणिकपणा व स्वामिनिष्ठा या गोष्टी पोटासाठीं काम करणाऱ्या माणसापाशीं कितीशा असतील ! पैशाच्या मिषानें आपल्या हनुमंताला एकादें अप्रामाणिकपणाचें किंवा धन्याच्या द्रोहाचें काम सांग पाहूं, म्हणजे माझ्या म्हणण्याचा तुला लागलीच प्रत्यय येईल. "

कुटुंबः—हा आपला कांहीं तरी भोळा विश्वास आहे. पैसा पुढें केला तर हनुमंताच काय, पण झाडून सारे प्रामाणिक चाकरलोक आपला प्रामाणिकपणा लागलीच गुंडाळून ठेवतील. त्यांत प्रत्यंतर कशाला पाहावयाला पाहिजे! पैशाचा लोभ मोठा अनावर आहे. तो कोणाला आवरला आहे !

नवराबायकोंचीं अशीं भाषणें वारंवार चालत. परंतु त्यायोगें कोणाच्या विचारांत प्रायः बदल झाला नाहीं. नाहींतरी वादविवादानें मनुष्य आपले विचार सुधारतो, अशीं उदाहरणें थोडींच. खरा बदल अनुभवानेंच होत असतो. असो, पुढें एकदां शेतीच्या कामाचा हंगाम सुरू आला. आप्पाजीपंतांची शेतीवाडी मोठी होती. पण तिजवर नजर ठेवावयाला आपलें माणूस नेहमीं कोणीतरी पाहिजे असें वाटून यंदां अप्पाजीपंतांनीं हनुमंताला तिकडे पाठवून देऊन आपण मधून मधून जाऊन यावयाचें ठरविलें. मग त्याप्रमाणें हनुमंता शेतावर राहण्यास गेला. हनुमंता दूर गेल्याबद्दल आप्पाजीपंतांचे कुटुंबास कांहीं विशेष वाटलें नाहीं; पण आप्पाजीपंतांस, विशेषतः त्यांचा मुलगा अण्णासाहेब यास विशेष करमेनासें झालें. अण्णासाहेबाचा हनुमंताशीं रोजचा सहवास. अण्णासाहेब जिकडे जाईल, तिकडे हनुमंता नेहमीं बरोबर असावयाचा. या दृढ संगतीमुळें त्याच्यांत बालभावानुसार जें प्रेम उत्पन्न झालें होतें, त्यामुळें अण्णासाहेबाला तर आपला जिवलगच दूर गेलासें वाटून अगदीं चैन पडेनासें झालें.

असे एक दोन महिने गेले. आतां हनुमंताचें स्मरण आप्पाजीपंतांच्या घरीं पूर्वीप्रमाणें वारंवार कोणास होईनासें झालें. फक्त अण्णासाहेब मात्र मधून

मधून आप्पाजीपंतांस विचारी कीं, हनुमंता परत घरीं कधीं येणार आहे? त्यावर 'येईल लौकर' असें आप्पाजीपंतांचें ठराविक उत्तर मिळे, झालें.

यानंतर एके दिवशीं एक आकस्मिक प्रसंग घडून आला. रात्रीं बारा वाजण्याचा सुमार. अशा वेळीं आप्पाजीपंतांच्या वाड्यास आग लागली! आणि दोन तासपर्यंत ती आग खुशाल पसरून, वाड्याचा पुढचा भाग सर्व पेटून जळून खालीं बसला; व मध्यभाग पेटून सर्व वाडाभर ज्वाळा भडकूं लागल्या! तोंवर ही आग लागल्याचें आंत कोणासच कळून आलें नाहीं! परंतु मध्यभागीं आगीचा डोंब होतांच जो अनर्थ झाला तो सांगतां येणें अशक्य आहे! सर्वत्र हाहाःकार माजला व सर्वजण जागे होऊन, 'आप्पाजीपंत! आप्पाजीपंत!' म्हणून मोठ्यानें ओरडूं लागले! लोकांनीं गर्दी केली, व त्या आगीच्या डोंबांतून आप्पाजीपंत व त्यांचें कुटुंब हीं कशीं तरी ओढून बाहेर काढलीं. आणि मग कोणी घरांतील कांहीं सामान बाहेर ओढूं लागले व कोणी आग विझविण्याकरितां शक्य तो प्रयत्न करूं लागले. पण आतां आग आवरण्याजोगी नव्हती. खांब, तुळया व कडीपाट भराभर खालीं ढासळत होते व धुराचे लोटच्या लोट घरांतून, खोल्यांतून दिवाणखान्यांतून बाहेर पडत होते! त्यामुळें पुढें होऊन आग विझविण्याचा किंवा कांहीं सामान बाहेर काढण्याचा प्रयत्न करणें म्हणजे प्रायः जिवें मरण्याची वेळ होती. त्यामुळें सर्व लोक हवालदिल होऊन गेले! इतका प्रकार होईपर्यंत आप्पाजीपंतांचा मुलगा माडीवर पलीकडील दिवाणखान्यांत निजला होता त्याची लोकांस आठवणच नव्हती. आप्पाजीपंत सारखे ओरडत होते, पण तिकडे लोकांचें लक्ष आतां गेलें. पाहतात तों मुलगा बाहेर आलेला नाहीं! त्याचें काय झालें? अग्निनारायणानें त्या बाळाची आहुति घेतली काय? आप्पाजीपंत तर व्याकुळ होऊन जमिनीवर मूर्छित पडले! त्यांच्या कुटुंबाची तीच दशा झाली. तोंच पली-कडच्या गच्चीवरून एक किंकाळी ऐकूं आली! त्याबरोबर सर्वांचे डोळे

फांकले! आप्पाजीपंत जरा शुद्धीवर येऊन ' माझा अण्णा–अण्णा–अण्णा आहे का हो!' म्हणून गयावया करून सर्वांना विचारूं लागले. तोंच मुलगा गच्चीवर आला व तेथून खालीं जमलेल्या लोकांना–अगदीं कासावीस होऊन—" मला खालीं घ्या! मला काढा! मला वांचवा!" म्हणून सारखा विनवण्या करूं लागला! पण, आतां एवढ्या आगींत शिरणार कोण? आणि अण्णाला खालीं आणणार कोण? लोक धैर्यानें वारंवार पुढें घुसत, परंतु पसरणारे आगीचे लोट व वारंवार कोसळून पडणारे इमारतीचे भाग, यामुळें ते पुनः कच खात! वरून सारख्या आरोळ्या चालल्याच होत्या. आप्पाजीपंत ओरडूं लागले—" अहो! कोणी माझ्या बाळाला काढा! मी त्यास १० हजार रुपये बक्षीस देतों! आणखी काय हवें तें देतों. पण माझ्या अण्णाला काढा रे! काढा रे! अण्णा, अण्णासाहेब! ये रे!" परंतु कोणास धैर्य होईना. आप्पाजीपंतांनीं डोळे पांढरे केले, व ते पुनः जमिनीवर बेशुद्ध होऊन पडले!

अशा वेळीं एक चमत्कार झाला. एक माणूस गर्दी बाजूला सारीत पुढें चालला. लोकांनीं आधींच आणून ठेवलेल्या शिड्यांतून एक शिडी घेऊन त्यानें त्या तशा आगीच्या डोंबांत टेकवून ती उभी केली व तो सपासप वर चढूं लागला! तो गेला आणि दिसेनासा झाला! हा वीर मात्र आतां फत्ते करणार, असें जों सर्व म्हणत आहेत, तोंच आणखी एक आगीचा मोठा लोट आंतून बाहेर आला! त्याबरोबर सर्वांना कळून चुकलें कीं, तो माणूस जळून खाक झाला! पण पुढल्याच क्षणीं अण्णाला खांद्यावर घेऊन त्याच वेगानें तो त्या शिडीवरून खालीं उतरतांना दिसून आला. शिडीवरून उतरून त्याचा पाय जमिनीवर टेकला न टेकला तोंच ती शिडी जळून खालीं खाईंत पडली! आणि तो माणूस व आप्पाजीपंतांचा मुलगा अण्णा आगींतून बाहेर आले! बाहेर येतांच तो माणूस बेशुद्ध होऊन जमिनीवर पडला! पण मुलाला कांहीं विशेष इजा झालेली नव्हती.

' मुलगा निघाला! मुलगा निघाला!' ह्मणतांच आप्पाजीपंतांनीं डोळे उघडले आणि अण्णाला पाहून त्यांनीं त्यास एकदम मिठी मारली! त्याची आई धावून आली, व तिनें त्यास पोटाशीं करून आसवांनीं त्याचें मस्तक भिजविलें. असे एकदोन क्षण गेले, तोंच त्यास काढून आणणारा कोठें आहे, म्हणून सर्वजण पाहूं लागले, तों तो बेशुद्ध पडलेला होता! मग तारतोब उपचार करून त्यास सावध केलें, व पहातात तों आप्पासाहेबांचा आवडता हनुमंता शिलेदार तोच हा! त्यावरोबर सर्वांना अतिशय आनंद वाटला. पण लागलीच आप्पाजीपंतांनीं प्रश्न केला—" हनुमंता, तूं या वेळीं येथें कसा आलास? तूं असतास तर माझ्या बाळास लागलीच खालीं काढतास असें मला वाटलें. पण तूं कोस दोन कोसांवर दूर. त्यामुळें तू येशील व आज असा आनंदाचा दिवस येईल अशी मला कल्पनासुद्धां नव्हती! देवाची केवढी दया ही!"

आतां हनुमंता सावध झाला होता. आप्पाजीपंतांनीं प्रश्न करतांच त्याचे डोळे भरून आले. मग क्षणभर थांबून तो आपली हकीगत सांगूं लागला. तो म्हणाला:—"मळ्यामध्यें आम्ही जेवणें करून जरासे बसलों होतों. इतक्यांत एक डफवाला आला. त्यानें त्या डफावर कित्येक पोवाडे व लावण्या म्हणून दाखवल्या. त्यांत आह्मांस फार मौज वाटली. एक वाजेपर्यंत आम्ही तीं गाणीं ऐकत बसलों. नंतर पडावें म्हणून जों उठतों, तों जवळच्या टेकडीवरून पिरा मांग ओरडला—' शहरांत आग लागली रे आग! पहा भडका कसा झाला आहे तो!' तों मी चपापलों. टेकडीवर चढून पाहतों तों आग आपल्या वाड्याकडेच कोठेंतरी असावी असें वाटलें, म्हणून वेशीबाहेर आलों. तों लोकांचा गलबला ऐकूं आला! मग धावतच इकडे आलों. येतांच अण्णासाहेबांबद्दल जिकडे तिकडे हाकाहाक झालेली ऐकली. मग आप्पा! मला कांहीं सुचेनासें झालें बघा! मन वेड्यासारखें झालें. आणि मागें पुढें न पाहतां एकदम आगींत घुसलों!

अण्णासाहेबाला उचललें व परतलों. मग पुढें काय झालें तें मला कांहीं ठाऊक नाहीं. अण्णासाहेब निघाला का हो बाहेर ! देवा ! देवा ! अण्णा-साहेबाला मला एकदां तरी भेटूं द्या हो ! ”

बोलतां बोलतां हनुमंता रडूं लागला. पुनः एकवार तो बेशुद्ध झाला. आप्पाजीपंतांनीं त्यास पुन्हां सावध करण्याचा प्रयत्न केला; व आतां अण्णाही जवळ येऊन ‘ हनुमंता ’ म्हणून त्यास हाका मारूं लागला. मग हनुमंता सावध झाला व समोर तो बाळ पाहतांच अगदीं गहिंवरून आला ! त्या स्वामिभक्त हनुमंताचें प्रेम किती सांगावें ? ज्यानें आपला देह स्वामिकार्यासाठीं सर्वस्वी अग्निनारायणास अर्पावयाची तयारी केली, त्याच्या धैर्याचें, पराक्रमाचें, स्वामिभक्तीचें, औदार्याचें, व प्रामाणिकपणाचें कौतुक कसें व किती करावें तें आह्मांला कळत नाहीं !

आप्पाजीपंतांनीं बोलल्याप्रमाणें दहाहजार रुपयांचें बक्षीस त्यास देण्यास काढलें, पण तें त्या उदार हनुमंतानें स्वीकारलें नाहीं. तो म्हणाला, “ आप्पा, मला या मोहरा घेऊन काय करावयाचें आहे ? मी रोज तुमचेंच अन्न खात आहें. हें माझें शरीर सर्व तुमच्याच खरोखर मालकीचें आहे. तें आज या प्रकारें तुमच्या कार्याला थोडेंतरी आलें हें माझें भाग्य होय. आतां माझें देवाला मागणें एवढेंच आहे कीं, माझ्या अण्णाला उदंड आयुष्य त्यानें द्यावें; व त्यास अशीच बरकत नेहमीं राहून, आह्मांला त्यांच्या पदरीं अशींच नेहमीं भाकरी मिळावी.”

या प्रसंगीं मात्र आप्पासाहेबांच्या कुटुंबाला हनुमंताची योग्यता काय आहे ती खरी कळून आली. गरीबींत दिवस काढणाऱ्या लोकांतही खरीं थोर माणसें कशीं आढळतात हें त्यांच्या आतां प्रत्ययास आलें. आप्पाजी-पंतांनीं आपल्या त्या इमानी नोकरास आपला पांचचार बिघ्यांचा एक मळा बक्षीस देऊन त्यायोगें त्यास व त्याचे पोरांबाळांस कायमची निर्वा-हाची सोय करून दिली !

वाचन संपल्याबर गुरुजी ह्मणाले–' बाळ, तुझ्या घरीं जीं चाकर-माणसें आहेत, त्यांत एकादा तरी हनुमंता शिलेदार असेल. तुला कल्पना आहे ?

---

## २५ शेतकऱ्याच्या मळ्यांत.

यानंतर हरी आणि बाळ यांनीं रोज सकाळीं कोठेंतरी दूर फिरावयास जावयाचें मनांत आणून त्यास गुरुजींची संमति विचारली. मग गुरुजींनीं हो म्हणतांच ते दोघे एके दिवशीं सकाळीं उठून, नित्याप्रमाणें सर्व विधि आवरून गुरुजींबरोबर देवालयांत आले, आणि देवास नमस्कार करून, तसेंच फिरावयास बाहेर पडले. ती सकाळचा सुंदर शिळोप्याची वेळ, आसपासची वनश्री, दऱ्याखोरीं व ओढेओघळी पाहून त्यांस फार आनंद वाटला. त्या भरांत ते बरेच लांबवर गेले. मग विश्रांतीसाठीं एका आंब्याच्या खालीं, एक झाडाचा बुंधा आडवा पडला होता, त्यावर थोडा वेळ बसले. तेथें जवळच एका शेतकऱ्याची एक झोंपडी होती. त्या शेतकऱ्याची बायको आपल्या गुरांस वैरण टाकण्याकरितां बाहेर आली असतां तिनें त्यांस पाहिलें. तेव्हां तिला त्यांच्या मुद्रेवरून व पोषाखावरून हीं कोणी चांगल्यांचीं मुलें असावीं असें वाटून तिनें जवळ जाऊन सहज यांस प्रश्न केला–" बाळांनो, कां इकडे दूर बसलां आहांत ? तुमची वाट चुकली का ? किंवा पुष्कळ चालून आल्यामुळें जरा विसाव्यास बसलां आहांत ? बसावयाचें असल्यास इकडे बाजूला कशाला ? आमच्या झोंपडीशीं चला. तिथें मी घोंगडें टाकून देतें, त्यावर घटकाभर बसा व मग जा. चला, या बाळांनो इकडे."

बाळ ह्मणाला—" बाई, आमची वाट चुकली नाहीं. आम्ही येथें उगीच थकून बसलों आहोंत. तुमची झोंपडी कोठेशीं आहे ? "

बाई—ही नव्हे का आमची झोपडी ? तुमच्या अगदीं पाठीमागें. चला असे, या माझ्यामागून. " त्याबरोबर दोघेही जण कांहींएक न बोलतां त्या बाईच्या मागें गेले. बाईनें त्यांस झोपडीपाशीं उघड्यांत एका झाडाखालीं एक घोंगडें पसरून, बसावयास सांगून, ती आंत गेली. आणि नुकतीच गाईची धार काढली होती तें दूध दोघांस दोन वाट्या भरून तिनें पिण्यास आणून दिलें. हा अकल्पित पाहुणचार पाहून हरीस फार संकोच वाटला. तो म्हणाला—बाई, दूध तुह्मीं कशाला आणिलें ? आम्ही तुमचे कांहीं आप्त नव्हे, कीं पाहुणे नव्हे, कीं नुसते ओळखीचे सुद्धां नव्हे. मग हें दूध आह्मांला कशाला देतां व आम्हीं तरी तें कसें बरें घ्यावें ?

बाई म्हणाली—बाळांनो, तुम्ही दमून आलां आहांत; घ्या हें दूध तुम्ही. एवढ्या दुधाला कशाला मोठी ओळख आणि पाहुणेपणा पाहिजे ?

तरी हरीनें बरेच आढेवेढे घेतले. पण अतिशय कनवाळूपणानें त्या बाईनें आपणास एवढा आग्रह करावा व आपण तो मोडून तिचें मन दुखवावें हें बरें नव्हे, असेंही त्याच्या मनास वाटलें. बाळहि आधींच त्या विचाराचा झाला होता. तेव्हां त्यांनीं तें दूध घेतलें. ते लांबवर चालले असल्यामुळें त्यांस तें वेळेवर मिळालें व त्यायोगानें त्यांस चांगली हुषारी वाटली. नंतर ते इकडे तिकडे पाहूं लागले. तोंच त्या बाईचें एक लहान मूल हातांत एक चतकोर भाकरी व त्यावर तेल आणि चटणी घेऊन खात खात बाहेर आलें. त्यास पाहून बाळ म्हणाला—" हरी, हें एवढेंसें लहान मूल तिखट आणि भाकरी कसें रे खात आहे ? याला तूप आणि भात करून कां रे देत नाहींत ? "

तें ऐकून ती बाई म्हणाली—" बाबांनो, आम्ही गरीब लोक; आमचे घरीं मुलांना नेहमीं तूप आणि भात कोठून मिळणार ? आम्ही सारींच माणसें नेहमीं चटणी भाकरीच खाऊन राहतों. "

बाळ म्हणाला— भात नाहीं तर, तुम्ही थोडासा शिरा करून तो मुलां-

ना कां देत नाहीं ? शिरा गव्हाचा करितात; व गहू तुमच्या शेतांत पिकत नाहींत काय ?

बाई—बाळ, आम्हां गरीबांना शिरा म्हणजे काय हें सुद्धां ठाऊक नाहीं. गव्हाचा सांजा म्हणजे शिरा काय ? आमचे येथें तो सांजासुद्धां वर्षांतून केव्हां तरी एखादे दिवशीं होतो किंवा होत नाहीं. आतां गहू जरी आमचे येथें पिकतो, तरी बाळ, तो घरींच खावयास ठेवून आमचें चालत नाहीं. सरकारची चावडी भागविण्यासाठीं व शेतीला लागणाऱ्या खत-पाण्यासाठीं तो सर्व गहू आम्हांला बाजारास नेऊन विकावा लागतो. म्हणून आम्ही नेहमीं चटणभाकरीवरच निर्वाह करतों आणि आम्हांला व आमच्या मुलांना या सकाळच्या न्याहारीच्या वेळीं तीच चटणी भाकरी फार गोड लागते. आम्हांस भात किंवा शिरा किंवा सांजा यांची कधीं आठवण सुद्धां होत नाहीं.

बाळ म्हणाला:—खरेंच का तुम्ही नेहमीं चटणी आणि भाकरी खातां ! तर मग मोठा चमत्कारच आहे ! आणि एवढ्याशा मुलांना सुद्धां ती सोसते ! कांहीं होत नाहीं ?

हरी म्हणाला—बाळ, तुला हें माहीत नाहीं का, कीं जो श्रम पुष्कळ करतो, त्यास अन्न चांगलें पचतें व त्यास भूकही चांगली लागते ? त्यामुळें अगदीं साधें अन्नही त्यास रुचकर लागतें. आपल्या गुरुजींनीं हें आपणांस किती तरी वेळ सांगितलें आहे, नाहीं ! ”

बाळः—खरें आहे. आतां तें मला आठवलें.

यानंतर त्यांचें भाषण कांहीं वेळ थांबलें. नंतर ते तेथून उठून सहज झोंपडीच्या दुसऱ्या अंगास गेले. तों तेथें दहाबारा गुळाच्या ढेपी एका सोप्यांत एका धोतराखालीं झाकून ठेविलेल्या दिसल्या. तें पाहून बाळास नवल वाटलें. तो म्हणाला:—“ हरी, इतका गूळ यांनीं कशाला घेऊन ठेविला आहे रे ? यांना इतका गूळ खावयास लागतो काय ? ”

तो प्रश्न ऐकून त्या शेतकऱ्याची बायको पुढें होऊन म्हणालीः--बाळांनो, हा आमच्या शेतचा गूळ; आतां आम्ही हा नेऊन बाजारांत विकणार; व येतील त्या पैशांनीं सालाच्या बेगमीचें धान्य, मीठ मिरची, पोराबाळांना कापडचोपड वगैरे घेऊन ठेवणार. आतां आम्हांला उभ्या वर्षांत पुनः पैसा म्हणून पाहायला मिळणार नाहीं. आमचें वर्षाचें अन्न तें हेंच.

बाळ म्हणालाः—पण हा गूळ तुमच्या शेतचा कसा ? शेतांत गूळ कसा तयार होईल ?

बाईः—बाळांनो, शेतांत गूळ होत नाहीं. पण शेतांत हा आम्हीं ऊंस लावला आहे ना ? त्याच्यापासून पुढें आम्ही गूळ तयार करतों.

बाळः—ऊंसाचा गूळ कसा तयार करतां येतो ?

बाईः—" बाळांनो, जरासे इकडे या; म्हणजे तें सर्व तुह्मांस सहज समजेल. " असें म्हणून त्या बाईनें त्या मुलांस पलीकडेच असलेल्या गुऱ्हाळघराकडे नेलें. तेथें तो जमिनींत पुरलेला मोठा चरक व जवळच चुलाणावर ठेवलेली मोठी काहील त्यांस दाखवून ती ह्मणाली:-" पहा हा चरक. यांत ऊंस घालून त्याचा रस आम्ही काढतों, नंतर तो घागरींनीं भरून त्य काहिलींत ओततों. काहिलीच्या खालीं बराच वेळ मोठा जाळ लावला म्हणजे तो रस कढून, आटूं लागून, शेवटीं घट्ट होतो. मग तो बराचसा घट्ट झाला म्हणजे ती काहील या दुसऱ्या उथळ काहिलींत ओतून तो गूळ निवूं देतों. नंतर जमिनींत असे हे मोठे खळगे, म्हणजे ढेपाळीं करून ठेविलीं आहेत, त्यांत एकादें धोतर वगैरे टाकून त्यांत तो भरतों. मग या अशा ढेपी तयार होतात. तुम्ही आणखी ८ दिवसांपूर्वीं आलां असतां तर हें सर्व तुम्हांस पाहावयास सांपडलें असतें. या गुळाच्या साईच्या वड्या, बाळांनो, तुम्हीं कधीं पाहिल्या आहेत का ? "

असें म्हणून ती बाई पुनः आपल्या झोंपडींत गेली, व तिनें दोन सुरेख पिवळ्या जरद वड्या आणून त्या दोघांच्या हातांवर दिल्या. त्या मोठ्या

खुसखुशीत होत्या. त्या त्या दोघांस फारच आवडल्या. तोंच घरची आठवण होऊन हरी म्हणाला:—" बाळ, आपणांस वेळ किती तरी झाला ! सर्व गोष्टी अगदीं प्रमाणांत पाहिजेत असें आपणांस आपले गुरुजी सांगतात. पण आपण आज तो नियम मोडला. आतां आपण तांतडीनें घरीं गेलें पाहिजे. सूर्य किती वर आला आहे पाहिलास ? "

याप्रमाणें हरीनें आठवण करतांच बाळालाही जाण्याची त्वरा झाली. पण गरीबांचे उपकार आपण फुकट घेऊं नयेत असें तो नुकतेंच शिकला होता. म्हणून, त्या बाईनें एवढा वेळ आपल्यास प्रेमानें पुष्कळ माहिती सांगितली, दूध दिलें, गुळाच्या वड्या दिल्या, या तिच्या उपकारांबद्दल आपण कांहीं तरी फेड करावी, असें त्याच्या मनांत फार आलें. पण तसें करावयास त्याच्या जवळ कांहींच नव्हतें. तरी आतां त्याचें मन बरेंच कनवाळू व मृदु झालें होतें. तेव्हां त्यानें आपल्या अंगांतील कोट काढला व तो तिजपुढें करून तो म्हणाला:—-बाई, तुमच्या मुलाला हा माझा कोट घ्या. नाहीं म्हणूं नका. थंडीचे दिवसांत तो त्यास घालायला होईल.

पण बाईनें तो स्वीकारला नाहीं. ती म्हणाली:—"बाळांनो, तुम्ही फार चांगलीं मुलें आहां. पण हा तुमचा कोट आम्हांला नको. आमच्या शेतकऱ्यांच्या मुलांना असला श्रीमंती कोट कशाला पाहिजे ? आतां मीं जें तुम्हांस दूध दिलें, तसें पेलाभर दूध अशा एकाद्या चांगल्या मुलाला देण्याची देवाच्या दयेनें आम्हांला ऐपत आहे. तेवढ्यानें कांहीं आमच्या संसारांत अडचण होत नाहीं." असें म्हणून तिनें अतिशय आग्रह करून तो कोट बाळास परत घालावयास लावला.

नंतर ते दोघे त्या गरीब शेतकरिणीच्या चांगुलपणाबद्दल विचार करीत निमुटपणें रस्त्याला लागून लागलीच गुरुजींकडे परत आले.

---

# २६ गुळावर जप्ती



यानंतर ५।४ दिवसांनीं पुनः एकदां ते याच रस्त्यानें फिरावयास आले. पण ते त्या शेतकऱ्याच्या झोंपडीपाशीं पोंचतात, तोंच त्यांस एक निराळाच प्रकार दृष्टोत्पत्तीस आला. त्यांच्या मागोमाग एक सरकारी शिपाई व त्याबरोबर दुसरा एकजण असे त्या झोंपडीपाशीं आले. मग तो शिपाई त्या बाईला झोंपडीबाहेर हाक मारून म्हणाला—" बाई, तुमचें नांव काय ? येथें गोपाळा जाधव हें कोणाचें नांव आहे ? "

बाई:—त्यांचीच ही झोंपडी, त्यांचाच हा मळा आहे. खरें सांगायला भीति काय ? मी त्यांची बायको. तुमचें त्यांच्याकडे काय काम आहे ? "

शिपाई:—काम काय तें मग सांगतों. आधीं गोपाळा कोठें आहे तें सांग लौकर ! "

बाई:—ते आतां विहिरीवर गेले आहेत; ते आतां येतील लवकरच. पण त्यांच्याकडे तुमचें काय काम आहे तें मला सांगा तरी !

' सांगतों, ऐक. ' असें म्हणून त्या शिपायानें जवळचा एक कागद काढला; व तो उघडून तो म्हणाला—" हा पहा त्याच्यावर कोर्टाचा हुकुमनामा झाला आहे. चंदूलाल शेटजींचे शंभर रुपये त्यानें आतांच्या आतां दिले पाहिजेत. नाहीं दिले तर तुमच्या येथील सारा माल जप्त करून न्यायला आम्हांस हुकूम झाला आहे. आम्ही हा सर्व माल सरकारच्या ताब्यांत घेणार आणि त्याचा लिलाव करून शेटजींचे पैसे चुकते करणार. "

अर्थात् तो शिपाई बेलीफ होता. व त्याबरोबर चंदूलाल शेटजींचा तो एक कारकून आलेला होता. त्यांच्या त्या क्षुब्ध मुद्रा पाहून व त्याचें तें भाषण ऐकून ती बाई बिचारी अगदींच घाबरली. ती म्हणाली—" चंदूलाल शेटजींचें नांव सुद्धां आम्हांला माहीत नाहीं. तुमचें नांव गांव कांहीं तरी

चुकलें असेल असें मला वाटतें. कारण मला असें खास ठाऊक आहे कीं, आम्हांला कोणाचें एक पैसुद्धां देणें नाहीं. वर्षाच्या कांठीं एकदां आमच्या इनामदाराचा धारा आम्हीं घातला, म्हणजे आम्हांला कोणाचें कांहीं देणें घेणें नसतें. आणि त्यांचा धारा दरवर्षाप्रमाणें यंदा नुकताच एक महिन्यापूर्वींच आम्हीं पोंचविला व त्याची पावतीहि आणली. तेव्हां आतां आमच्या घरीं कोणीच पैसे मागावयास येण्याचा संभव नाहीं. तुम्हीं कागदावरचें नांव नीट पाहिलें काय ?"

शिपाई:—छे छे ! नीट काय पाहावयाचें आहे ? हें नव्हे. स्पष्ट—गोपाळा जाधव घडशीकर ! पण आतां त्याला येऊं दे. तो येईपर्यंत आम्ही जरासे बाहेर फिरतों. मग तो आल्यावर त्यालाच काय तें विचारूं म्हणजे झालें.

असें म्हणून ते दोघे जरा एकीकडे निघून गेले. बाळ आणि हरी हा प्रकार पाहातच होते. पुढें हा बेलीफ काय करणार अशी त्यांना काळजी वाटूं लागली. इतक्यांत एक चाळीस वर्षें वयाचा, शरीरानें बेताचा, पण समाधानी वृत्तीचा मराठा माणूस खांद्यावर मातीची घागर भरून घेऊन झोंपडीशीं आला, व घागर व चुंबळ खालीं ठेवून झोंपडीच्या दारांत डोकावून म्हणाला:—"न्याहारी तयार झाली का ग ?"

"हो, तयार झाली आहे. पण आज दुसरेंच एक जेवण तयार होऊन आलें आहे तें कळलें का ? पण मला वाटतें, त्या माणसांनीं चंदुलाल शेटजींची जी हकीगत सांगितली, ती सर्व चुकीची असली पाहिजे."

चंदूलालाचें नांव ऐकल्याबरोबर गोपाळा एकदम दचकला. त्याची चर्या लागलीच बदलली. आणि त्याच्या आनंदी वृत्तीवर एकदम चिंतेचा काळा ढग पसरून तो फिक्का दिसूं लागला. बायको पुढें ह्मणाली:—

चंदूलालाचे आपण १०० रुपये देणें आहों, ही गोष्ट खरी आहे का ?

नवरा म्हणाला—शंभर का किती हें माझ्या चांगलें ध्यानांत नाहीं, पण आज तीन वर्षांपूर्वीं जेव्हां तुझ्या भावाच्या घरावर या चंदूलालाची जप्ती

आली होती, तेव्हां या शेटजीच्या देण्याबद्दल त्याला ते तुरुंगांत घालणार होते. त्या वेळीं त्याची सुटका व्हावी ह्मणून मी पुढें झालों; व 'त्याचें देणें त्यानें न फेडल्यास मी फेडीन, तें सर्व मजकडे लागलें;' असें म्हणून मी त्यास जामीन राहिलों व मग तो सुटला. त्यानें मला अगदीं हातावर हात देऊन सांगितलें कीं, मी मुंबईला गिरणींत कामावर जातों, व दरमहाचे दरमहा तुला माझा पगार पाठवीन. पण या उभ्या तीन वर्षांत त्यानें पैसा तर पाठविला नाहींच; पण एक खुशालीचें पत्रहि नाहीं. व तो कोठें आहे हेंहि त्यानें आपणांस कळविलें नाहीं! आतां काय करावयाचें?

त्याबरोबर त्या बाईला एकदम रडूं कोसळलें. ती रडत रडत ह्मणाली—"कपाळ माझें! आतां त्या माझ्या भावाच्या पायीं आपल्या घरादाराचें वाटोळें झालें कीं हो! आतां आपलीं पोरें बाळें काय खाणार? सगळा कीं हो घात झाला! आतां आपल्याला कोण वांचविणार! तो मेला बेलिफ आला आहे आपले गुळाचे खडे घेऊन वाड्यांत नेऊन ठेवायला. आतां बुडालें माझें घर. पोरेंबाळें आणि आपण सारे ठार झालोंच!"

हें ऐकून त्या शेतकऱ्यासही पराकाष्ठेचें दुःख झालें. त्यानें मुलांकडे पाहिलें, तों त्याला तो पुढचा विचार मनांत येऊन, असह्य अशा वेदना होऊं लागल्या. त्या भरांत त्यानें लागलीच घरांतली तरवार बाहेर काढली आणि म्हणाला—"नाहीं! असें होणार नाहीं! मी पहिल्यानें मरतों! मग माझ्या मागें माझ्या मुलांचें काय होईल तें होवो!"

आणि असें बोलून त्यानें तरवार उपसून ती फिरविली! आणि एका क्षणांत आपल्या जिवाचा नाश करून त्या बेलिफालाही चांगलेंच प्रायश्चित्त देण्याची वेळ आणली! परंतु त्याच्या बायकोनें एकदम त्याचा हात धरून, रडत रडत कळवळून त्याची विनवणी केली कीं—"अहो! काय करतां हें? कांहीं तरी थोडा विचार करा! ही तरवार मारून घेऊन काय करणार? जीव देऊन मग या तुमच्या लेकरांचा तरी काय फायदा? तुमच्या पश्चात्

हीं पोरेंबाळें किती वेळ जगणार? मग यांचा सगळ्यांचा प्राण घेतल्याचें पातक तुम्हांलाच लागणार नाहीं काय? अहो! तुम्ही माझें ऐका, तरवार ठेवा! या तरवारीच्या पायीं आमचे हाल व आपत्ति कमी न होतां उलट दुप्पट मात्र होणार आहेत हें तरी ध्यानांत आणा! आतां काय रे करूं देवा!"

याप्रमाणें त्या शेतकऱ्याची बायको जेव्हां डोळे पाण्यानें भरून त्याजपुढें उभी राहून त्याची विनवणी करूं लागली, तेव्हां त्याचा तरवारीचा हात ढिला पडला, व तिच्या उपदेशाचा परिणाम त्याच्या मनावर कांहींसा झालेला दिसून आला. तेथेंच असलेलीं त्यांचीं मुलेंही, त्यांना जरी हा कसला गोंधळ आहे हें समजण्याइतकी पोक्त बुद्धि नव्हती, तरी आपले आईचें म्हणणें बाबांनीं ऐकावें म्हणून, रडत व हुंदके देत बापापुढें येऊन उभीं राहून, न बोलतां पण डोळ्यांतील आसवांनीं त्याला विनवूं लागलीं. हरी तेथेंच तें सर्व पाहात होता. त्यानें त्या गृहस्थाचा हात धरला, व कांहीं न बोलतां तसाच त्या हातावर आसवें गाळीत तो उभा राहिला. तेव्हां थोड्या वेळानें त्याचा तो पहिला आवेग कमी होऊन आपल्या आवडत्या मुलांचें पुढें काय होईल हा विचार त्याच्या मनांत आला, आणि हातची तरवार खालीं टाकून तो मटकन जमिनीवर बसला आणि खिन्न होऊन ह्मणाला:—
"देवा! काय रे तुझ्या मनांत आहे?"

हा सर्व प्रकार पाहून बाळाच्याही मनास कांहीं सुचेनासें झालें. तो कांहीं बोलला नाहीं. शेवटीं हळूच हातानें हरीस खूण करून त्यानें जवळ बोलाविलें; आणि तसेच मुकाट्यानें ते दोघे आपल्या रस्त्याला लागले. आणि थोड्याच वेळांत देवालयांतील बागेंत जेथें गुरुजी काम करीत होते तेथें आले. त्या दुःखदायक प्रसंगाचा त्यांच्या मनांवर इतका परिणाम झाला कीं, वाटेनें ते एक शब्दही बोलले नाहींत. गुरुजींपाशीं येतांच बाळानें, थोडा वेळ घरून जाऊन येण्याबद्दल त्यांजपाशीं परवानगी मागितली व त्यांचा रुकार मिळतांच तो लगेच आपल्या घराकडे निघाला.

# २७ संकटीं धाव घाली !

बाळ घरीं येतांच त्यास पाहून राधाबाईस आनंद वाटला; पण हा मध्येंच कां परत आला म्हणून तात्यासाहेब जरा बुचकळ्यांत पडले. तरी बाळ अगदीं आपल्याच विचारांत गुंग होता. त्यानें घरीं येतांच तात्यासाहेबांस प्रश्न केला—

" तात्या, माझी एक गोष्ट ऐकाल का? रागावणार नसाल तर सांगतों."

तात्यासाहेब:—नाहीं रागावणार. सांग काय सांगावयाचें तें.

बाळ:—तुम्ही पुष्कळ वेळां म्हणत असतां ना?—कीं आपल्याला कांहीं कमी नाहीं; आपल्याजवळ पुष्कळ पैसे आहेत; आणि मी जर शाहाणा झालों, तर ते सर्व पैसे तुम्ही मला देणार, माझ्या स्वाधीन करणार! तर मग आतां या वेळीं मला कांहीं पैसे द्याल का?

तात्यासाहेब:—हो, सर्व पैसे तुझेच आहेत; मला आतां काय करावयाचे आहेत? तूं सांभाळावयाला शाहाणा हो म्हणजे झालें. आतां सुद्धां तुला हवे तर मी पैसे देईन. किती पैसे तुला पाहिजेत?

बाळ:—पुष्कळ पाहिजेत.

तात्यासाहेब:—पुष्कळ म्हणजे किती? काय, एक रुपया पाहिजे?

बाळ:—त्याच्यापेक्षांही पुष्कळ अधिक पाहिजेत.

तात्यासाहेब:—अधिक म्हणजे किती? सांगशील तर खरा?

बाळ:—सांगूं खरेंच? मला शंभर रुपये पाहिजेत!

त्याबरोबर राधाबाई पुढें होऊन म्हणाल्या:—हेंच वाटतें तें गुरुजींचें शिक्षण! पाहिलेंत ना? पोर पूर्वीं होतें त्याच्या दसपट आचरट मात्र त्यांनीं करून ठेवलें झालें! गुरुजी कसले हे कपाळाचे!

बाळ:—नाहीं ग आई? गुरुजींना कां बोलतेस? गुरुजींना यांतलें

एक अक्षरसुद्धां माहीत नाहीं !

तात्यासाहेबः---पण बाळ, तुला पोराला इतके रुपये कशाला पाहिजेत ? काय करणार आहेस त्यांचें ?

बाळ:—तें मी तुम्हांला मग सांगणार आहें. पण तें तुम्हांला कळल्यावर, माझी खात्रीच आहे कीं, तुम्ही ती गोष्ट चांगलीच केली म्हणाल.

तात्यासाहेबः---पण तें आधीं मला कळल्याशिवाय उपयोग नाहीं.

बाळः—पण ते पैसे मीं जरी खर्च केले, तरी ते सर्व एका वर्षांत मी तुमचे परत फेडणार आहें !

तात्यासाहेबः---बा ! एवढी रक्कम एकदां खर्च केल्यावर तुला कशी परत फेडतां येईल ?

बाळः---सांगूं कशी तीं ? मी आतां उद्यांपासून सकाळीं शिरापुरी खाणार नाहीं; दुपारीं चहा घेणार नाहीं. रेशमी कोट व जाकीट घालावयाचें सोडून देईन; व जोडाही मला आतां नवा नको. मी ते पैसे फिटत तोंवर अनवाणी चालेन. मग वर्षांत माझे पैसे किती वांचतील पहा बरें !

तात्यासाहेबः---पण तुला आतांच एवढा संन्यास घ्यायला, तुला हे पैसे द्यावयाचे आहेत तरी कोणाला ?

बाळः---पण तें नाहीं सांगितलें तर नाहीं का चालणार ?

तात्यासाहेबः—आणि तें सांगितलें तर नाहीं का चालणार ?

बाळः—"मग सांगतोंच तर !" असें म्हणून बाळानें त्या शेतकऱ्यावर आलेला जप्तीचा प्रसंग, त्याच्या स्त्रीचा व मुलाबाळांचा आकांत वगैरे सर्व प्रकार त्यांस सांगितला. तो सर्व ऐकिल्यावर तात्यासाहेबांस थोडें नवल वाटलें व त्यांची दयाही आली. मग त्यांनीं आपल्या उदारपणामुळें व बहुतांशीं आपल्या लाडक्या मुलाच्या प्रेमामुळें, त्यास तेवढी रक्कम लागलीच काढून देण्यास आपल्या दिवाणजींस सांगितलें. नंतर मुलाला इतका सुस्वभाव जडत चालला हें पाहून त्यांना कांहींसा आनंदही वाटला. गोविंद-

शास्त्री यांच्याबद्दल लागलीच त्यांस उपकार वाटले. बाळाचें अर्थातच इतर गोष्टींकडे लक्ष नव्हतें. पैसे हातीं येतांच तो थेट गुरुजींकडे आला, व हरी तेथेंच असलेला पाहून त्याला म्हणाला—" हरी, चल आपण त्या शेतकऱ्याकडे जाऊं. तूं बरोबर येतोस का ? " मग हरीनें हो म्हणतांच ते दोघे मोठ्या त्वरेनें लागलीच त्या मळ्यांत येऊन पोंचले. तों मघांसारखीच स्थिति होती. सर्वजण दुश्चित होऊन बसले होते. बेलीफ व तो चंदूलालाचा कारकून तेथील गूळ व इतर कांहीं माल बाहेर काढून त्याची यादी करूं लागले होते; व ती शेतकरीण निराशेनें हुंदक्यांबर हुंदके देत एक कोपरा धरून पडली होती. आंत जातांच बाळ तत्काळ त्या बाईपाशीं गेला व म्हणाला—" बाई, तुम्ही रडूं नका. माझी एक गोष्ट ऐका ! "

बाई—बाबा रे, तुझी काय गोष्ट ऐकूं ? दैवानें माझ्यावर केवढा घाला घातला आहे तो तुला आहे ठाऊक बाळ ? "

बाळः–तो मला कळला आहे; व म्हणूनच मी तुमच्याकडे आलों आहें.

बाईः—मग बाळ तूं काय सांगणार आहेस ? तुला लहान मुलाला या प्रसंगीं काय करतां येणार आहे ?

बाळः—मला थोडें तरी करतां येईल, व तें मी करणार आहें. तुम्ही माझें एवढें ऐका ! "

बाईः—बाळ, आम्हांला या संकटांतून सोडवील असा या पृथ्वीवर तर कोणी दिसत नाहीं ! देव एक काय करील तें खरें !

बाळः—बाई, मी तुमचा आहें ना ? " माझ्याच मुलासारखे तुम्ही, म्हणून मीं तुम्हांला दूध दिलें. " असें परवां तुम्ही आम्हांला म्हणालां ना ?

बाईः—हो बाळ. पण तूं या वणव्यांतून आम्हांला कसा सोडविणार ?

बाळः—हे घ्या शंभर रुपये, व त्या बेलीफास नेऊन देऊन त्याची पावती मागा कशी ? उठा आतां. " असें म्हणून बाळानें त्या बाईचा हात कपाळावरून काढून घेऊन, बरोबर आणलेली रुपयांची थैली त्यावर ठेवून

दिली. ती थैली पाहतांच त्या बाईला जें आश्चर्य वाटलें व जो आनंद झाला तो वर्णन करणें अशक्य आहे. अत्यंत विस्मयानें चकित होऊन ती आपल्या त्या उपकारकर्त्या बालमूर्तीकडे क्षणभर पाहात राहिली. आणि थोड्याच वेळांत कृतज्ञतेमुळें हृदय दाटून येऊन कांहीं बोलावयास प्रवृत्त होतां होतांच आनंदाच्या अतिरेकानें मूर्च्छित होऊन मागच्यामागें पडली! ती पडल्याचा आवाज ऐकून बाहेरचे बाजूस असलेला तिचा नवरा एकदम धावून आंत आला; आणि घाबरून जाऊन, 'काय झालें? काय झालें?' म्हणत त्यानें तिला नीट उचलून बसविलें. पण ती उठून बसतांच समोरच उभा असलेल्या आपल्या उपकारकर्त्याच्या–बाळाच्या–पायाशीं डोकें टेकून रडत हुंदके देत 'तूं माझा देव आहेस!' 'तूं माझा देव आहेस!' असें खुशाल मोठ्यानें म्हणूं लागली! तें पाहून तिच्या नवऱ्यास वाटलें कीं, दुःखाच्या झटक्यानें हिला आतां भ्रम झाला! कारण आतांपर्यंत झालेला प्रकार त्यास ठाऊकच नव्हता. मुलेंही चोहोंकडून लागलीच धांवत आलीं; आणि कोणी खांद्याशीं, कोणी पाठीशीं, कोणी मांडीशीं बिलगून 'आई ग,' 'कां ग?' असें म्हणून घाबरून रडूं लागलीं! तेव्हां मुलांकडे पाहून ती चांगली स्मृतीवर येऊन त्यांना ह्मणाली—"अरे बाळांनो! या पुढें; आणि तुह्मांला वांचवायला ऐन वेळीं धावून आलेल्या या देवदूताच्या पायां-वर साष्टांग लोळण घाला! लेकरांनो, आपलें मरण या देवानें आज टाळलें बरें!"

तें तिचें बोलणें, डोळे भरून बारंबार बाळाकडे पाहणें, व 'देव' 'देवदूत' असे उद्गार काढणें हें सर्व पाहून तो तिचा नवरा अधिकच गोंध-ळांत पडला. तो तिला ह्मणाला—"अग, तूं हें काय म्हणत आहेस? शुद्धीवर आहेस का? सावध हो! वेड्यासारखी काय बरळतेस?"

शेतकरीण म्हणाली—"अहो! नाहीं, मी वेडी नाहीं. मी असें कांहीं बोलतें, पण तेवढ्यावरून मला वेड नाहीं हो लागलें! खरोखरच हा देव

आपल्या हांकेला धावून आला ! या बाळानें केवढे उपकार आज आपणां-बर केलेत ते पहा. आणि मग हा देव आहे का कोण आहे तें मला सांगा ! " आणि असें म्हणून तिनें ती रुपयांची थैली आपल्या नवऱ्याचे हातीं दिली. ती पाहतांच त्यालाहि तिच्याप्रमाणें मोठा विस्मय वाटला; आणि तो बाळाकडे पाहूं लागला. बाळ ह्मणाला—" बाबा, तुम्ही आतां कांहीं विचार करूं नका. ती रक्कम घ्या आणि आधीं आपलें देणें भागवा. मीं ते तुम्हांला अगदीं मोकळ्या मनानें, कांहीं अट वगैरे न घालतां, देऊन टाकले आहेत. तर आतां तुम्ही आपले व आपल्या मुलांचे अन्नपाण्याचे हाल होऊं देऊं नका ! "

आतांपर्यंत तो सर्व संकटप्रसंग गंभीरपणें सहन करून, वेदना आंतल्या आंत दाबून, स्वस्थपणें बसलेल्या त्या शेतकऱ्याचें अंतःकरण आतां कृतज्ञतेनें भरून आलें; आणि त्याची बायको व मुलें यांच्याप्रमाणेंच त्याच्याही डोळ्यांतून आनंदाश्रु घळघळ वाहूं लागले. लागलीच तोही बाळाच्या पायांवर नमस्कार घालण्याकरितां खालीं वांकला. पण बाळाला आतां तें नमस्कार घेणें व त्यांची स्तुति ऐकणें फारच अवघड वाटूं लागल्यामुळें तो चटकन बाजूला झाला; व हरीस खूण करून, मुकाट्यानें बाहेर पडला व आपल्या रस्त्याला लागला ! याप्रमाणें बाळानें आज मोठी खटपट करून एका गरिबाच्या कुटुंबाला मोठ्या संकटांतून सोडविलें; व शीलसंवर्धनाची एक पायरी तो चढला हें गोविंदशास्त्र्यांच्या व त्याबरोबर तात्यासाहेबांच्याही प्रत्यक्ष प्रत्ययास आलें !



# २८ आस्वलाची भेट

यानंतर आणखी एके वेळीं बाळ आणि हरी हे फिरावयास निघाले. ही वेळ दुपारीं ४ वाजण्याची होती. त्यामुळें आज गुरुजीही त्यांजबरोबर आले होते. आज ही मंडळी शहरांतून बोलत बोलत चाललीं. राजवाड्यापुढील मोठ्या पटांगणांत ते येतात, तोंच त्यांस आस्वलें घेऊन फिरणारे दोघे दरवेशी आस्वलांच्या मौजा दाखवीत फिरतांना दिसून आले. स्त्रिया व मुलें यांचा एक पुष्कळ मोठा घोळका त्यांच्यामागें चालला होता. दोन मोठ्या जाड काठ्यांच्या टोकांला सांखळीनें तीं जनावरें बांधून टाकिलीं असून त्या काठ्यांचीं दुसरीं टोकें दरवेशांनीं हातीं धरलीं होतीं; आणि त्या दोन्ही आस्वलांच्या पाठीवर दोन माकडें बसविलीं होतीं. तीं माकडें त्या गर्दीतील मुलांकडे पाहून वारंवार दांत विचकीत; ते करकरा खात; व नाना प्रकारचे चमत्कारिक अंगविक्षेप करीत. तें पाहून भोंवतालचीं मुलें व बाया खो खो खो खो करून हंसत. तें सर्व पाहून बाळाला फार मौज वाटली. त्यानें पूर्वी कधीं असा प्रकार पाहिला नव्हता. तीं आस्वलें त्या दरवेशानें हुकूम केल्याबरोबर मागील दोन पायांवर उभीं राहात व त्यानें आपल्या जवळचें वाद्य वाजविण्यास आरंभ करितांच त्याच्या तालसुराबर तीं फारच विचित्रपणें नाचावयास लागत! तें सर्व पाहून त्यास फार नवल वाटलें व तो गुरुजींस म्हणाला:—गुरुजी, हीं आस्वलें कशीं हो माणसाळतात? आणि माणसाळण्याच्या आधीं माणसाच्या अंगावर येत असतील, नाहीं!"

गुरुजी:—आस्वलें स्वभावतः कांहीं वाघाच्या किंवा सिंहाच्याइतकीं उग्र नाहींत. तरी त्यांना जर तसा वाव मिळाला, तर एकादा कठिण प्रसंग ओढवल्याशिवाय राहणार नाहीं. कारण अशा वेळीं कधीं तीं मुलां-

वर, बायकामाणसांवर किंबहुना चांगल्या मोठ्या माणसावरही धावून येतात, व त्यास फाडून खातात! हे प्राणी आपल्या इकडच्यापेक्षां थंड देशांत फार आढळतात; आणि जितकी थंडी अधिक, तितके हे अधिक उग्र व आकारानें अधिक मोठे व धिप्पाड असतात. अगदीं उत्तरेकडे, ज्याला उत्तरध्रुवाचा प्रदेश असें म्हणतात तेथें, आणि हिमालयावरही पांढऱ्या केसांचीं आस्वलें आढळतात; आणि त्यांचीं शरीरें आणि त्यांचा क्रूरपणा हीं तर फारच विलक्षण असतात.

याप्रमाणें गोविंदशास्त्री व त्यांचे दोघे विद्यार्थी बाजूला उभे राहून बों बोलत आहेत तों समोरील गर्दीतून लोक भराभर पळूं लागले; व त्यांच्या मागें त्या दोन आस्वलांपैकीं एक आस्वल त्या दरवेशाच्या हातून मोकळें सुटलेलें, धांवूं लागलें! मग त्या लोकांची दाणादाण काय विचारावी! लोक भयानें सैरावैरा पळूं लागले; व त्यायोगें तें आस्वल अधिकच बुजून, भेटेल त्याच्या अंगावर बेलाशक गुरगुरत चाल करून जाऊं लागलें! तो सर्व प्रकार पाहून बाळही घाबरून कोठें तरी जाण्याच्या विचारांत होता. इतक्यांत गोविंदशास्त्री म्हणाले—"हां! पळून जाऊं नका! नाहीं तर, यांच्यापुढें तुम्हांला काय जास्त पळतां येणार आहे! आपण येथेंच अगदीं निश्चल उभे राहूं या. आस्वल येथवर आलें तर मी पाहतों!"

इतकें ते बोलतात तोंच तें आस्वल तेथें आलेंच. तोंच तत्काळ गोविंदशास्त्री यांनीं मोठ्या धैर्यानें पुढें होऊन आपले हातांतला जाड सोटा त्याचे बाहुट्यावर जोरानें लगावला. त्याबरोबर तें आस्वल वांकलेंच! तरी तें पुनः क्रोधानें त्यांजवर चाल करूं लागलें. इतक्यांत मागून धांवत येऊन त्या दरवेशानें त्याच्या पाठींत एक बडगा मारिला व लागलीच त्याची सांखळी पकडली! आस्वल पकडल्याबरोबर सर्वांच्या जीवांत जीव आला व लोक धावतांना थांबले. तरी एवढ्या अवधींत कित्येक मुलें व बाया रस्त्यावर सपासप आपटल्या; कित्येकजण पायांखालीं चेंगरले; व

किल्येक जणांचीं भयानें बोबडी बळली ! या सर्व अनर्थाला कारण तो दरवेशी होता. त्यानें आपलें जनावर हयगयीनें हातचें सुटूं दिलें याबद्दल त्यास शासन पाहिजे होतें. आस्वलाला पकडतांच गोविंदशास्त्री त्या दरवेशास म्हणाले—" काय रे तूं मूर्ख आहेस ! तुला जनावर सांभाळतां येत नाहीं, तर तूं हे खेळ कशाला करतोस ? चल वाड्यांत; तुला आतां महाराजांकडून फटके बसवितों ! काय ही लोकांची दाणादाण झाली, तुला दिसत नाहीं ? "

गोविंदशास्त्र्यांची मुद्रा व ती बोलण्याची ढब पाहून तो दरवेशी फारच घाबरला व गयावया करून विनंति करूं लागला—" नाहीं महाराज, मी आतां असें नाहीं करणार. या वेळीं मला क्षमा करा. आपला चाकर आहें महाराज ! दया करा ! "

मग ही विनवणी ऐकल्यावर गोविंदशास्त्री यांनीं विशेष कांहीं न करतां, पुढें नीट सावधगिरीनें वाग असें त्यास पुनः बजावून, सोडून दिलें; आणि पुढें ते आपल्या वाटेस लागले. इतक्यांत बाळ म्हणाला—गुरुजी, तुम्ही एकदम त्या आस्वलाच्या पुढें कसे हो गेलांत ? तें मोकळें धावत असतां, तुम्ही काठी उगारून पुढें सरसावतांच मी भ्यालों ! मला तर वाटलें कीं आतां काय होतें कोण जाणे !

गुरुजी म्हणाले:—पुष्कळांना असेंच वाटतें कीं, जनावर मोकळें सुटलें तर आपण पुढें कसें जावें ? पण खरोखर त्याच्यामध्यें फारसें कठीण काम नसतें. सर्व जनावरांचा बहुतेक असा प्रकार असतो कीं, धैर्यानें आपण त्यांजवर चालून गेलों, कीं तीं भिऊन घाबरून जातात; आणि उलट आपण भ्यालोंसें दाखवितांच तीं जोर करून आपल्यावर चालून येतात.

हरी:—हो गुरुजी. कुत्र्यांच्यामध्यें मीं तर हा प्रकार पुष्कळदां पाहिला आहे. दोन कुत्रे एकमेकांना रस्त्यांत भेटले, व ते दोघेही चांगले रगदार असले तर ते मोठे बिचारानें, जपून एकमेकांपुढें जातात. आणि त्यांत

एकाद्यानें भीतीनें शेपूट जरा खालीं केलें कीं दुसरा गुरगुर करूं लागतो; व त्यानें जर पळच काढला, तर मग खूप आवेशानें हा त्याच्या मागें धावत जाऊन त्यास पकडूं लागतो. पण परत त्यानें जोर केला की याची गुरगुर मंद पडते !

गुरुजी—असा प्रकार कुत्र्यांच्यामध्येंच आढळतो असें नाहीं. सगळीं जनावरें माणसाला भितात. त्यामुळें जेव्हां कोणाला एकाद्या मोठ्या अरण्यां-तून जाण्याचा प्रसंग येतो, त्या वेळीं जर एकादें जनावर पुढें येतेंसें दिसलें, तर केवळ नुसती मोठी आरोळी ठोकली कीं काम होतें; आणि कांहीं त्रास न पडतां माणसाची सुटका होते. मी त्या अस्वलाच्या पुढें गेलों त्यांत तर भीति वाटण्याजोगें कांहींच नव्हतें. कारण तीं रानांतल्या जनावरासारखीं उग्र नसून माणसाळलेलीं होतीं. माणसाळतांना त्यांनीं पुष्कळ मार खाल्लेला असतो; व त्यांना खाण्यालाही फारच बेताबातानें मिळत असतें. तेव्हां मीं त्यावर काठी उगारली तर त्यानें भ्यावें, व कांहीं उग्रपणा न करितां मुका-ट्यानें थांबावें, असा माझा अर्थातच अंदाज होता. त्यामुळें मी त्याच्या वन्यासारखा आव आणून एकदम त्याजवर धावलों; त्याबरोबर तें भ्यालें आणि त्यामुळें त्या दरवेशाला तें चटकन पकडतां आलें. आतां पहा बरें, मी असा पुढें सरलों नसतों तर आणखी कित्येक पोरांची व बायांची कोण त्रेधा त्यानें उडविली असती !

याप्रमाणें बोलणें चाललें असतां ते सर्व घराकडे परत फिरले.



# २९ माकडांच्या गोष्टी.

दुसरे दिवशीं कालच्याच गोष्टी पुनः निघाल्या. कालच्या गर्दीत बाळानें एक पराक्रम करण्याचा प्रयत्न केला होता. गोविंदशास्त्री यांनीं आस्वलाला सोटा मारला असतां दरवेशानें येऊन तें आस्वल जेव्हां पकडलें, तेव्हां त्या आस्वलाच्या पाठीवरचें माकड मोकळें सुटून सांखळीसह पुढें उड्या घेत चाललें होतें. ती साखळी पाहून, ती आपण धरावी असें त्याच्या मनांत आलें. पण ती साखळी जशी जोरानें पकडावी तशी पकडतां न आल्यामुळें, माकडानें पुढें उडी घेतांच बाळाच्या हातास हिसडा बसला व तो रस्त्यावर पालथा पडला. तों त्यांच्या हातास व कोपरांस लागलें, व त्यांतून बरेंच रक्त निघालें. तरी ती गोष्ट त्यानें त्या वेळीं कोणास कळूं दिली नाहीं. दुसरे दिवशीं हरीनें तो प्रकार गुरुजींस सांगितला. तेव्हां गुरुजींनीं बाळास जवळ बोलावून त्याचा हात पाहिला. तेव्हां फारशी दुखापत झालेली नाहीं असें त्यांना दिसलें. पण ते म्हणाले—" बाळ, तुला लागलें तें मला तूं सांगितलें नाहींस ! असें कां रे ? "

बाळ—नाहीं गुरुजी; फारसें लागलेलें नव्हतें. मग त्यांत काय सांगावयाचें आहे ?

हें उत्तर एक प्रकारें गुरुजींस समाधानाचें वाटलें. कारण एकादा खडा लागला तर जो घरांत रडून ओरडून आकांत करावयाचा, तो इनामदारांचा लाडका बाळ आज रक्त आलें तरी त्यांत काय आहे असें म्हणण्याइका सहनशील बनला; ही प्रगति कांहीं थोडी नव्हती. असो, नंतर माकडांच्या गोष्टी निघाल्या. गुरुजी म्हणाले—माकडें हीं फारच विलक्षण असतात. त्यांचें तोंड व एकंदर शरीररचना बहुतेक आपणां माणसांप्रमाणेंच असते, हें तुमच्या लक्षांत आलेंच असेल. उष्ण हवेच्या देशांतच हीं राहतात.

अशा देशांतील अरण्यें या प्राण्यांनीं अगदीं भरून गेलेलीं आढळतात. त्यांच्या अंगीं पराकाष्ठेचा चपळपणा असतो. त्यांचे हात हुबेहुब माणसासारखेच असतात; हाताचीं व पायांचीं बोटें तर माणसांच्यापेक्षांही लांबट असतात. त्यामुळें झाडाच्या डाहाळ्या पकडून धरून, या झाडावरून त्या झाडावर त्यांना अगदीं सहज जातां येतें. दाट अरण्यांतून कित्येक मैलपर्यंत माकडें अशींच वरच्यावर, जमिनीवर न उतरतांच, जाऊं येऊं शकतात ! रानांतील सर्व प्रकारचीं फळें हीं खातात. आणि आपलें भक्ष्य मिळविण्यासाठीं नेहमीं या रानांतून त्या रानांत भटकत असतात. कधीं कधीं रानांतलीं फळें पुरेशीं न होऊन यांच्या स्वाऱ्या लोकांच्या पिकांवर व फळझाडांवर हल्ला करितात. अशा वेळीं त्यांचें चातुर्य फारच उत्कृष्ट दिसून येतें. त्यासंबंधानें पुष्कळ गोष्टी मीं ऐकिल्या आहेत.

बाळ मध्येंच ह्मणालाः– त्या गोष्टी आम्हांला सांगतां गुरुजी ?

गुरुजीः– पिकांत शिरतांना अगदीं माणसांच्यासारखी सावधगिरी तीं घेतात व मोठा व्यवस्थितपणा दाखवितात. त्यांची टोळी पिकांत किंवा एखाद्या बागेंत शिरली असतां, त्यांच्यांतलीं दोनचार माकडें बाहेर हेरासारखीं बसून राहतात; व कोणी माणूस बागेकडे येतांना दिसला कीं, असा एक खुणेचा किचकिच शब्द करतात, कीं तो आंतल्या सर्वांस कळून, तीं सर्व एका क्षणांत पटापट उड्या टाकून निसटून जातात !

हरी ह्मणालाः– हो, खरेंच गुरुजी. पिकांत शिरतांना मध्यें कोठें तरी एकादें उंच झाड अललेलें पाहून त्यांवर दोनतीन माकडें चढून बसतात; व तेथून कोण आपलेकडे येतें तें पहात राहतात. कोणी आलेंसें दिसलें कीं, ' किचकिच ' करून सर्वांना सावध करितात, कीं एका क्षणांत पळालीं सारीं ! एक माकड म्हणून मग शेतांत सांपडत नाहीं.

गुरुजीः- अरे, हें कांहींच नाहीं ! चोरीच्या कामांत तर हीं फारच हुषार असतात. एकादे वेळीं त्यांच्या राहावयाच्या रानापासून जर एकादी

बाग दूर अंतरावर असली तर त्यांची करामत पाहून घ्यावी. अशा वेळी त्या रानापासून बागेपर्यंत, अगदीं एका ओळींत, कांहीं थोड्या नियमित अंतरावर हीं बसून राहतात. नंतर बाकीची सर्व टोळी त्या बागेंत शिरून झाडावरचीं फळेंन फळें तोडून खालीं टाकतात. झाडाखालीं कांहीं जण उमे राहून तीं फळें झेलतात; आणि मग एकाजवळून दुसऱ्याजवळ, दुसऱ्याजवळून तिसऱ्याजवळ अशीं भराभर तीं फळें लांबवून सगळ्या बागेची झडती करून, सर्व फळें कोठल्याकोठें नाहींशीं करून टाकतात! एक-अर्ध्या घटकेंत भरलेली बाग ओस करून सोडतात! त्यामुळें पिकाळ्यांची नेहमीं मोठी धास्ती असते!

माकडें अगदीं लहान असतांना पकडलीं तर लौकर माणसाळतात. पण कांहीं तरी खोडी करण्यांत त्यांचा नंबर अगदीं पहिला! शिवाय नक्कल करण्यांत तीं फार प्रवीण. त्यांच्यासमोर जें जें कांहीं कोणी करील तसें तीं लागलींच करून दाखवितात. किती तरी मौजेच्या गोष्टी यासंबंधांत आ ऐकल्या आहेत. एका गृहस्थाच्या घरीं असेंच एक माकड पाळलेलें होतें. तें एका सोप्यांत बांधून ठेवलेलें असे. तो गृहस्थ हजामतीच्या वेळी नेहमीं त्या सोप्यांत बसत असे. तेथें दर आठ दिवसांनीं न्हावी येई व एका वाटींतलें पाणी घेऊन तें त्याच्या धन्याच्या डोकीस चोळीत बसे. तें त्या माकडानें पाहिलें होतें. यावरून एके दिवशीं त्याला वाटलें कीं, आपण हजामत करावी! मग तें मनांत येतांच त्यानें घरचें मांजर इकडून तिकडे जात असतांना पकडलें, व शाईनें भरलेली वाटीच्या आकाराची एक दौत जवळच एका कोनाड्यांत होती ती घेतली, व तेंच पाणी समजून त्याच्या तोंडाला चोळावयाला सुरवात केली! मांजराचें ओरडणें ऐकून घरांतील माणसें धावून आलीं; व माकडानें चालविलेला प्रकार सर्वजण मोठ्या आश्चर्यानें पाहात राहिले! तो न्हावी अगदीं जसा त्या गृहस्थाचे डोक्यावर पाणी चोळीत असे, तशाच तऱ्हेनें तें माकड ती शाई त्या

मांजराच्या डोक्यावर चोळतांना पाहून त्या सर्व लोकांस पराकाष्टेचें नवल वाटलें ! मांजर चुळबुळ चुळबुळ करूं लागलें कीं, तें त्याच्या तोंडांत लगावी; आणि अशा तऱ्हेनें त्यास बेडावी कीं, तें पाहून पाहणारे लोक खदाखदां हासूं लागत ! आणि तें मांजर जरा स्वस्थ झालें कीं, खसाखस त्याचें डोकें धरून त्यावर शाई· चोळी !

हरी आणि बाळ हें ऐकून हसूं लागले. गुरुजी पुढे म्हणाले:—

आतां आणखी एक गोष्ट आठवली ती सांगतों. ती तुम्हांला फारच आश्चर्याची वाटेल. येथल्या तोफखान्यावरच्या एका अधिकाऱ्यानें एक माकड पाळलें होतें. तें त्या तोफखान्यांत मोकळेंच फिरे. दसऱ्याला महाराजांची स्वारी बाहेर पडावयाचे वेळीं समारंभासाठीं म्हणून एकदां तोफा डागावयाच्या होत्या. पांच तोफा सकाळीं झाल्या व दुपारीं पांच व्हावयाच्या होत्या. म्हणून तोफांचे बार भरून सर्व तयारी करून ठेविली होती. सकाळीं तोफा डागतांना तो सर्व प्रकार त्या माकडानें जवळ राहून पाहिला होता. मग दुपारची तयारी करून लोक जसे इकडे तिकडे गेलेले त्यानें पाहिले, तेव्हां आपण तोफ उडवून पाहावी असें त्याच्या मनांत भरलें ! मग त्यानें एक पेटलेली काडी कोठून तरी शोधून आणली, आणि तोफा डागतेवेळीं ती जेथें लावलेली त्यानें पाहिली होती, त्या ठिकाणीं नेमकी ती लावून दिली ! आणि लगेच आतां तोफ कशी उडणार तें पहावें, म्हणून पुढच्या बाजूस तोफेच्या तोंडाशीं येऊन, तें तोंड पुढें करून पाहूं लागलें ! तोफ भरलेलीच होती. लागलीच पेटून भडका उडाला ! एकदम कसला आवाज झाला म्हणून लोक धांवून आले. पाहतात तों काय ! तोफ उडाली असून, त्या माकडाच्या शरीराचे तुकडे तुकडे होऊन गेले आहेत !

———



# ३० मनीचा अपराध.

बाळाला गोविंदशास्त्र्यांच्या शाळेंत ठेवून आतां पांच सहा महिने होत आले. एवढ्या अवधींत बाळाची सुधारणा बरीच झालेली दिसून येत होती. आतां त्याची प्रकृतिहि पूर्वींप्रमाणें अधू राहिली नव्हती व मनालाही बरेंच चांगलें वळण लागलें होतें सदोदित धुसफुसत राहणें व एवढ्या तेवढ्या गोष्टीवरून चिडून जाणें हे प्रकार आतां बहुतेक बंद झाले असून, थंडीवारा सोसण्याची शक्तिहि त्याची आतां वाढली होती.

आतां हिंवाळा संपला असून उन्हाळा सुरू झाला; व तो क्रमाक्रमानें आपलें उग्र स्वरूप प्रगट करूं लागला. जिकडे तिकडे प्रदेश रूक्ष दिसूं लागला. ओढे व ओघळी पाण्यानें भरून वाहावयाच्या, त्यांना आतां एक थेंब सुद्धां नव्हता. माळावरचें गवत वाळून जाऊन, सर्व रान कुसळांनीं भरून गेलें. वृक्षांची हिरवीगार पालवी आतां दरीखोऱ्यांत मात्र लपून बसल्यासारखी दिसत होती. सकाळचे आठ वाजल्यापासून रविराज जें उग्र स्वरूप धारण करीत, तें सायंकाळीं ५ वाजेपर्यंत. अशा वेळीं जनावरांना आणि पांखरांना अर्थातच चारा मिळणें फार कठीण होऊन गेलें. गोविंदशास्त्र्यांच्या देवालयांतलि बागेंत मात्र हा उन्हाळ्याचा रूक्षपणा अद्याप फारसा दिसूं लागला नव्हता. त्यांचे विद्यार्थी मोठे मेहनती असत व त्यांचें बागेवर फार प्रेम असे. त्यामुळें त्यांनीं अद्याप तरी बागेला पाणी पाजण्याच्या कामीं उणें होऊं दिलें नव्हतें. आतां जाई, जुई, मोगरा यांच्या फुलांचा बहर सुरू झाला; कांचन फुलांनीं लगटून जाऊन पांढरा शुभ्र दिसूं लागला; व सोनचाफ्यांच्या फुलांचा वास बागेंत सर्वत्र भरून राहूं लागला. गुलाबाचे ताटवे आपल्या रम्य पुष्पांनीं पाहणाराला आपलेजवळ बोलवूं लागले, व तुळशींचे ताटवे त्यांच्या हृदयांतील सात्त्विक भावना जागृत करूं लागले. शंकराच्या दगडी देवालयांत तर गारवा फारच उत्कृष्ट असून तो पूर्वींच्या एकांत-

वासी ईश्वरभक्त मुनिजनांच्या समाधिस्थानाची आठवण देत होता. गोविंद-शास्त्र्यांचे विद्यार्थी नित्यनेमानें देवदर्शनास येत, व मोठ्या सात्विक वृत्तीनें अंतःकरणपूर्वक वंदन करून जात; तें पाहून कोणाही प्रेक्षकाला त्यांच्याबद्दल सहजच फार कौतुक वाटावें.

असो. या दिवसांत एकदां सकाळच्या वेळीं बाळ देवदर्शन करून जों ओंवरीकडे वळतो, तों एक सुंदर पोपट त्याच्या बसावयाच्या जागीं हळू हळू इकडून तिकडे टुणटुण उडत चालला आहे असें त्यानें पाहिलें. तेव्हां त्यास त्याचें नवल वाटून तो परत देवालयांत गुरुजींकडे आला व म्हणाला,

" गुरुजी, तो पाहिलात का, ओंवरींत एक राघू कसा फिरत आहे तो ! मी त्याला धरूं का हो ! आम्हांला तो खेळावयाला होईल. "

गुरुजीः—वा ! आपल्या खेळण्यासाठीं तूं त्याला धरून ठेवावें तें काय म्हणून ? तूं आपल्या सुखासाठीं त्या बिचाऱ्याला पकडून ठेवणार; व रानामध्यें मोकळेपणें इकडून तिकडे भराऱ्या मारतांना त्याला जो आनंद मिळतो त्याच्या आड येणार ! हें चांगलें का ?

बाळः—मग गुरुजी, पुष्कळ लोक पोपटाला धरून घरीं पाळतात तें हो ?

गुरुजीः—एकादी गोष्ट पुष्कळ लोक करतात, एवढ्यावरून ती चांगली असते असें नाहीं. पुष्कळ वेळां असें होतें कीं, लोक चांगल्यावाईटाचा फारसा विचार न करतां पूर्वीं जें एकदां कांहीं कारणांमुळें प्रचारांत आलें, तेंच पुढें, त्याचें कारण उरलें नसलें तरी, तसेंच चालवीत राहतात. म्हणून म्हणतात—" गतानुगतिको लोकः " पण मुलांनीं अशांचें अनुकरण न करितां, सर्व गोष्टींचा आपल्या मनाशीं चांगला विचार करावा व मग काय करावयाचें तें ठरवावें.

बाळः—पण इतक्या लोकांना समजलें नाहीं तें आपल्याला आपल्याच बुद्धीनें समजेल असें कसें समजावें ?

गुरुजीः—हो, खास समजावे. लोकांना समजलें नाहीं, याचें कारण

त्यांनीं त्याचा विचार केला नाहीं हें होय. पण विचार केला तर सर्व समजलेंच पाहिजे. रामदासस्वामींचेंही एक वाक्य आहे:--

"विवेकामध्यें सांपडेना, ऐसें तों कांहींच असेना."

बाळः—पण मग गुरुजी, पोपटाला जर आपण धरून पाळलें नाहीं, तर त्याची सलगी तरी आपल्याला कशी करतां येईल ?

गुरुजीः—कां नाहीं करतां येणार ? कोणाच्याही उपयोगीं पडावें, कोणावरतीही प्रेम करावें; म्हणजे त्याची आपली सलगी होणारच.

बाळः—मग माझ्या मनांत त्या पोपटानें माझ्याशीं अगदीं सलगीनें वागावें असें फार आहे. मग मीं त्याच्या कसें उपयोगीं पडावें ?

गुरुजीः—तो पोपट सध्यां ओवरींत येऊन इकडून तिकडे कां भटकत आहे हें तुझ्या ध्यानांत आलें कां ?

बाळः—तेथें मुलांनीं डाळिंबाचीं फुलें काढून ठेविलीं आहेत व त्यांवर त्याची नजर आहे, असें मला वाटतें.

गुरुजीः--असेल. हल्लीं उन्हाळा सुरू आहे. त्यामुळें आतां बागांतून पेरू किंवा दुसरीं फळें पूर्वीप्रमाणें त्यांस मिळतनाशीं झालीं आहेत. म्हणून दररोज सकाळीं कांहीं पोपट आपल्या डाळिंबाच्या झाडांवर बसून त्यांतील मध खात असतात. आज तीं फुलें तुम्हीं आधींच काढून ठेवलींत त्यामुळें, तीं पाहून तो येथें खालीं उतरला आहे.

बाळः—मग मी तीं फुलें टोपलींतून काढून बाहेर पसरून ठेवूं का ?

गुरुजीः—पण प्रथम ही गोष्ट तूं लक्षांत ठेव कीं, तूं त्याच्या फारसा जवळ जातां कामा नये. कारण तसें केल्यास तूं त्याला पकडण्यासाठीं येत आहेस असें वाटून तो भुर्रदिशीं उडून जाईल. आणि त्याला पेरू किंवा डाळिंब हें जर तूं रोज आणून दिलेंस तर तो रोज नेमानें तेथें येत जाईल व मग तुझी त्याची सलगी होऊं लागेल.

इतकें बोलणें ऐकल्यावर बाळ परत ओवरीकडे गेला. तों तेथें

आणखी एकदोन पोपट फिरतांना आढळून आले. तें पाहून त्यास फार आनंद वाटला. पण त्यांस खाण्यास द्यावयाला त्याजपाशीं आतां कांहीं नव्हतें. मग त्यानें गुरुजींची परवानगी विचारून घरीं जाऊन त्या पोपटासाठीं थोडीशी भिजलेली दाळ आणली; व ती तेथें, आपणापासून दूर ठिकाणीं एका ताम्हनांत ठेवून दिली. मग थोड्याच वेळांत कांहीं पोपट तेथें येऊन ती दाळ थोडीथोडी खाऊं लागले. कारण आतां रानांत कांहीं फळें वगैरे मिळणें अशक्य झालें होतें. मग कधीं दाळ, कधीं पेरू, कधीं डाळिंब बाळानें घरून तेथें आणून ठेवावें, व त्यांनीं तें ओवरीच्या कांठावर बसून खावें असा प्रकार कांहीं दिवस चालला. तेथील खाणें संपल्यावर ते पोपट लगतच्या हादग्याच्या झाडांवर जाऊन बसत व त्याचीं फुलें, कळ्या, मध खातां खातां तोडून खालीं पाडीत; त्या वेळीं त्यांचा तेथें मोठा सुरेख किलकिलाट चाले; तसेंच ते या फांदीवरून त्या फांदीवर वारंवार उडूं लागले म्हणजे त्यांच्या पंखांची मोठी सुरेख शोभा दिसे. तो सर्व प्रकार पाहून बाळास रोज फार संतोष वाटे; व त्यायोगें त्याचें त्या पोपटांवर फार प्रेम बसलें. नित्याच्या सरावामुळें व त्या पोपटांनाही याजपासून दररोज कांहींना कांहीं खाण्यास मिळत असल्यामुळें, पूर्वींइतके ते त्याला पाहून आतां चटकन उडून न जातां, त्याच्या हातांतील फळाकडे पहात वारंवार जवळून जात येत. त्यामुळें बाळाला हा आतां एक मोठा करमणुकीचा विषय होऊन बसला.

असा प्रकार चालला असतां एके दिवशीं शास्त्रीबोवांच्या मनीनें बाळाचा मोठा अपराध केला ! आणि त्याबद्दल तिला आतां केवढें मोठें शासन करावें असें बाळाला होऊन गेलें ! कारण, एके दिवशीं ते पोपट बाळानें पसरून ठेवलेले दाळीचे दाणे वेचीत असतां तिनें अचानक त्यांवर छापा घालून त्यांतील एक पोपट पकडून, कोठच्या कोठें लांब पळवून नेला, व खाऊन फडशा करून टाकिला ! तेव्हां त्याला फारच दुःख झालें,

व मनीचा अतिशय राग आला! तो लागलीच गुरुजींकडे धावत आला; आणि मनीनें पोपट मारल्याचें मोठ्या रागानें त्यानें त्यांस सांगितलें! तें ऐकून गुरुजींनाही वाईट वाटलें. पण ते ह्मणाले—बाळ, मग आतां मनीस काय शासन करावें असें तुझ्या मनांत आहे?

बाळ– मला वाटतें, तिनें आपला पोपट मारला, तर तिला धरून, डोक्यांत एक धोंडा घालून ठार करावी! असलें दुष्ट मांजर हवें कशाला?

गुरुजी– म्हणजे तुझी अशी कल्पना आहे काय?–कीं मनीनें हा तुझा पोपट कांहीं आकस धरून मारला! तिचा त्याचा कांहीं द्वेष होता?

बाळ– तसें नाहीं; पण तिला अशी संवयच आहे कीं, पाखरूं सांपडलें कीं मारावें आणि खावें. प्राण्यांचें मांस खायची संवय; दुसरें काय?

गुरुजी– मग तर हें तुला कबूल झालें कीं, मनीला भूक लागली कीं, ती पांखराला मारते; द्वेषानें मारीत नाहीं. मग तिला तूं 'दुष्ट मांजर' असें कसें ह्मणतोस?

बाळ– पण आमचा पोपट तिनें मारला, हा दुष्टपणा नाहीं काय?

गुरुजी– नाहीं, हा दुष्टपणा नव्हे; हा भुकेचा व संवयीचा परिणाम आहे. मग तिची ही संवय घालवावी म्हणून तूं कधीं प्रयत्न केला आहेस का? आणि ही तिची संवय ठाऊक असूनही जर तूं असा प्रयत्न केला नाहींस, तर आतां मनीपेक्षां तुझाच मोठा अपराध झाला असें म्हणावयास नको काय? पोपटास मारल्यानें तुला इतकें दुःख होणार आहे, याची तिला काय कल्पना? मग ज्या प्रकाराची तिला कल्पना नाहीं, त्याबद्दल तूं धोंडा घेऊन तिच्या डोक्यांत घालणार, हें न्यायाचें आहे काय?

बाळ– पण गुरुजी, पांखरूं मारूं नये हें मनीला कोणाला तरी शिकवितां येईल काय? तें अशक्यच आहे!

गुरुजी– मला वाटतें पुष्कळ शक्य आहे. पण निदान आपण तसा प्रयत्न तरी करून पहावयास काय चिंता आहे?

बाळ– पण आपण जें या प्राण्यांना इतकें शिकविण्याचा प्रयत्न करावयाचा, त्यापेक्षां ते सर्व मारून टाकले तर काय वाबगें आहे ?

गुरुजी– म्हणजे मग कोणकोणाला मारावयाचें व कोणकोणाला जिवंत ठेवावयाचें तें तरी सांग पाहूं ?

बाळ– जे मांस खातात ते सर्व प्राणी मारून टाकावे !

गुरुजी– मग जिवंत ठेवायला बाकी शिल्लक कोण राहतील ? माणसें तरी सारीं जिवंत ठेवतां येतील काय ? एक पोपट, आणि एक तूं, आणि मी, आणि हा हरी, आणि दुसरीं अशींच कांहीं माणसें यांना तूं सोडून दे, पण या साऱ्या शहरांत मांस खात नाहींत असे किती लोक आहेत ? एक चतुर्थांशसुद्धां नाहींत. साऱ्या हिंदुस्थानांत असे मांस न खाणारे लोक एकंदर एक शंभरांशसुद्धां नाहींत. व सर्व पृथ्वीवरील लोकांशीं तुलना करतां हे मांस न खाणारे लोक म्हणजे खरोखर कांहींच नाहींत ! जनावरांत हत्ती, घोडा, गाय, बैल, म्हैस, मेंढी हे प्राणी तृणाहारी आहेत. पण बाकीचे सर्व मांस खाणारे आहेत. बलिष्ठानें निर्बलास मारावें हा प्रकार सर्व जगभर अव्याहत चालला आहे ! मुंग्या तुला मोठ्या गरीब दिसत असतील; पण एखाद्या जखमेवर जर त्या डसूं लागल्या तर साधा-रणश्या मोठ्या जनावरालाही चावून चावून ठार करतात ! झुरळें लहान लहान किडे खातात, त्यांना विंचू खातो, विंचवाला पाल खाते, पालीला मांजर मारतें, त्याला कुत्रें मारतें, त्याला वाघ फाडतो व वाघाला सिंह ठार करतो ! सारांश, हा असा क्रम या सर्व जगांत आब्रह्मस्तंबपर्यंत सारखा चालू आहे. मग तुझा नियम अमलांत आणावयाचा म्हटला तर सारीच सृष्टि लयास नेली पाहिजे ! कारण जरी कोणी स्वतः हिंसा करीत नसेल, तरी आसपासच्या लोकांच्या हिंसेचा दोष सहवासानें त्याच्यावर आल्या-वांचून रहात नाहीं ! ही हिंसा सर्वत्र कशी सरोस चालू आहे हें पाहावयाचें असेल तर चल बागेंत म्हणजे काय दिसतें तें आपण पाहूं.

असें म्हणून गुरुजी उठले व बागेंतील फुलझाडांमध्यें आले. तोंच एका चिमणीनें जमिनीवरून कांहींसें वेंचून आपले चोंचीत घेतलें. गुरुजी म्हणाले—" बाळ, पहा नीट; त्या चिमणीनें तोंडांत तें काय धरलें आहे ? "

बाळ—गुरुजी, ती एक आळी तिनें उचलून घेतली आहे. ती तिनें खाल्ली गुरुजी ! चिमणी म्हणजे मला वाटलें फार गरीब पांखरूं; पण तें सुद्धां असें किडे खातें अं ! अरेरे !

गुरुजी—पण बाळ, तुझी अशी कल्पना आहे का, कीं त्या किड्याला काय त्रास भोगावा लागला याचें ज्ञान त्या चिमणीस आहे ?

बाळ—नाहीं गुरुजी.

गुरुजी—मग यांत चिमणीचा दुष्टपणा आहे काय ? उपजतांच ही त्यांची वृत्ति, कीं किडे मारून खावे व आपला निर्वाह करावा. त्याप्रमाणें ते वागतात. गाई, बैल जसे गवत खातात, तसे हे प्राणी किडे खातात. मग गवत खाण्यांत गाईबैलांचा जो अपराध तोच चिमणीचा किडे खाण्यांत.

बाळ—आणि तोच मनीचा त्या पोपटास मारण्यांत, असेंच काय ?

गुरुजी—हो, निःसंशय असेंच. उंदीर, चिमणी, पोपट हें मांजरांचें ईश्वर-निर्मित भक्ष्यच आहे. मनी उंदरांस मारते, तेव्हां तुझा कितीसा गुन्हा करते? तितकाच अपराध या पोपटाच्या संबंधांतही तिचा आहे. तुला या पोपटाचें किती प्रेम वाटतें, याची कल्पना तिला कोठून असणार ?

बाळ—पण गुरुजी, आतां पुन्हाहि ही मनी आमच्या पोपटांवर नेम धरणार व त्यांस मारणार. आतां आम्हीं पोपट पाळावेत कशाला ? व आतां त्यांना पेरू व डाळ रोज घालावी तरी कशाला ?

गुरुजी—कां बरें ? तुम्हाला पोपटांचें प्रेम वाटत असलें तर तुम्हीं त्यांस डाळ व पेरू कां देऊं नयेत ? मनी त्यांस मारील, तर मनीचें निवारण तुम्हांस करतां येईल. तुला तसें करावयाचें आहे काय ?

बाळ—हो, आहे तर. पण या मनीनें पुनः असा पोपटाचा जीव घेऊं

नये असें कसें करतां येईल, तें मला समजत नाहीं !

गुरुजी—तें मी तुला सांगणार आहें. पण डोक्यांत धोंडा घालून मनीला ठार करण्याऐवजीं, तिची पोपटावर झांप टाकावयाची संवय घालविण्याचा प्रयत्न करणें अर्थातच विशेष शहाणपणाचें आहे. ही मनी आपले येथें अगदीं लहानपणापासून आहे. नेहमीं ती आपल्यामध्येंच हिंडते, खेळते; जेवावयाचे वेळीं रोज आपल्यापाशीं येऊन बसते, पण कशी शांत व गंभीर राहते, कीं एकादा नवखा पाहुणाच जेवावयास आला आहे ! तिच्या पुढें तुम्ही घांस ठेवीपर्यंत ती कशाला तरी तोंड लावते काय ? हें तुला ठाऊकच आहे. तूंही आतांपर्यंत तिला वारंवार जवळ घेत होतास, उचलीत होतास, गोंजारीत होतास, खाऊं घालीत होतास. तुला जवळ असलेला पाहून तीहि कशी प्रेमानें आंतल्या आंत ' गुरुगुरु गुरुगुरु ' करीत राहते तें तुझ्या ध्यानांत आहे ना ?

इतकें संभाषण झाल्यानंतर तो दिवस तसाच गेला. दुसरे दिवशीं सकाळीं नेहमींप्रमाणें पोपट झाडांवरून इकडून तिकडे फिरूं लागले. तेव्हां त्यांस पाहून बाळाला वाटलें कीं, जोंवर या मनीचा उपद्रव कमी करतां येत नाहीं, तोंवर या पोपटांचें संगोपन करून काय उपयोग ? पण आतां गुरुजी मनीला ही गोष्ट केव्हां शिकविणार व कशी शिकविणार ? असा तो विचार करीत आहे तोंच हरी घरून आपला पोपट व पिंजरा घेऊन आला. गुरुजीही लागलीच देवालयांतील काम आटोपून ओवरींत आले. नंतर गुरुजी म्हणाले—बाळ, मनीपासून आपला आवडता पोपट बांचवावयाला हा पिंजरा हा एक उपाय आहे, पाहिलास ?

बाळ आश्चर्य करून म्हणाला—गुरुजी, तुम्ही जो उपाय सांगणार होतां तो हाच का ? मग हा उपाय मला आधींच ठाऊक होता ! अहाहा !

गुरुजी:—पण हा उपाय जर तुला आधींच माहीत होता, तर तूं काय म्हणून मनीला ठार मारावयाचा विचार करीत होतास ? हरीनें आपला

पोपट सांभाळण्याला हाच उपाय अगदीं पहिले दिवसापासून केला आहे.

बाळ—पण गुरुजी, मनिला तुम्ही जें शिकविणार होतां तें केव्हां? मनीनें आपल्या पोपटावर हल्ला करूं नये असें करावयाचें आहे ना!

गुरुजी—तो प्रयोग आतां करावयाचा आहे. एकादा लोखंडाचा पत्रा किंवा आपले घरांतील तवा चांगला तापवून लाल करून प्रथम आणा पाहूं! मग आपण मनीला तिचा धडा शिकविण्यास सुरवात करूं.

असें गुरुजींनीं म्हणतांच हरीनें देवळाच्या एका अंगास पडलेला एक जाड पत्रा आणला, आणि देवालयांतील कांहीं पाचोळा वगैरे गोळा करून त्यांचा जाळ केला; व तो पत्रा गुरुजींनीं सांगितल्याप्रमाणें पुष्कळ तापविला. नंतर गुरुजींनीं तो पिंजरा ओंवरीत जोत्याचे कडेला, बाळ रोज जेथें पोपटांस दाळ वगैरे टाकीत असे, तेथें ठेविला; आणि त्याच्यापुढेंच तो तापलेला तवा ठेवून दिला. नंतर कालच्याप्रमाणें मनिला तेथें मोकळी ठेवून आपण सारेजण तेथून जरा दूर अंतरावर जाऊन बसले. त्याबरोबर मनीची कालची वृत्ति जागृत झाली. पिंजऱ्यांत जो हरीचा पोपट होता तो पकडण्यासाठीं त्या पिंजऱ्यावर झडप घालण्याचें तिनें मनांत आणिलें; आणि हळूच, बसत बसत, दबून, पुढें सरून, आपली उडी त्या पिंजऱ्यावर नेमकी जाईल अशा अंतरावरून त्याला पकडण्याकरितां तिनें उडी घेतली. त्याबरोबर तिची उडी पिंजऱ्यावरून मागें घसरून त्या तापून गेलेल्या लोखंडी पत्र्यावर पडली! त्याबरोबर तिचीं पावलें खूप भाजलीं, व ती तेथून परतून उडी घेईपर्यंत तर पुनः आणखी तिचे पाय भाजून निघाले! आणि याप्रमाणें पोपट पकडावयास जाण्याबद्दलचें भरपूर प्रायश्चित्त तिला मिळालें! ती म्याऊं म्याऊं करीत धडपडतच परत आली! पोपटाच्या वाटेस जाण्याच्या कामीं याप्रमाणें तिला चांगलें उत्कृष्ट शासन मिळालें. आणि तेवढ्याच एका प्रयोगानें पुनः ती त्या पिंजऱ्याकडे म्हणून कधींच वळेनाशी झाली. त्यानंतर कित्येक दिवस तो पिंजरा गुरुजींनीं तेथेंच ठेवून घेतला; व पोप-

ट्याच्या वाटेस न जाण्याचा धडा मनीकडून पुष्कळ घटवून घेतल्यावर मग तो हरीस परत घेऊन जाण्यास सांगितलें. त्या वेळीं ते म्हणाले–" बाळ ! याप्रमाणें प्रथमदर्शनीं अगदीं अशक्य दिसणाऱ्या. गोष्टीही मनुष्य युक्तीनें सिद्ध करून दाखवितो. याप्रमाणें मनुष्य आपल्या बुद्धिचातुर्याचा प्रभाव सर्वत्र दाखवितो, म्हणून तो सर्व पृथ्वीवर श्रेष्ठ म्हणून म्हटला जातो. यासाठीं, प्रत्येक गोष्ट पूर्ण विचारपूर्वक करीत जावी."

नंतर त्यांनीं ओवरींत एका जागीं याच अर्थाचें खालील संस्कृत वाक्य लिहून ठेवून त्याचा अर्थ मुलांस सांगून ठेविला—

सहसा विदधीत न क्रियां । अविवेकः परमापदां पदम् ॥

---

# ३१ मोगरीचा वेल !

उन्हाळ्याचा अंमल अद्याप कमी झाला नव्हता. जनावरांना चारा मिळण्याची वानवाच होती. एखादे ओलसर जागीं एखादी हरळीची मुळी टिकाव धरून राहिली होती तेवढी खाऊन रानांतील जनावरें आपला निर्वाह कसाबसा चालवीत जीव धरून होतीं. मृग लागावयास अद्याप महिना–पंधरा दिवस अवकाश होता. ससासारखें भीरु जनावर सुद्धां दिवसास लोकांच्या बागांत व मळ्यांत शिरून, सांपडेल त्या फुलझाडाचा व वेलाचा पाला चट्ट करून टाकतांना आढळूं लागलें. बाळानें देवालयांतील बागेंत स्वतः जो एक वाफा तयार केला होता, त्यांत चार मोगरीचे वेल लाविले होते; व आतां उन्हाळ्याच्या दिवसांत एकेका वेलावर ओंजळभर फुलें दररोज निघूं लागलीं होतीं. तो वाफा, ते मोगरीचे वेल, त्यांवर प्रातःकाळीं प्रफुल्लित होऊन सुरेख शोभणारीं तीं गेंदासारखीं मोठीं टपकेदार फुलें यांची बाळाला आतां फार मौज वाटूं लागली होती. तो दररोज

सकाळीं बागेंत येऊन त्यांतलीं पांच फुलें शंकरास वाहून प्रथम देवदर्शन करी; मग इतर उद्योगास लागे. पण आज बाळ बागेंत येऊन पाहातो तों वेलावर एकही फूल नाहीं! बहुतेक फुलांच्या पाकळ्या तेथेंच खालीं इतस्ततः विखरून पडल्या होत्या व वेलाचीं कित्येक पानेंही कुरतडून टाकलीं होतीं. ही अशी वेलांची खराबी कोणी केली असावी, म्हणून जरा जवळ जाऊन बाळ जों विचार करीत आहेत, तोंच त्याची चाहूल लागून तेथेंच वेलांत असलेला एक पांढरा शुभ्र ससा सुळकन बाहेर पडून दूर आपल्या बिळाकडे धांवत गेला. अर्थात् हा सर्व त्या सशाचा पराक्रम, असें त्याच्या लक्षांत आलें. त्याबरोबर त्यास त्या सशाचा अतिशय संताप आला. वेलांचा त्यानें केलेला तो खराबा पाहून त्यास इतकें दुःख झालें कीं, त्याचे डोळे पाण्यानें भरून आले! मग तसाच तो गुरुजीकडे धांवला. गुरुजी देवालयांतून बाहेर पडून ओवरीकडे चालले होते. त्यांस पाहतांच बाळ ह्मणाला—“ गुरुजी! या वेलांचें सशानें पहा काय केलें तें! माझा मोगरीचा वेल सगळा कुरतडून टाकला! मी त्याला रोज किती जपत होतों पण! आणि त्यानें आज असा अगदीं नास केला! आतां त्याला गोळी घालून ठार मारून टाकलें पाहिजे.”

गुरुजी:—“ पाहूं कोठें आहे तुझा वेल तो?” आणि असें म्हणून ते बाळाला घेऊन परत त्या वाफ्याजवळ गेले. मग सशानें केलेला वेलांचा मोड पाहून ते म्हणाले—बाळ, हें सशानें फार वाईट केलें. आतां या उन्हाळ्यांत तर हे वेल पुनः उजगण्यास येतील कीं नाहीं कोण जाणे. पण बाळ, आतां गोष्ट होऊन गेली. आतां यास उपाय करणे कसे शक्य आहे?

बाळः—आपण सारे ससे मारून टाकूं! म्हणजे ते पुनः आपल्या वेलाला कशाला तोंड लावतील?

गुरुजी:—पण परवां तूं म्हणत होतास कीं, त्या मांजराला ठार मारावें; कारण तें दुष्ट आहे, तें पांखरांना मारून खातें. आणि आतां ससे, जे

नुसत्या झाडपाल्यावर राहतात, कोणत्याच जीवाला अपाय करीत नाहींत, त्यांना ठार मारावें असें म्हणत आहेस !

हा गुरुजींचा प्रश्न ऐकल्याबरोबर बाळानें लाजून मान खालीं केली. आपण ही काय बेडगळ कल्पना काढली, असें त्यास वाटलें. पण तो लागलीच म्हणाला - गुरुजी, ते झाडपाल्यावर रहातात, तें चांगलें; पण त्यांनीं माझा मोगरीचा वेल कशासाठीं कुरतडावा ? त्यांस दुसरीं झाडें काय थोडीं होतीं ? म्हणून मला त्यांचा राग आला आहे !

गुरुजी:—पण तूं अशी कशी अपेक्षा करतोस ?—कीं त्या सशांना हें समजावें कीं, हा मोगरीचा वेल बाळाचा फार आवडता आहे, व हा नाहीं ! तूं त्या वेलांच्या भोंवतीं एक तट्ट्याचें कुंपण घालावयाचें होतेंस; म्हणजे सशांनीं तुझा वेल कुरतडला नसता. कारण, भुकेनें त्यांचे प्राण व्याकुळ झालेले असतात; त्यांना आतां मिळेल तेथून भक्ष्य मिळवून आपले प्राण वांचविले पाहिजेत ! उन्हाळा किती कडक आहे हें तूं पाहतोस ना ?

बाळ:—पण असला हा उन्हाळा येतो तरी कशाला ? मला वाटतें नेहमीं पावसाळा असावा; किंवा हिंवाळा तरी असावा !

गुरुजी: —कांहीं देशांमध्यें असा प्रकार असतो. उदाहरणार्थ इंग्लंड. तिकडे हिंवाळा अतिशय असतो, व नेहमी झिमझिम पाऊस पडत असतो. सूर्यदर्शन त्या लोकांना अगदीं क्वचित. पण त्यांना तें आवडत नाहीं. त्यांना वाटतें, ही झिमझिम थांबेल केव्हां, व सूर्यदर्शन होईल केव्हां ! जरा कोठें ऊन पडलेलें दिसले कीं त्यांना अगदीं दिवाळी वाटते !

बाळ:—मग तेथें पाऊस फार असतो तर ! पण मला वाटतें, आपल्याला असा देश राहायला असावा कीं, तेथें पाऊस फार नाहीं, थंडी फार नाहीं, व उन्हाळा फार नाहीं ! सारें अगदीं बेतशीर !

गुरुजी:—आतां असा देश या पृथ्वीच्या पाठीवर कोठें आहे, त्याचा तपास केला पाहिजे ! पण मग तो जरी सांपडला, तरी तो पृथ्वीएवढा मोठा

असणार नाहीं ! तो अर्थातच फार थोड्या लोकांना राहावयास पुरणार !

बाळः--छे ! तसें उपयोगी नाहीं. तो फार मोठा असावा. म्हणजे सर्वजण आपले देश सोडून तिकडे राहावयास जातील. व मग कोणाची कांहीं तक्रार राहणार नाहीं.

गुरुजीः---पण असेंही होणें शक्य नाहीं. हवापाणी उत्तम नसलें तरी तेवढ्या वरून लोक आपला देश सोडावयास तयार होतील असें नाहीं. संवयीच्या योगानें कोणत्याही तऱ्हेचें हवापाणी असलें तरी तें अंगवळणीं पडतें. त्यामुळें लोक आपली जन्मभूमि सहसा सोडीत नाहींत. संस्कृतांत एक म्हण आहे, ती लक्षांत ठेवण्याजोगी आहे.

जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ॥

हिमालय पर्वतावर सदोदित बर्फानें व्याप्त असलेला एक खूप मोठा प्रदेश आहे, पण तेथिल लोकांना जर कोणी खालीं गंगेच्या कांठीं राहावयास बोलावलें तर ते येण्यास कधीं तयार होत नाहींत. हें ऐकून तुम्हांस मोठा चमत्कार वाटेल. कारण, तथें खरें पाहिलें तर त्यांस खायलाही फारसें मिळत नाहीं. सर्वत्र नुसतें बर्फ पसरलेलें. तेव्हां थंडी म्हणजे मी म्हणत असते, हें सांगावयासच नको. आणि दुसऱ्याही कित्येक अडचणी त्यांस तेथें रोज सोसाव्या लागतात.

बाळः—पण मग असल्या थंड प्रदेशांत ते जगतात तरी कसे ?

गुरुजीः—त्याचें एक कारण आहे. पुष्कळ प्रकारच्या अडचणी, श्रम व अन्नाचा अपुरेपणा या गोष्टी, आपली कल्पना आहे इतक्या कांहीं जीवनास विघातक नाहींत. किंबहुना श्रीमंतींत व चैनींत दिवस घालविणाऱ्या लोकांपेक्षां अशा परिस्थितींत राहणारे लोकच अधिक काटक व अधिक निरोगी असतात. या संबंधांत एक गोष्ट मला माहित आहे. ती मीं आपले पुस्तकांत घेतली आहे. ऐक तुला हवी तर.

असें म्हणून त्यांनीं खालील गोष्ट आपल्या पुस्तकांतून वाचून दाखविली:-

# ३२ लाडकी जीभ !

पूर्वी एका मोठ्या शहरीं एक अतिशय श्रीमंत गृहस्थ रहात असे. परमेश्वरानें आपणास मनुष्याचा जन्म दिला आहे, यास्तव त्याची भक्ति करावी; अथवा परोपकारार्थ आपलें आयुष्य वेंचावें, निदान पैसा तरी वेंचावा; शीलवान व लौकिकवान व्हावें; अथवा हें सर्व राहो, पण निदान आपलें शरीर तरी धडधाकट ठेवावें, इ. ज्या मनुष्याला भूषणीय गोष्टी त्यांपैकीं एकीचीही चाड त्या गृहस्थास नव्हती. मग त्यानें सारा दिवस कशांत खर्च करावा ? अर्थातच दिवसभर बहुतेक तो, हें नाहीं तें, कांहीं तरी खात, गुराप्रमाणें सारखा चरत राही. त्यायोगें त्यानें आपली जीभ फार लाडकी करून ठेवली त्याला जे काय अतिशय चांगले विचार सुचत ते एवढेच कीं, आज जेवावयास काय करावें ? व काय केलें म्हणजे जेवण मोठें सुरखे लागेल ? त्याच्या प्रांतांत तूप व लोणी उत्तम प्रकारचें आहे, अशी ख्याति होती. पण तेवढ्यावर त्याची तृप्ति न होऊन, तो दूरदूरच्या शहरांतील व्यापाऱ्यांस लिहून तिकडून तुपाचे व लोण्याचे डबे मागवी ! तसेंच तिकडचे निरनिराळ्या प्रकारचे गहू मागवून घरीं भरून ठेवी. त्याच्या गांवांतील गव्हाच्या व तूपलोण्याच्या व्यापाऱ्यांस मोठा उद्योग हा होऊन राहिला होता कीं, कोणत्या ठिकाणच्या गव्हाचा शिरा अत्युत्तम गणतात ? व त्यास तूप कोठलें चांगलें ठरतें ?

त्यानें आपल्या घरीं एक कारभारी ठेविला होता. त्याचें काम असें कीं, दररोज जेवणास निरनिराळें कोणतें तरी नवें पक्वान्न त्यानें विचार करून ठरवावें. मधले वेळचे खाण्याचे पदार्थही त्याच्या सांगण्याप्रमाणें रोज तयार केले जात. सकाळीं जागे झाल्याबरोबर श्रीमंतांचें पहिलें काम म्हणजे चहा घेणें; आणि तो घेतल्याबरोबर स्वारी पलंगावरून उठून जवळच्याच दिवाणखान्यांत जाऊन एका तक्याला टेकून बसावयाची, आणि विडीचे

झुरके सुरू होतांच, घरच्या स्वयंपाक्याला हाक मारून सांगावयाची कीं, ' काय तयार केलें आहेस तें घेऊन ये ! ' त्याबरोबर एक नोकर एक मोठें ताट घेऊन दिवाणखान्यांत येई. त्यांत दहा वीस जिन्नस बाट्यांतून व बशांतून आणलेले असत. कडबोळीं, चकल्या, २।३ प्रकारच्या उसळी, थालीपिटें, शंकरपाळीं, चिवडा, भजीं, आणि दोनचार प्रकारच्या चटण्या, आंब्याचें लोणचें, लिंबाचें लोणचें, आणि मिरच्या इ. किती तरी प्रकारच्या कारभाऱ्याच्या सांगण्यावरून त्या आचाऱ्यानें तयार केलेले असत. ते सर्व तेथें हजर व्हावयाचे ! मग या स्वारीचा तो सकाळचा फराळ व्हावयाचा. मग जसे कांहीं गव्हर्नरसाहेब आपले राज्यकारभाराचे कागद वाचण्यांत व त्यांचीं उत्तरें लिहिण्यांत गढून गेलेले आहेत, अशा मोठ्या गंभीरपणानें हे श्रीमंत एकेक कडबोळ्याचा तुकडा घेऊन तो चटणीशीं किंवा लोणच्याशीं लावून तोंडांत टाकीत व अगदीं एकाग्र मनानें त्याची कशी काय रुचि लागते तें पहात; व मग खातां खातां त्या आचाऱ्यास मोठ्या काळजीपूर्वक व गंभीरपणानें बोध करीत कीं, " हें असें करूं नये ! तिखट जरा अधिक पाहिजे ! तळतांना त्यांत जरा तेल नीट मुरूं द्यावें; उतरावयाची घाई करूं नये. हं, हें लोणचें आतां जुनें झालें, आतां नव्या लिंबाचें लोणचें उद्यांच तयार कर. त्यांत मोहरी जरा चांगली घाल अं ? आणि काय रे, हीं शंकरपाळीं अशीं कां ? तूप चांगलें नाहीं ! तो काल आलेला डबा तूं फोडला नाहींस ! अशी हयगय असल्या महत्वाच्या कामांत काय रे करतोस ? आणि आज खोबऱ्याची चटणी यांत मुळींच नाहीं तीं ? गेल्या रविवारसारखी चटणी अद्याप तुला साधली नाहीं ना ? असें करूं नकोस ! जा. हें थालीपीठ निवून गेलें आहे, दुसरें ताजें घेऊन ये. तसेंच तें कालच आणविलेलें लोणी आण पाहूं ! "

अशा उपदेश त्यास रोज चालावयाचा. मग हें एक महत्वाचें काम आटपास गेलें कीं, स्वारी तेथून उठून दुसऱ्या एका कोचावर आडवी

व्हावयाची; आणि झालेले श्रम परिहार होण्याकरिता विड्यांचे झुरके घेत-बैत आतां दुपारच्या जेवणाकरितां भूक केव्हां लागणार म्हणून वाट पाहात बसावयाची ! मग त्या आनंदाच्या वेळीं श्रीमंत पाटावर जाऊन बसले म्हणजे त्यांना जे पदार्थ वाढण्यास येत, त्यांचीं नुसतीं नांवें सांगणेंच मुष्किलीचें आहे. मग तें वर्णन कोठचें करणार ? दोन वाट्या तुपाच्या, दोन लोण्याच्या; एक सुधारसाची, एक श्रीखंडाची, एक बदामाच्या खिरीची; ताटांत एका अंगास शिरा व साखरभात, एका अंगास चटण्या पांचचार; कोशिंबिरी पांचचार; आणि दुसरे किती तरी हजारों प्रकार ! इतकें सर्व वाढून झाल्यावर त्याजकडे एकाग्र दृष्टि लावून श्रीमंत जेवूं लागा-वयाचे ! मग त्यांच्या त्या वेळच्या अधाशीपणाचें काय वर्णन करावें ? खाणें बेताचेंच, पण चवचालपणा फार. मग प्रथम बहुतेक फडशा उडाव-याचा चटण्याकोशिंबिरींचा, भजीं व मिसळ यांचा, आणि थालीपिठाचा व लोण्याचा; आणि शेवटीं जेव्हां आतां पोटांत कांहीं अधिक भरणें शक्य नाहीं असें होई, तेव्हां नाइलाजानें स्वारी पानावरून उठावयाची !

अर्थात् अशा प्रकारें सारा दिवसभर खाण्याशिवाय दुसरा कांहीं उद्योग नसल्यामुळें थोड्याच दिवसांत श्रीमंत शरीरानें अत्यंत स्थूल बनले ! त्यांचें पोट एवढें मोठें झालें कीं, चालणें राहिलेंच, परंतु त्यांना उठावयाचेंसुद्धां अतिशय कठिण होऊन बसलें ! तोंड तर पुष्कळच फुगलें; आणि पाय खांबासारखे जाड झाले ! तरी त्यांत त्यांच्या शरीराचें ओझें तोलण्याची ताकद राहिली नाहीं. पुढें तर त्यांना हातपाय हालवणेंसुद्धां जड जाऊं लागलें; व त्याचें रूपांतर शेवटीं संधिवातांत झालें ! सर्व अवयव जखडून गेले; आणि थोडीशी हालचाल झाली कीं दम लागूं लागला. तथापि श्रीमंतांची अधाशीपणाची वृत्ति यत्किंचितहि कमी झाली नाहीं. तोंडाची रुचि यद्यपि कमी झाली, तथापि त्यांनीं नानाप्रकारचे रुचिकारक पदार्थ बनवावे; आणि जात नसले तरी, ‘ खाल्ले म्हणजे जरा बरें वाटेल. ’ अशा

खुळचट समजुतीनें, बळेंबळेंच खावे ! अर्थात् त्यायोगें मेदाचा अतिरेक होऊन, त्यांना बसल्या जागचें उठण्याचीसुद्धां मारामार पडूं लागली ! चाकरांनीं धरून उभें करावें; धरून पाटावर नेऊन बसवावें; किंबहुना जे दोन घास खावयाचे ते सुद्धां दुसऱ्यांनीं भरवावे व श्रीमंतांनीं खावे, अशी पाळी आली ! पाय दुखूं लागले, गुडघे दुखूं लागले, कमरेंत कळा मारूं लागल्या, मान वळेनाशी झाली आणि रोज नवी नवी तक्रार उत्पन्न होऊं लागली. आज नाहीं उद्यां बरें वाटेल, म्हणून त्यांनीं पुष्कळ वाट पाहिली. परंतु जसे दिवस चालले तशी त्यांची स्थिति अधिकच कठिण झाली. तेव्हां श्रीमंतांना एके दिवशीं असें वाटलें कीं, आपणास आतां कोणातरी वैद्याचा सल्ला घेतला पाहिजे. मग त्या शहरांत एक मोठा चाणाक्ष वैद्य होता, त्यास त्यांनीं बोलावणें पाठविलें. मग तो वैद्य येतांच ते म्हणाले:—

" वैद्यबोवा ! पहा हो माझी काय दशा झाली ती ! आतां यास कांहीं तरी उपाय करून मला लौकर बरा करा ! "

वैद्यबोवांनीं त्यांची प्रकृति सर्व नीटपणें तपासली. नंतर ते म्हणाले:—

" पंत, तुम्हांला तसा कांहीं रोग झालेला दिसत नाहीं. तुमच्या खाण्यापिण्यांत अनियमितपणा होत असावा असें मात्र वाटतें. "

श्रीमंत:—" अहो, कसला अनियमितपणा ? माझ्यापेक्षां अधिक बेतशीर जेवणारा माणूस तुम्हांला आढळणार नाहीं ! अगदीं नेमस्त जेवण करायची तर मला फार संवय ! "

" तर मग तुम्ही झोंप तरी पुष्कळ घेतां ? "

"अहो, झोंपेची गोष्ट तर विचारावयासच नको. मी बहुधा नऊ बाजेपर्यंत आपलें आंथरूण सोडीत नाहीं. पण सारी रात्र मी या कुशीवरून त्या कुशीवर तळमळत पडलेला असतों; डोळा म्हणून लागत नाहीं ! आणि जरा लागलासा वाटतांच, क्षणांत पुनः जागा होतों ! "

" हा प्रकार चांगला नाहीं. पण सारी रात्र तुम्ही डोळ्यास डोळा न

लागतां घालवितां, तर तुमचें शरीर अगदीं वाळून कसें गेलें नाहीं ? "

" अहो, कसें नाहीं काय ? त्यासाठीं मी दिवसास दुपारीं १२ वाजल्या-पासून ५ वाजेपर्यंत कांहीं तरी खटपट करून घटकाभर कशीबशी झोंप घेतों. तेवढीही झोंप मीं घेतली नसती तर आतांपर्यंत जगलों नसतों ! "

" पण मला वाटतें, तुम्हांला फारसा व्यायाम घडत नसेल. दररोज कांहीं काम करीत नसाल. पायीं चार पावलें फिरावयास तरी जातां का ? निदान भोजनोत्तर शतपावली तरी ? "

" अहो, एवढें इकडचें तिकडें झालेलें सोसत नाहीं; लागलीच दम लागतो; जिवाची सारखी घालमील होऊं लागते; आणि सगळ्या अंगांत अशा चमक्या मारूं लागतात कीं, वाटतें सारें अंग तुटून निघून त्याचे तुकडे तुकडे होत आहेत ! आणि शतपावली कशाची कपाळाची ! पूर्वीं प्रकृति चांगली असतांना मात्र मी आठवड्यांतून एकवार तरी गाडींतून फि-रावयास जाण्यास कधीं चुकत नसे. "

" मग यावरून मला वाटतें तुमची प्रकृति पुष्कळच बिघडली आहे; पण अद्याप ती सुधारण्याची आशा आहे. जर तुह्मी दिवसाची झोंप बंद कराल व थोडा आहार कमी कराल, तर तुम्हांला बरें वाटूं लागेल. "

" वा ! मग फारच छान वैद्यबुवा ! हा तुमचा उपाय मी करूं लागलों तर मग मला फार दिवस जगावयासच नको ! अहो ! माझी प्रकृति किती नाजूक झाली आहे ! तुम्हांला तें फारसें कळलें नाहीं असें दिसतें. अहो, दररोज सकाळीं मी जेव्हां निजून उठतों, तेव्हां माझ्या पोटांत गुरगुरत असतें, तोंडाला मळमळ सारखी सुरू होते, डोकें दुखत असतें आणि त्यामुळें मी इतका खचून जातों कीं, घटकाभरानें माझा प्राण जाणार असें मला वाटूं लागतें ! मग जेव्हां एक वाटी बदामपाकाची, एकादी कोहाळेपाकाची व एक वाटीभर बासुंदी कशीबशी बळेंच मी पोटांत ढकलतों, तेव्हां कुठें दुपारपर्यंत माझ्या जिवांत जीव येतो ! तेव्हां

वैद्यबुवा, तुम्ही फार चाणाक्ष आणि अनुभवशीर आहांत; मला घ्यायला अवघड असें एकादें औषध तुम्ही सांगणार नाहीं हें तर मी जाणूनच आहें. पण माझ्या खाण्यापिण्यांत जर कांहीं फरक करावयास सांगाल, तर तें मात्र अशक्य आहे! तेवढें मी कसें बसें खातों म्हणून वांचलों आहें! नाहींतर केव्हांच पार झालों असतों."

"तुमच्या म्हणण्याचा असा अर्थ दिसतो कीं, आपण बरें तर व्हावें; पण त्यासाठीं आपणांस यत्किंचितही तकलीफ पडतां कमा नये. आणि खाण्यापिण्यांतील गैरशिस्तपणानें प्रकृति कितीही बिघडली असली, तरी ती वैद्यबोवांच्या गोळ्या सुरू केल्या कीं, अगदीं निस्तोष व्हावीच! तर मग मी तुम्हांस उगीच आशा लावून फसवूं कशाला? तुम्हांला औषध देऊन बरें करण्यास मी तर समर्थ नाहीं. तुमची प्रकृति औषधाच्या आटोक्यांतील नाहीं; तुम्ही स्वतःच जर थोडे आत्मसंयमनाचे श्रम घ्याल, तरच ती सुधारण्याची आशा आहे, असें माझें तर स्पष्ट मत आहे."

"काय निर्दयपणा हा! अहो, भर तारुण्यांतच मला असें निराश करतां वैद्यबुवा! तुम्हांला कांहीं करुणा येत नाहीं?"

"अहो, मला जेवढें कळलें, तेवढें मीं सर्व तुम्हांला आतांच सांगितलें आहे. तथापि तुम्हांला आणखीही एक मार्ग सांगतों. माझे बंधु येथें वैद्य आहेत. तेही चांगले अध्ययन केलेले असून फार सरळ अंतःकरणाचे व कळकळीचे आहेत. तुमच्यासारखे रोगी बरे करण्यांत त्यांची विशेष कीर्ति आहे. ते येथून जवळच हरीश्वराच्या टेकडीपाशीं राहतात. त्यांचा सल्ला घ्यावयाचें जर तुम्हांस पसंत असेल तर मीं तुम्हांस एक पत्र देतों. त्यांजकडे तुम्ही जा. त्यांचा परिपाठ असा आहे कीं, आपण स्वतः कोणाच्याकडे भेटावयास जावयाचें नाहीं; मग तो रंक असो कीं राव असो."

यानंतर श्रीमंतांनीं वैद्यास कांहीं उत्तर केलें नाहीं. त्या दुसऱ्या वैद्याच्याकडे जाणें म्हणजे एक मोठा प्रवास करणें आहे, असें वाटून त्यांनीं तें

रहित केलें आणि वैद्यबोवांस निरोप देऊन स्वारी दिवाणखान्यांत येऊन आपल्या पलंगावर पडली. आतां आपली प्रकृति कशी सुधारणार म्हणून त्यांना बरीच काळजी वाटूं लागली. त्यामुळें त्या दुसऱ्या वैद्याचा विचार त्यांच्या मनांत पुनः घोळूं लागला. मग शेवटीं त्यास भेटावयास जावयाचें त्यांनीं ठरविलें. मग वाटेंत कोणत्याही प्रकारची गैरसोय होऊं नये, म्हणून त्यानीं कडेकोट तयारी केली. एक मेणा बोलाविला; आणि वाटेंत फराळास व जेवणास जें जें कांहीं लागणार होतें तें सर्व सामान भरून, एक दोन माणसें बरोबर चालविलीं. दोघे हुषार आचारी बरोबर घेतले. कारण वाटेंत खाण्यापिण्याच्या प्रकारांत अगदीं उणें म्हणून भासूंच नये! शिवाय दोन कोसांच्या प्रवासाला सबंध दिवस खर्चावयाचें त्यांनीं ठरविलें. मेणा वाहून नेणाऱ्या लोकांनाही ताकीद देऊन ठेवली कीं, "अतिशय सावकाश चाला! तें असें कीं, आंत बसणाराच्या पोटचें पाणी हालूं नये!" अशा प्रकारें उत्तम तयारी करून श्रीमंतांची स्वारी एकदाची निघाली व त्या आपल्या मोठ्या संरजामानिशीं या नव्या वैद्याच्या दरवाजापाशीं येऊन पोंचली. मग मेणा उभा करून या गृहस्थांना त्यांच्या चाकरमाणसांनीं उचलून आंत नेलें. तों ते वैद्यबोवा समोरच ओटीवर बसले होते. आजूबाजूला बऱ्याच रोगी लोकांची गर्दी होती. श्रीमंतांस ओसरीवर आणून ठेविलें, त्या वेळीं वैद्यबोवा रोग्यांना पथ्य सांगून निरोप देत होते. ते एका गृहस्थास म्हणाले:—"तुमच्या तोंडावर पांढरेपणा सध्यां फार आलेला आहे; तुम्हीं रोज तूप जरा अधिक खाल्लें पाहिजे." दुसऱ्या एकास म्हणाले—"तुम्हांला डाळिंबाचा अवलेह घेतला पाहिजे. त्याशिवाय तुमचा खोकला बसणार नाहीं. खडीसाखरेचा पाकहि तुम्ही तयार करून ठेवा." तिसऱ्यास म्हणाले:—"तुमचा रोग बरा होण्यास फार दिवस नकोत. तुम्ही रोज सकाळीं अनशेपोटींच चार चार पेढे खात जा." चौथ्यास म्हणाले—"बाबा, तुझ्या पोराचा ताप जर घालवावयाचा असेल, तर चार दिवस

त्यास रानांत पाठवूं नको. त्याला चांगली विश्रांति मिळूं दे. आणि या गोळ्या गाईच्या पावशेर ताज्या दुधांतून त्यास दे. जेवावयाला सध्यां त्यास तूप आणि भात दे; भाकरी देऊं नको." पांचव्यास म्हणाले:--"बाबा रे, तुला जागरण टाळलें पाहिजे. झोंप भरपूर तूं घेत जा. आठ वाजतांच आंथरुणावर पडत जा. झोंप न लागली तरी डोळे झांकून पड. तर तुझी ही डोळेदुखी ४ दिवसांत संपेल." इत्यादि.

याप्रमाणें तो पथ्याचा प्रकार पाहून श्रीमंतांस फार आनंद वाटला. ते मनाशीं म्हणाले:—"शेवटीं मला चांगला वैद्य मिळाला यांत शंका नाहीं. हा गृहस्थ कांहीं मला आतां अन्न कमी करावयास सांगणार नाहीं. त्या लबाड वैद्यानें मला बरें करावयाच्या निमित्तानें उपाशींच मारावयाचा बेत केला होता! पण त्याच्या तावडींतून मी लौकर सुटलों, हें माझें नशीब!"

लौकरच ते सर्व रोगी औषधें घेऊन व वैद्यबोवांच्या पायांवर डोकीं ठेवून आपापल्या घरीं गेले. नंतर वैद्यबोवा श्रीमंतांजवळ येऊन म्हणाले— "काल मी गांवांत गेलों असतां मला माझे बंधु भेटले; व त्यांनीं आपली सर्व हकीगत मला सांगितली. तुमचा रोग अवघड खराच, पण पूर्ण निराशा वाटण्याचें कांहीं कारण नाहीं. तुम्हांला पसंत असेल तर मी उपाय करतों. पण त्यासाठीं तुम्हीं निदान एक महिना तरी माझ्यायेथेंच राहिलें पाहिजे व तुमच्या बरोबरच्या सर्व मंडळींना तुम्हीं गांवीं लावून दिलें पाहिजे. हें पसंत नसेल तर मात्र मी तुम्हांला हातीं घेणार नाहीं."

श्रीमंत म्हणाले:—कांहीं चिंता नाहीं. आतांपर्यंत मी आपणांस रोग्यांशीं बोलतांना जें पाहिलें आहे, त्यावरून आपल्या मनाच्या ममताळू-पणाबद्दल माझी बरीच खात्री झाली आहे; करितां तुमची अट मी मान्य करतों. बाकी दुसऱ्या कोणा वैद्यानें असें म्हटलें असतें, तर मात्र मी कधींही हो म्हटलें नसतें!

वैद्यबोवा:—जसें तुम्हांस रुचेल तसें करा. मला उपाय करायला सांगा

तर मी तयार आहें. पण सर्व-साधारण लोकांप्रमाणें पैसे मिळवणें हें माझें ध्येय नसल्यामुळें, एकादा रोगी बरा होण्याबद्दल मला चांगली खात्री वाटल्याशिवाय मी त्याला कधीं हातीं घेत नाहीं. कारण हातीं घेतल्यावर तो बरा न होईल तर त्यांत आम्हांला कमीपणा आहे. आणि जर एकादा रोगी आमच्या कल्पनेप्रमाणें आपणास उपचार करून घेण्यास तयार नसेल, तर त्यांत यश मिळेल अशी आशा तरी आम्हीं कशी धरावी ?

श्रीमंतः—हो, हें तुमचें म्हणणें अगदीं बरोबर आहे. तुमचें इतकें मोकळया मनाचें भाषण ऐकून व तुमची ही कळकळीची वागणूक पाहून मला फार समाधान वाटतें. माझा तुमच्यावर पूर्ण विश्वास आहे, हें तुम्हांस मी आतांच प्रत्यक्ष दाखवितों म्हणजे झालें ना !"

असें म्हणून त्यांनीं आपल्या नोकरांस जवळ बोलाविलें आणि सांगितलें कीं, "तुम्ही सारेजण आतां घरीं जा. आतां एक महिनाभर येऊं नका. मी येथें या वैद्यबोवांच्याच घरीं राहतों. ते माझी सर्व व्यवस्था करणार आहेत. बरोबर आणलेलें सामान येथें यांच्या माणसांच्या हवालीं करा."

मग असें सांगतांच ती सर्व मंडळी परत निघून गेली आणि श्रीमंत एकटेच वैद्यबोवांच्या घरीं राहिले.

---

## ३३ नवीन औषधी शोध !

वरीलप्रमाणें सर्व माणसें परत घरीं रवाना झाल्यानंतर वैद्यबोवांनीं श्रीमंतांस विचारलें—" पंत ! इतका लांबचा प्रवास तुम्हीं कसा केलात ? तुम्हांला फार त्रास झाला असेल नाहीं ? "

श्रीमंतः—नाहीं फारसा झाला. आतां एवढेंच कीं, मला भूक विशेष लागली आहे. तेव्हां आतां जेवण जरा उत्तम, आणि जरा लौकर तयार होईल असें करा म्हणजे झालें. कारण, वाटेंत फक्त हीच गैरसोय झाली.

वैद्य--हो हो; अगदीं लौकर सर्व तयारी करितों. घटकाभरानें पानें मांडून तयार राहतील. आतां तोंवर मी जरा या दुसऱ्या रोग्यांच्या प्रकृति पाहण्यास जातों.

असें म्हणून आंगरखा-पागोटें घालून वैद्यबोवा बाहेर पडले. श्रीमंतांना वाटलें कीं, आतां काय सुरेख जेवण आपल्यास मिळणार ! ते आपल्याशीं म्हणाले:--जर हे वैद्यबोवा अगदीं साधारण लोकांनाही तूप, दूध, साखर व डाळिंबपाक आग्रहपूर्वक खायला सांगतात, तर मजसारख्या श्रीमंताची जेवण्याची तयारी करण्यांत तर ते अगदीं कसूर करणार नाहींत, हें उघड आहे. इकडच्या भागांतील वांग्यांची फार प्रसिद्धि आहे. आणि यांच्या घरीं आचारीसुद्धां अगदीं उत्तम असेल यांत शंका नाहीं. तेव्हां मी आपलीं माणसें परत पाठवून दिलीं ही मोठी चूक केली असें म्हणण्याचें मला कांहीं कारण दिसत नाहीं.

अशा प्रकारच्या कल्पनांनीं श्रीमंत बराच वेळ मनांत मांडे खात होते. पण त्यांची भूक आतां अधिकअधिक वाढत चालली. वेळ बराच झाला, पण कोणीच जेवणाची गोष्ट काढीना. मग त्यांस दम धरवेना. तेव्हां त्यांनीं घरांतील एका नोकरास हाक मारून विचारलें--" काय रे, कांहीं तयारी झाली कीं नाहीं ? अवकाश असला तर थोडी बासुंदी पुरी आणि एकादी उत्कृष्ट चटणी मला एका ताटलींतून फराळाला इकडे आणून दे, मग जेवण थोडें उशीरां झालें तरी हरकत नाहीं. "

तो नोकर म्हणाला--रावसाहेब, अगदीं तसें केलें असतें, पण आम्हांला तसा हुकूम नाहीं ! वैद्यबोवा स्वभावानें फार चांगले आहेत खरे, पण आम्हां चाकर माणसांशीं ते फार कठोर आहेत. आम्ही परभारें आपणांस कांहीं खावयास दिलें तर तें त्यांस बिलकूल खपणार नाहीं ! तथापि आपणांस आत फार वेळ बसावें लागणार नाहीं; अकराला पानें बसतील.

अर्थात् या उत्तरानें निरुपाय होऊन, आणखी दोन तास कंठणें त्यांस भाग

झालें ! ही दोन तासांची उपासमार म्हणजे त्यांस मोठी तपश्चर्या वाटली ! कारण गेल्या २० वर्षांत त्यांनीं ती कधीं अनुभविली नव्हती ! आतां वेळ कांहीं केल्या लौकर सरेना, त्यामुळें श्रीमंत सारखे कुरकुरत व धुसफुसत राहिले. क्षणक्षणा उठून ऊन कोठवर आलें म्हणून पाहूं लागले. ' किती वाजले रे ?' असें वारंवार लोकांस विचारूं लागले ! असें होतां होतां वैद्य-बोवा एकदांचे बाहेरून आले. मग लागलींच पानें मांडण्यांत आलीं. पण बराच वेळ झाला तरी श्रीमंतांस कोणी उठा ह्मणेना. तेव्हां अगदीं जिव कासावीस होऊन मोठ्या कष्टानें ते एकदाचे उठले व आंत डोकावून पाहूं लागले. तोंच वैद्यबोवांनीं या म्हणून त्यांस आंत बोलाविलें; व देवघरांत एक पाट मांडून त्यावर बसावयास सांगितलें. लगेच एक माणूस ताट वाढून घेऊन आला ! श्रीमंतांना तर आतां अगदीं काय वाटूं लागलें होतें ! आतां बदामपाक, नि तूप, नि श्रीखंड, नि अमुक-तमुक, म्हणून त्यांच्या तोंडांस अगदीं पाणी सुटलें ! पण पुढें ताटांत काय होतें ? दोन संत्रीं, दोन केळीं, एक पेरू, एक डाळिंब व दोन भाजलेलीं रताळीं ! तीं पाह-तांच तो गृहस्थ कावराबावरा झाला व रागावून वैद्यबोवांकडे पाहूं लागला ! तोंच वैद्यबुवा ह्मणाले:—" रागावूं नका ! माझें ह्मणणें नीट ऐकून घ्या. तुह्मांला द्यावयाचें औषध या फळांमध्यें मीं घालून ठेविलें आहे. तें तुह्मांला खातांना कळणार नाहीं; पण फळांबरोबर तें पोटांत जाईल. तें फार गुण-कारी आहे. तेव्हां तें आधीं घ्या; नंतर लौकरच तुमची जेवणाची उत्तम व्यवस्था मी करणार आहें. "

श्रीमंत म्हणाले:—कपाळ माझें ! अहो, सकाळपासून मला हो हो म्हणून, तुम्हीं माझी असली जेवणाची सोय केलीत काय ? आणि सकाळीं केवढी प्रस्तावना व केवढा मोठा उपोद्घात केलात तरी ! अहो, मजसा-रखा श्रीमंत माणूस असलीं भाजलेलीं रताळीं खाऊन राहत असतो तशी का तुमची समजूत आहे ?

वैद्यबुवाः—अहो, असे रागावूं नका; जरा थांबा ! हा नवीन औषधी शोध आहे ! तुमच्याबद्दल मीं किती काळजी घेत आहें तें तुमच्या ध्यानांत आलें नाहीं ! अहो, कालच्या प्रवासानें तुम्हांस फार थकवा आलेला आहे, अशा वेळीं यांतून मीं हें औषध तुम्हांस न दिलें तर लागलीच तुम्हांस ताप भरेल आणि डोकें दुखूं लागेल. म्हणून मला अशी व्यवस्था करणें भाग पडलें. आतां पुढें पहा तुम्हांस तुमच्या श्रीमंतीप्रमाणें उत्तम जेवण मी तयार करावयास सांगतों कीं नाहीं तें ? हा नवीन औषधी शोध आहे !

हें भाषण श्रीमंतांना फारसें पटलें असें नाहीं. पण आतां करणार काय ? हवें तें मागून घेण्याला त्यांचीं हुकुमाचीं माणसें आतां येथें कोणीच नव्हतीं. शिवाय 'नवीन औषधी शोध' हे शब्द ऐकून ते जरा दबले ! मग जठराग्नीला कांहींतरी आहुति दिली पाहिजे म्हणून त्यांनीं तीं केळीं, रताळीं, खजूर थोडा खाऊन पाहावयास सुरवात केली. आणि प्रवासाचे श्रम झालेले व भुकेची रोजची वेळ टळलेली, यामुळें आदले दिवसाचें अजीर्ण, करपट ढेकरा, व मळमळ बरीच कमी झाली होती. त्यामुळें तीं सर्व साधीं फळेंही त्यांस फार गोड लागलीं व तीं खाल्यानंतर त्यांस रोजच्यापेक्षां थोडी अधिकच हुषारी वाटली. शिवाय दररोजच्याप्रमाणें भरपूर जेवण न मिळाल्यामुळें, दुपारीं आळस यावा व दोन तास ताणून द्यावी, हाही प्रकार आज साहजिकच टळला. सायंकाळीं जेवणाच्या वेळीं सकाळच्याप्रमाणेंच प्रकार होऊन स्वारी संतापली. कारण त्या वेळीं फक्त पेलाभर दूध देऊनच वैद्यबोवांनीं सर्व भागविलें ! तेव्हां श्रीमंतांचा राग शमविण्यासाठीं वैद्यबोवांनीं 'नवीन औषधी शोध' हीच क्लृप्ति लढवून त्यांची समजूत केली. नंतर कांहीं तरी संभाषण काढून वैद्यबोवा श्रीमंतांशीं रात्रीं ९ वाजेपर्यंत बोलत बसले. त्यामुळें स्वारीस रोजच्याप्रमाणें ७ वाजतां लोळावयासही सांपडलें नाहीं. मग ९ वाजल्याबर वैद्यबोवांनीं एका नोकरास हाक मारून शेजारच्या दिवाणखान्यांत त्यांच्या निजण्याची सोय करून देण्यास सांगि-

तलें, व आपण उठून दुसरीकडे निजावयास गेले. नोकराबरोबर श्रीमंत जों दिवाणखान्यांत गेले तों तो दिवाणखाना पाहून त्यांना फारच आश्चर्य वाटलें! तेथें पलंग नाहीं कीं उंच मऊ गादी नाहीं! फक्त एक घोंगडी पसरलेली! सर्व जमीन व भिंती सारवून स्वच्छ केलेल्या. तें पाहून श्रीमंत रागावून त्या चाकरास म्हणाले:—

"काय रे, असल्या जागीं मला निजावयास सांगतोस काय? वैद्यबोवांनीं असली जागा मला द्यायला सांगितली आहे? येथें एक चांगली गादी तरी पसर! फाजील कुठला!"

नोकर म्हणाला—"महाराज, मला क्षमा करा! माझा गरीबाचा काय बरें दोष आहे? वैद्यबोवांच्या आज्ञेप्रमाणें मला वागलेंच पाहिजे." आणि असें म्हणून तो बाहेर निघून केला, व त्यानें दार लावून टाकलें! अर्थात् श्रीमंत तेथें एकटेच राहिले. अर्थातच ते फार रागावले. पण आतां उपाय नाहीं असें पाहून, ते त्या घोंगडीवर बसले आणि त्या वैद्याचा व त्याच्या नोकरलोकांचा, त्यांनीं आपल्याशीं केलेल्या या गैर वागणुकीबद्दल सूड उगविण्याच्या विचारांत ते असतांनाच, त्यांना त्यावर झोंप लागली! आज दुपारची झोंप झाली नव्हती, शिवाय निजावयास उशीर झालेला, आणि प्रवासाचे श्रम झालेले, त्यामुळें स्वारीला सकाळपर्यंत गाढ झोंप लागली!

सकाळ होतांच वैद्यबुवा दार उघडून आंत आले; आणि मोठ्या आदरानें व कळकळीनें प्रकृति कशी काय आहे, झोप कशी काय लागली, इत्यादि विचारूं लागले. तेव्हां त्यांच्या आदरवृत्तीमुळें व झोपही नीट मिळाली असल्यामुळें श्रीमंतांचे रात्रीचे विचार कोठचे कोठें निघून गेले. फक्त ते इतकेंच म्हणाले कीं, 'तो नोकर फार दुष्ट असला पाहिजे. कारण त्यानें मला येथें एक गादीसुद्धां पसरून दिली नाहीं.' पण त्यावर वैद्यबोवांनीं सांगितलें कीं, "तसें नाहीं; मीं हा 'औषधी बिछाना' आपणांकरितां मुद्दाम तयार केला. हा 'नवा औषधी शोध' मला नुकताच वाग्भट्ट वाचतां वाचतां परवां

आढळला. असे नवे नवे प्रयोग करून पाहिल्याशिवाय आमचें वैद्यशास्त्र किती खरें आहे हें सिद्ध तरी कसें होईल ? ह्मणूनच मी आपणांस प्रथम ह्मटलें होतें कीं, असे सर्व प्रयोग करून पाहण्यास रोग्यानें सबब दिली, तरच त्यास मी आपले हातीं घेतों; नाहींतर वैद्याला व वैद्यशास्त्राला कमीपणा ! परंतु तसला वेडेपणा तुमच्या ठिकाणीं अगदींच नाहीं हें फार चांगलें. असो; आपणांस झोंप बरी लागली ना ? आतां उठा व या इकडे दिवाणखान्यांत. ''

दुसरे दिवशीं जेवणाचे वेळीं श्रीमंत पुनः रागावले. पण पुनः वैद्यबोवांनीं आपल्या वाक्चातुर्यानें ती वेळ मारून नेली. वाग्भट्ट, चरक, माधव इत्यादि प्राचीन संस्कृत नांवें वारंवार उच्चारून, व नवीन शोध, नवीन प्रयोग, नवीन औषध, इत्यादि प्रकारें त्यांस दबवून टाकून त्यांनीं दररोज तसाच आहार व तसाच बिछाना त्यांस चालू ठेविला. प्रथम प्रथम श्रीमंतांचें त्या भाषणांनीं समाधान झालें. पण पुढें पुढें त्यांना वैद्यबोवांच्या लाघवी भाषणाचा संशय येऊं लागला. पण प्रकृतींतले अजीर्णादि दोष कमी होऊं लागून मनाला जरा आराम मिळाल्यामुळें, पुढें तसल्या तक्रारींला त्यांनाही फारसें महत्व देववलें नाहीं.

अशा प्रकारें बरेच दिवस चालल्यानंतर क्रमाक्रमानें श्रीमंतांचा मेद झडूं लागला; व एकादें काम करण्याची, उठण्याफिरण्याचीहि त्यांची शक्ति वाढत चालली. तेव्हां आतां त्यांना थोडें फार चालावयास लावलें पाहिजे असें वैद्यबोवांच्या मनांत आलें. मग एके दिवशीं सकाळीं उठल्यावर वैद्यबोवा ह्मणाले—" श्रीमंत ! आज शिवरात्र आहे. आम्ही सर्व जण टेकडीवर हरीश्वराच्या दर्शनास जाणार आहों. घरीं कोणी राहणार नाहीं. हवें असल्यास तुम्ही बरोबर चला. " त्यावर " हें अगदींच अशक्य. गेल्या तीनचार वर्षांत मी घराबाहेर कधीं पडलों नाहीं. तर मी टेकडीवर कसचा चढतों ! झोळींतून न्याल तर मात्र येईन. " असें श्रीमंतांनीं उत्तर दिलें.

वैद्यबोवा ह्मणाले—" डोली तयार आहे. " आणि डोलींत बसवून त्या गृहस्थांस वैद्यबोवांनीं आपलेबरोबर टेकडीवरील हरीश्वराचे दर्शनास नेलें. पण दर्शन झाल्यावर बाहेर येऊन पाहतात तों ते डोलीवाले लोक कोठें दिसेनात! वैद्यबोवांनीं पुष्कळ हाका मारिल्या, इकडे तिकडे पाहिलें, पण लोक कोणीच आढळले नाहींत! कारण ती सर्व योजना वैद्यबोवांचीच होती. पण त्यांनीं वरून पुष्कळ आव आणिला; आणि " ते पहा, ते लबाड लोक टेकडी उतरून खालीं सुद्धां गेले; मी त्यांना आतां जाऊन जाब विचारतों! खराब लोक सारे! " असें म्हणून वैद्यबोवाही पायऱ्या उतरून भराभर खालीं चालले! तों थेट ते आपले घरास जाऊन पोंचले. श्रीमंतांनीं त्यांची पुष्कळ वाट पाहिली. पण व्यर्थ! नऊ वाजले, दहा वाजले, साडे दहा वाजले! वैद्यबुवा डोली घेऊन येतील अशी श्रीमंत वाट पाहतच आहेत! पण आतां ते येण्याची आशा वाटेना. ऊन झालें व पोटांत कावळे ओरडूं लागले. ' आतां या पायऱ्या उतरून आपण खालीं जाणार कसे? व न जावें तर येथें उन्हांत कोठवर बसावें? ' अशा मोठ्या पेचांत श्रीमंत सांपडले. मग त्यांनीं तेथून पुष्कळ हांका मारिल्या; खूप ओरडाआरडा केला; अकांडतांडव केलें! ' मोठें बक्षीस देईन; मला खालीं घेऊन जा! ' म्हणून ओरडले; तरी व्यर्थ! पुढें त्या वैद्यबोवांना शिव्या देण्यास त्यांनीं आरंभ केला. परंतु तेथें त्या ऐकावयास सुद्धां कोणी नव्हतें. त्यामुळें निरुपाय होऊन आपले स्वतःचे पायांचीच विनवणी करणें त्यांस भाग पडलें! आतां येवढे श्रम करण्यास पायांची तयारी होती; पण यांचा हुकूम नसल्यामुळें त्यांना कांहीं करतां येईना. शेवटीं त्यांस चालण्याची आज्ञा मिळाली! स्वारी उठली व पहिल्या पायरीवर येऊन पोंचली. हातीं काठी होती; पायऱ्यांच्या दोहों अंगांस दगडी कठडे होते. ते धरून उतरावयास चांगले उपयोगी होते. वरून ऊन चांगलेंच लागूं लागलें होतें. त्यामुळें सावकाशी करावी तर तो त्रास सोसावा लागत होता. तेव्हां त्यांस आतां जलदी

करणें भाग झालें. जरूरी उत्पन्न झाली म्हणजे साधनें जमा होऊं लागतात. त्याप्रमाणें त्यांस आतां काठीच्या व कठड्याच्या साह्यानें त्या सर्व पायऱ्या हळूहळू सहज उतरतां आल्या; व अर्ध्याएक तासांत स्वारी वैद्यबोवांच्या दाराशीं येऊन पोंचली ! तोंच वैद्यबोवा पुढें आले. त्याबरोबर, त्यांची चांगली हजिरी घ्यावयाचें मनांत आणून श्रीमंत जों ओठ हालवितात, तोंच स्वतः वैद्यबोवा त्या डोलीवाल्या लोकांवर खूप संतापल्यासारखें करून त्यांस शिव्या देऊं लागले ! तो गलबला ऐकून आसपासचे लोक गोळा झाले. तों वैद्यबोवांस अधिकच जोर आला ! तेव्हां श्रीमंत आपला संताप विसरले; व पुढें होऊन म्हणाले— " वैद्यबोवा ! आतां त्यांस शासन करण्याचा विचार आपण मग करूं; चला आतां घरांत. मी अगदीं थकून गेलों आहें. आतां आधीं मला भोजनास बसलें पाहिजे. " तेव्हां वैद्यबोवा जरा थंड झाले. याप्रमाणें वैद्यबोवांनीं आपली युक्ति सफळ करून श्रीमंतांना आपल्या पायांची शक्ति किती आहे याचा प्रत्यय आणून दिला; आणि आपला रोगी बहुतेक बरा करून आपलें कार्य साधलें !

शिवरात्रीचें पारणें पुष्कळ संतोषकारक झालें. खीरपोळीचें जेवण करून वैद्यबोवांनीं आपल्या रोग्याला अन्न खाण्याला आज परवानगी दिली. त्यामुळें आतां श्रीमंतांचा राग बहुतेक संपुष्टांत आला. आणि आतां महिन्याची मुदतहि संपत आली. दुसरे दिवशींच, पूर्वीं ठरल्याप्रमाणें श्रीमंतांचीं नोकर-माणसें त्यांस घेऊन जाण्यास येऊन पोंचलीं. मग श्रीमंतांनीं वैद्यबोवांना नमस्कार केला आणि निरोप घेतांना ते ह्मणाले—

" वैद्यबोवा ! माझी प्रकृति बरीच सुधारली ही गोष्ट अगदीं खरी आहे. कारण आतां माझ्या तोंडाची मळमळ व अरुचि हीं नष्ट झालीं व भूकहि चांगली लागते. शिवाय मी पुष्कळ वर्षांत एक पाऊलही चाललों नव्हतों. तथापि मी आतां एकदोन मैल सहज चालत जाईन असें मला वाटूं लागलें आहे. पण एकच गोष्ट चुकली. तुम्हीं माझ्या तैनातीला जीं

माणसें ठेविलींत तीं फार दुष्ट, निर्दय व लबाड होतीं. असलीं माणसें तुम्हीं मजसारख्या श्रीमंताच्या सेवेला ठेवलींत हें गैर केलेंत असें आतां तुम्हांस म्हटल्यावांचून मला राहवत नाहीं. ''

तेव्हां वैद्यबोवा म्हणाले— पण इतक्या लौकर तुमची इतकी सुधारणा होण्याला तीं माणसेंच कारण झालीं आहेत. यापेक्षां कमी दुष्ट, कमी निर्दय व कमी लबाड माणसें मला मिळालीं असतीं, पण त्यायोगें तुमची प्रकृति सुधारण्याचें श्रेय मला गमवावें लागलें असतें ! या सर्व सुधारणेचें श्रेय आम्हीं तुमच्याशीं येथें ज्या तऱ्हेनें वागलों, त्या तऱ्हेलाच आहे. व आम्हीं ही सर्व तऱ्हा मुद्दामच योजिली होती. यांत चुकून कांहींही झालेलें नाहीं हें खास.

श्रीमंतः——पण पहिल्या दिवशीं तुम्हीं आपल्या सर्व रोग्यांना जे उत्तम उत्तम पदार्थ पथ्यास सांगितलेत, तो नुसता देखावाच केलात काय? कारण तो आदरसत्कार तुम्हीं उभ्या महिन्यांत माझ्याशीं कधीं दाखविला नाहीं ! कालचा दिवस तेवढा अपवाद !

वैद्यबोवाः——त्याचें कारण सांगतों ऐका. त्या दिवशीं तुम्हीं जे रोगी पाहिले ते सर्व गरीब लोक होते. आणि अशा लोकांचे रोग प्रायः चांगलें खावयास न मिळाल्यामुळें, शक्तीबाहेर अंगमेहनत करावी लागल्यामुळें, व थंडीवाऱ्याच्या निवारणासाठीं पुरेसा कपडा नसल्यामुळें जडलेले व वाढलेले असतात. त्यामुळें त्यांस खाण्यापिण्यांत दूध, तूप वगैरे पौष्टिक पदार्थ घेण्यास व कांहीं दिवस विश्रांति घेण्यास सांगावें लागतें. पण तुमच्यासारख्या श्रीमंतांचे सारे रोग अतिशय खाण्यानें, अजीर्णानें, श्रम न करतां दिवसभर स्वस्थ बसून राहिल्यानें व कोंडल्या हवेमुळें जडलेले असतात. म्हणून तुम्हांस आहार कमी करावयास, व्यायाम घ्यावयास व उघड्या हवेंत फिरावयास सांगणें भाग असतें. अर्थातच श्रीमंत व गरीब यांच्या पथ्यपाण्यांत भेद करावा लागतो. खरोखर पाहिलें असतां तुमच्या खाण्या-

पिण्यांत किंवा आंथरुणांत 'नवीन औषधी शोध' वगैरे कांहीं नव्हतें. केवळ तुम्हीं येथें जो निराळा दिनक्रम पतकरिला, त्यायोगेंच तुमच्या शरीरांतील मूळच्या कणखरपणाला प्रगट व्हावयास वाव मिळाला व त्याचेंच फळ म्हणजे तुमची ही सुधारणा होय. यांत तुमच्या मर्जीविरुद्ध आह्मांस पुष्कळ करावें लागलें खरें, पण त्यासंबंधांत कुरकुर करण्यास तुह्मांस आतां जागा उरली नाहीं. कारण ही तुमची प्रकृति सध्यां इतकी सुधारली आहे कीं, दुसऱ्या उपायांनीं तुम्हीं आपली सर्व संपत्ति जरी खर्च केली असती तरी असा गुण येताना!"

इतकें स्पष्टीकरण ऐकल्याबर त्या गृहस्थाच्या डोक्यांत चांगलाच प्रकाश पडला. मग वैद्यबोवांनीं आपणावर केवढे उपकार केले ते त्याच्या ध्यानीं आले. आपली प्रकृति सुधारल्याचें काय महत्त्व आहे तेंहि त्याला कळलें, आणि आपण व्यर्थ या गृहस्थास छळलें, असा त्यास पश्चात्ताप झाला. आतां त्यानें जो आहाराचा व व्यायामाचा नेम केला, तो अखेरपर्यंत ह्मणून बदलूं दिला नाहीं. त्यानें वैद्यबोवांस, खऱ्या कृतज्ञतेनें अंतःकरण भरून येऊन पुनः एकबार नमस्कार केला व गाडींत बसून श्रीमंत आपल्या घराकडे चालले!

× × × ×

वाचन संपल्यावर बाळ ह्मणाला--ही गोष्ट फारच छान आहे. आमच्या घरीं कधीं कधीं एक मोठे ढेरपोटे गृहस्थ येतात, त्यांना आतां ही मी आल्यावर सांगेन! मग फार मौज होईल.

गुरुजी ह्मणाले--बाहबा! तसें करणें तुझ्यासारख्या मुलाला फारच अयोग्य. शिवाय तुला स्वतःला अद्याप किती तरी शिकावयाचें असतांना दुसऱ्यास शिकवावयाच्या भानगडींत तूं कशाला पडावेंस? या गोष्टीवरून एवढेंच लक्षांत घ्यावयाचें कीं, खायला प्यायला खूप असलें व मागें उद्योग नसला, तर ती स्थिति कांहीं सुखाची नसते; आणि खायला अगदीं

जरूर तेवढें मिळून कष्टाचीं कामें जरी रोज पडत असलीं तरी त्यांत लोकांना वाटतें त्याप्रमाणें कांहीही दुःख नसतें. चैनींत लोळणाऱ्या माणसां-पेक्षां अडचणींत दिवस घालविणारे लोकच शरीरप्रकृतीनें चांगले असतात. अशा लोकांत नव्वद नव्वद वर्षांचे म्हातारे पण कसे खणखणीत, असे लोक मीं पाहिले आहेत. त्यांची दुखण्याखुपण्याची कांहीं एक तक्रार नसते. इतक्या वयापर्यंत जगलेले लोक चैनी व ऐषआरामी वर्गांत फारसे आढळत नाहींत.

---

## ३४ हिमालयावर !

दुसरे दिवशीं बाळ गुरुजींस म्हणाला:—गुरुजी, हिमालय हा फार थंड प्रदेश आहे, नाहीं ? मला वाटतें, येथें या उन्हाळ्याचा आपणांस कोण त्रास होतो ! अंगांत सदरा घालवत नाहीं व सर्वांगास सारखा घाम येत राहतो. मग एथें राहण्यापेक्षां आपण हिमालयावर राहावयास गेलों तर फार मौज होईल ! थंडी पुष्कळ असली तरी ती या उन्हाळ्याइतकी त्रास-दायक होणार नाहीं !

हरी म्हणाला—पण तूं एकटाच जाणार, कीं तात्यासाहेब व राधाबाई हेही तुझ्याबरोबर येणार ? आणि घरांतील इतर माणसें सुद्धां तिकडे तूं नेणार कीं काय ? आणि त्यांची तिकडे येण्याची तयारी आहे का ?

गुरुजी म्हणाले:—आणि कदाचित् त्यांचीही तयारी होईल; पण तुमचीं शेतीचीं जीं इनाम गांवें आहेत तीं तूं तिकडे कशीं नेणार ?

हरीः—आणि गुरुजी, तीं सारीं उचलून जरी हिमालयावर नेऊन ठेवलीं, तरी काय ? त्या सर्वांवर लागलीच बर्फाचा दाट थर येऊन पस-रेल ! आणि तो वर्षानुवर्ष अधिकच घट्ट होत राहील ! मग तिथें ऊंस

कसा लावावयाचा ? भुईमूग कसा पेरावयाचा ? ओंघळा कसा होणार ? आणि बाजरी तरी कशी येणार ? मग बाळाचीं सारीं इनामगांवें म्हणजे नुसता बर्फाचा पांढरा शुभ्र प्रदेश !

बाळ:—खरेंच गुरुजी ! हिमालयावर असें इतकें बर्फ असतें ?

गुरुजी:—हो ! बाराही महिने बर्फ ! तरी पण तिकडील ते पहाडी लोक तशा कडाक्याच्या थंडींत खुशाल वावरत असतात ! आणि तिकडचे लोक आपणांपेक्षां चांगले धिप्पाड व निकोप प्रकृतीचे असतात. मात्र जिकडे तिकडे पांढरें शुभ्र बर्फ पसरलें असल्यामुळें, तें नेहमीं पहात राहिल्यानें त्या लोकांच्या डोळ्यांना त्रास होतो. पण बाळ, तिकडे राहावयाचें तर फक्त शेळ्या-मेंढ्या यांच्या दुधावर राहावयाची तयारी केली पाहिजे. आणखी-दुसऱ्या कितीएक अडचणी सोसण्याची तयारी पाहिजे. त्या डोंगराळ प्रदेशांत किती तरी बर्फ बारंवार अचानक खालीं येऊन कोसळलें ! पिंजलेल्या कापसाप्रमाणें त्याचा एकदम वर्षाव सुरू होतो व ५-१० मिनिटांत त्याचा सर्व प्रदेशभर मोठा थोरला थर बसून खालीं घरेंच्याघरें पुरलीं जातात ! आणि त्याच्याखालीं माणसांना व जनावरांना कधीं महिना महिना कोंडून पडून राहण्याची पाळी येते. मग बर्फ वितळेल तेव्हां सुटका. नाहींतर तेथेंच राम म्हणण्याचा प्रसंग यावयाचा ! तिकडे असे कित्येक भयंकर प्रकार बारंवार घडतात ते तुला ठाऊक आहेत ? मीं तिकडे असतांना तिकडची एक फार चमत्कारिक गोष्ट ऐकली आहे, ती तुला सांगतों ऐक.

असें म्हणून त्यांनीं पुढील गोष्ट सांगितली—

\+ + + +

हिमालयांत एका मोठ्या कड्याच्या पायथ्याशीं कांहीं पहाडी लोकांची एक लहानशी वस्ती आहे. तेथें एकदां एकाएकीं वरून बर्फाचा खूप मोठा वर्षाव असाच सुरू झाला व त्याखालीं त्या लोकांचीं दहा पांच घरें अचानक सांपडलीं ! त्यांतील एक गृहस्थ व त्याचा सुमारें १५।१६

वर्षांचा एक मुलगा घराच्या छपरावर पडून राहिलेलें बर्फ दूर करण्याचा प्रयत्न करीत होते. इतक्यांत वरून बर्फाचा बेसुमार वर्षाव सुरू होतांना पाहून दूरच्या एका मनुष्यानें ' अहो ! मागें पहा ! ' ह्मणून ओरडून त्यांस सांगितलें. तोंच ते दोघे बापलेक घाबरून उड्या टाकून पुढें पळूं लागले. ते ५-५० पावलें गेले, तोंच मुलगा ठेचाळून धाडकन आपटला. तेव्हां त्यास उठविण्याकरितां बापानें मागें वळून पाहिलें. तों तें बर्फ त्यांच्या घरावर व इतरहि आसपासच्या मार्गांवर पडून सर्वत्र बर्फच होऊन गेलें ! व त्यांचें घर कोठें होतें याचा मागमूसही नाहींसा झाला ! घरांत त्या गृहस्थाची बायको, तिची बहिण आणि दोन मुलें होतीं, तीं सर्व याप्रमाणें क्षणांत बर्फाखालीं पुरलीं गेलीं ! हें पाहून त्याला कांहीं सुचेनासें झालें व तो जमिनीवर मूर्छित होऊन पडला. पण इतक्यांत दूरचीं कांहीं माणसें धावून येऊन त्यांनीं कांहीं उपचार करून त्यास सावध केलें. नंतर ते त्या दोघांना आपल्याच घरीं घेऊन गेले.

नंतर दोन तीन दिवसांनीं, बर्फ पडावयाचें जरा थांबलेंसें पाहून तो गृहस्थ, त्याचा मुलगा व दुसरे दोघे तिघे इसम मिळून त्याचें घर व त्यांतील माणसें यांचा कांहीं तपास लागतो कीं काय हें पाहण्यासाठीं बरोबर पहारा घेऊन निघाले. पण दोन चार ठिकाणीं बर्फ उकरूनही त्यांस त्यांची जागा न सांपडल्यामुळें ते निराश होऊन परत आले. नंतर ५।४ दिवसांनीं ऊन्ह जरा कडक होऊन, पसरलेलें बर्फ वितळून मोकळें होऊं लागलेंसें पाहून, पुनः एकवार शिकस्तीचा प्रयत्न करून आपलें घर शोधून काढावें व आंतील मंडळींचा तपास करावा, या हेतूनें ते त्या बर्फावरून खळगे करीत चालले. शेवटीं एके ठिकाणीं ५–६ फूट खोलीपर्यंत बर्फ फोडून काढल्यावर त्यांस जमीन लागली. नंतर त्याच्या आसपास आणखी कांहीं ठिकाणीं बर्फ फोडून पाहण्यास आरंभ केला, तेव्हां त्यांस त्यांच्या घराची जागा सांपडली. पण मोठ्या प्रयासानें सर्व बर्फ दूर करून पाहतात तों काय,

घरांत माणसें कोणींच नाहींत ! मग पलीकडील गोठ्यांतील गुरांची काय बाट झाली तें पाहण्यासाठीं ते सर्व जेव्हां तिकडे मोकळें करीत चालले, तों आंतून कोणी मनुष्य विव्हळतांना ऐकूं आलें. जरा पुढें जातात तों त्याची बायको, एक बहीण व १३ वर्षांची एक मुलगी आंत जिवंत असल्याचें त्यांस आढळून आलें. मग तांतडी करून त्यांनीं त्या सर्वांस वर उचलून घेतलें व जवळच्या एका घरांत नेऊन त्यांस उबदार आंथरुणावर निजविलें. लागलीच त्यांस ऊन्हून कण्हेरी प्यावयास देऊन दुसरेही कांहीं उपचार चालूं केले. पुढें आठ दिवसांनीं त्यांचीं दुसरीं माणसें त्यांजकडे समाचारास आलीं. तेव्हां ती बाई आंथरुणावर पडूनच होती. १५ दिवस त्या गोठ्यांत अंधारांत बसून राहावें लागल्यामुळें ती इतकी गारठून व अवघडून गेली होती कीं, तिला अद्याप आंथरुणावरही नटिपणें उठून बसतां येत नव्हतें. पण त्या गृहस्थाची बहीण कशीबशी चार पावलें टाकाण्यास तयार झाली होती; व ती १३ वर्षांची मुलगी आतां खडखडीत बरी होऊन, तिला आणखी कांहीं उपचार करण्याची गरज राहिली नव्हती.

नंतर जमलेल्या लोकांनीं विचारल्यावर त्याच्या बहिणीनें आपली हकीगत सांगितली. ती म्हणाली—त्या दिवशीं गुरुवार होता. गोठ्यांतील एका करडाला फार थंडी झाली होती, तें कांहीं खाईना; म्हणून त्यास पाजण्यासाठीं कण्हेरी करून घेऊन ती एका वाडग्यांतून आम्हीं त्याजपुढें नेऊन ठेविली. त्या वेळीं सहा वर्षांचा एक मुलगा व ही तेरा वर्षांची मुलगी आमच्याबरोबर तेथें होती. गोठ्यांत ५।६ शेळ्या, ५।६ कोंबडीं, आणि एक खेचर होतें. गोठ्यांत जातांच बर्फाचा जोराचा वर्षाव सुरू झाला आहे असें आमच्या बहिनीच्या नजरेस आलें. तें तिनें आम्हांस लागलीच सांगितलें. मग मीं सर्व दारें तावडतोब लावून घेतलीं व बहिनीला सांगितलें कीं, आपण आतां या गव्हाणींत बसूं या. त्यानंतर १।२ क्षण होतात तोंच छपरावर बर्फाचा थर पूर्ण पसरून आम्ही सर्व त्याखालीं घरांतच

पुरले गेलों. तेथें एक खेचर बांधलेलें होतें तें त्याबरोबर बुजून लाथा झाडूं लागलें व धडपड करूं लागलें. शेवटीं त्यानें आपलें दावें तोडलें! त्या गर्दीत करडापुढें आम्हीं ठेवलेलें कव्हेरीचें भांडें तेथून गव्हाणीत येऊन पडलें. आम्ही तेथें होतों तोंपर्यंत आम्हांला बर्फाचें वितळणारें पाणी भरून घेऊन पिण्याला तें भांडें तेवढें आमच्या उपयोगीं आलें.

बर्फाचा वर्षाव होऊन आम्ही सर्वजण त्या गव्हाणींतून कोंडले गेल्यावर आम्हांस पहिला प्रश्न हा उत्पन्न झाला कीं, आतां या गोठ्यांत आपणांस खायला काय मिळणार? त्या वेळीं माझ्या ओच्यांत चेसटीचीं दहावीस फळें होतीं. मुलांनीं नुकतेंच घरून खाऊन घेतलें होतें, त्यामुळें आतां सारा दिवसभर आम्हांस कांहीं नको, असें त्यांनीं सांगितलें. मग त्यांतलीं कांहीं फळें मीं वहिनीला दिलीं व कांहीं मीं खाल्लीं; नंतर आमच्या स्मरणांत आलें कीं, गोठ्यांत पलीकडच्याच खोलींत गव्यांच्या पांचचार भाकरी त्यांनीं ठेविल्या आहेत; पण तिकडे जाण्यास कांहींच शक्यता नसल्यामुळें त्यांचा कांहींच उपयोग नाहीं असें ठरलें. पलीकडच्या अंगास तें खेचर सारखी धडपड करीत होतें. शेळ्या सर्व बें बें करून सारख्या ओरडत होत्या. पांचचार दिवस तें ओरडणें आम्हीं ऐकलें. पुढें काय झालें तें कांहीं आम्हांस कळलें नाहीं. दुसऱ्याच दिवशीं त्या अंधारांत, आम्ही त्या सर्व शेळ्यांमधून, ज्या दूध देणाऱ्या दोन शेळ्या होत्या, त्या प्रथम ओळखून काढल्या. मग दुधाच्यासाठीं त्यांचा प्राण कसा जगवावा असा विचार करूं लागलों. डोक्यावरच कांहीं गवत रचून ठेवलेलें होतें. तें आम्हीं हात वर करून प्रथम एकदोन दिवस काढलें. पुढें तें हातास येईनासें झाल्यानंतर त्या शेळ्यांना आम्हीं आपल्या खांद्यावर घ्यावें, मग त्यांनीं तोंड लांब करून तें गवत उपसावें व खावें, असें ४।५ दिवस चाललें. जसजसे दिवस अधिक होत गेले तसतसें त्यांचें दूध कमी कमी झालें. त्या सर्व पंधरा दिवसांत आम्हांस प्रकाशाचा एक किरणही अर्थात् लाभला नाहीं. पण

कोंबड्यांच्या आरवण्यावरून फक्त सूर्योदय झाला एवढें आम्हांस ओळखत होतें. पुढें लौकरच तीं सर्व कोंबडीं गुदमरून मरून गेल्यामुळें, तेंही कळावयास मार्ग राहिला नाहीं.

पहिले १।२ दिवस चेसटीच्या फळांवर व पुढें पांचचार दिवस त्या दोन शेळ्यांच्या दुधावर कसेबसे आम्हीं काढले. सातवे दिवशीं धाकटा मुलगा आजारी पडला व कण्हूं लागला. वहिनी त्याला सारखी मांडीवर घेऊन बसली होती. शेवटीं बारावे दिवसापर्यंत तो होता. बारावे दिवशी त्यानें वहिनीला सांगितल्यावरून तिनें त्यास मांडीवरून खालीं नीट पाय पसरून निजविलें. मग एक क्षणभर त्यास बरें वाटलें. तेवढ्यांत त्यानें बाबांची आठवण काढली. तो म्हणाला– " आई, बाबा बर्फाखालीं सांपडले का ग ? " नंतर ' बाबा, बाबा, ' असें एकदोनदां बोलून त्यानें प्राण सोडला. त्या वेळीं त्याच्या मरणाबद्दल दुःख करावयास आम्हीही फारसा शुद्धीवर नव्हतों. एकंदरींत १५ दिवसपर्यंत आम्हीं आंत अडकून पडलों असूं असा आमचा अंदाज होता. तों सोळावे दिवशींच आमचा तपास लागून आम्हांस बाहेर काढण्यांत आलें.

× × × × +

बाळ म्हणाला– गुरुजी; किती हो कठीण प्रसंग माणसावर येतात हे !

गुरुजीः– आणि अशा कित्येक अडचणी माणसावर येतात, म्हणूनच त्यांचें निवारण करण्यासाठीं माणसानें आपलें बुद्धिचातुर्य खर्च केलें पाहिजे व आपल्या करामतीनें अनेक साधनें योजून त्या वेळीं आपलें रक्षण केलें पाहिजे. या प्रकारें आपली बुद्धि खर्चून आपल्या पूर्वजांनीं पुष्कळ प्रयत्न केले; व सध्यां पाश्चात्यांनींही याच गुणाच्या योगानें सर्वत्र आपली भरभराट करून घेतली आहे. इतिहास वाचला म्हणजे हा सर्व मौजेचा व बोधदायक प्रकार चांगला ध्यानीं येतो.

———

# ३५ यंत्रशास्त्राचा श्रीगणेशा.



दुसरे दिवशीं बागेंत आल्यानंतर हरी आणि बाळ यांनीं आपआपल्या ताफ्यांतील मोगरीचीं व गुलाबाचीं फुलें घेऊन शंकरास वाहिलीं; व एक फूल आपल्या हातांत घेऊन त्याच्या पाकळ्या, त्याचा रंग व त्याचा मधुर सुवास यांचा विचार करीत ते देवालयामागील प्रदेशांत फिरत फिरत चालले. इतक्यांत बाळाच्या हातचें गुलाबाचें फूल हातांतून जमिनीवर पडलें. लगेच तें उचलून घेण्यास बाळ जों खालीं वाकतों, तों तें एका मोठ्या दगडाच्या खालीं गेल्याचें त्यास आढळून आलें. त्यामुळें तें आतां वर कसें काढावें हा प्रश्न उत्पन्न झाला. तो दगड उचलून टाकावा म्हणून दोघांनींही बराच प्रयत्न केला; पण तो कांहीं हालेना. मग हरी म्हणाला— " थांब, आपण देवळांत जाऊन पहार घेऊन येऊं; म्हणजे हा दगड सहज उचलतां येईल." असें म्हणून देवळांतून दोघेजण दोन पहारी घेऊन आले आणि त्या दगडाच्या खालीं त्या लावून जवळच्याच दुसऱ्या दगडाचा टेकू करून त्यांनीं तो एका क्षणांत उलथून टाकला. तेव्हां बाळास मोठा चमत्कार वाटला. तो म्हणाला—" हरी, हें कसें रे झालें ? आपल्याला जो दगड हातांनीं नुसता हालतही नव्हता, तो पहारा लावतांच किती पण सहज उचलला, एकाद्या फळीसारखा !

हरी म्हणाला— रानामध्यें तोडून पाडलेले लांकडाचे मोठमोठे ओंडके लोक अशाच पहारा लावून उचलतांना मीं पुष्कळदां पाहिलें आहे. पण बाळ, यापैकीं लहान पहारीनें तो दगड लौकर उचलेल, कीं मोठीनें लौकर उचलेल हें तूं सांगशील ?

बाळ म्हणाला— " धाकटी पहार मला आटपशीर आहे. तिनेंच मीं एकटा हा धोंडा पुनः उचलतों पहा. " आणि असें म्हणून त्यानें लागलीच

ती पहार दगडास लाविली व उचलण्याचा प्रयत्न चालविला. परंतु पुष्कळ श्रम करूनही चार बोटांपलीकडे त्यास तो दगड उचलेना. मग त्यानें आपली कल्पना चुकली असेल असें समजून मोठी पहार घेतली व ती खालीं घालून दाबली. त्याबरोबर तो दगड पहिल्याच खेपेला अगदीं उभा झाला ! तेव्हां तो हरीस म्हणाला– " हरी, हें कसें रे ? मोठी पहार लावल्याशिवाय हा दगड उचलतां येत नाहीं ! "

हरी म्हणाला—– त्याचा असा नियम आहे कीं, जेवढी पहार मोठी, तेवढें बळ कमी लागतें. आतां या पहारीपेक्षांही मोठी अशी एकादी काठी किंवा लांकूड मिळेल तर यापेक्षांही कमी जोर देऊन आपल्याला हा धोंडा उचलून टाकतां येईल.

बाळः–– " मग हरी, तीं पहा पलीकडे पुष्कळ लांकडें पडलीं आहेत. त्यांतून असें एकादें लाकूड आपण काढून आणूं. "

असें म्हणून ते दोघे तिकडे निघाले. चालतांना बाळ म्हणाला–" ही फारच सुरेख अशी युक्ति आहे, नाहीं हरी ? एकच सार्थे काम, पण या युक्तीनें कसें सहज साधतें. एरवीं, किती तरी श्रम घ्यावे लागतात ! "

हरीः–– बाळ, अशाच युक्तींनीं अलीकडे लोक यंत्रें तयार करूं लागले आहेत; आणि आपण येथें जी पहार लावली तें एक यंत्रच आहे. त्यास ' तरफ ' असें म्हणतात.

बाळः— कांहीं तरीच ! पहार कोठें यंत्र होईल काय ?

हरी— होय. येथें पहार ही तरफ आहे व तरफ हें यंत्रच आहे. हवें तर गुरुजींस विचार.

असें ते परस्परांशीं बोलत आहेत तोंच, जेथें तो लाकडाचा ढीग पडला होता तेथें ते आले. तों तेथें दोघे इसम बाभळीचे मोठमोठे ओंडे घेऊन फोडीत होते, तिकडे त्यांचें लक्ष गेलें. त्या वेळीं एक मोठा ओंडा त्यांनीं नुकताच फोडावयास घेतला होता. त्यावर कुऱ्हाडीचे दहावीस घाव त्यांनीं

घातले तरी, तें लाकूड विशेष गांठाळ असल्यामुळें, ते घाव टणकन वर उडत; पण कुऱ्हाड त्या लाकडांत अगदींच शिरेना! तें पाहून बाळ म्हणाला—" हरी, हा म्हातारा माणूस कां हे उगीच घाव घालीत आहे? या कुऱ्हाडीनें हें लाकूड त्यास फुटणें शक्य आहे काय? शंभर घाव मारावे तेव्हां कोठें कुऱ्हाड आंत शिरेल! आणि इतकें करून तरी काय? कुऱ्हाड बाहेर निघाली कीं, पडलेली फट ताबडतोब बंद! तेव्हां हें लाकूड याला फुटणार तरी कसें?"

हरी म्हणाला—तूं लाकडें फोडतांना पाहिलीं नाहींस वाटतें! कुऱ्हाड प्रथम जेव्हां आंत शिरते, तेव्हां तिनें जी लांकडांत फट पडते, त्या फटींत दुसरी कुऱ्हाड खोंचून ठेवितात; किंवा दुसरी एकादी पाचर बसवितात; म्हणजे ती फट मुजत नाहीं. मग आणखी घाव घालून पुढच्या अंगास लाकूड फुटूं लागतांच पुनः दुसरी पाचर बसवितात; व एरवीं जी लाकडाची फाळ काढणें अगदीं अशक्य वाटतें, ती अशा प्रकारें पाचर घालून, थोड्या श्रमांत काढतां येते. तो म्हातारा आतां कुऱ्हाडीस धार लावीत बसला आहे. तो आतां याच युक्तीनें हा सर्व ओंडा फोडून टाकील. हवें तर थोडा वेळ आपण थांबूं, म्हणजे आपणांस तें सर्व पहावयास सांपडेल.

मग हरीनें पाचरीची कल्पना सांगितली त्याच तऱ्हेनें त्या ओंड्याची एक फाळ १०-५ ठोक्यांत त्या म्हाताऱ्यानें फोडून काढली. तें पाहून बाळ म्हणाला—" हरी, ही पाचरीची युक्तिसुद्धां मघांच्यासारखी फार उपयोगाची आहे. यायोगानेंही मोठ्या शक्तीचें काम थोड्या शक्तीनें घडवून आणतां येतें. मग तूं ही पाचर सुद्धां यंत्रच म्हणणार काय?

हरी:—हो, हा एक यंत्राचाच प्रकार आहे. ज्या कोणत्याही कल्पनेच्या योगानें अधिक शक्तीचें काम थोड्या शक्तीनें करून दाखवितां येतें, त्या सर्व प्रकारांना यंत्र म्हणावयास हरकत नाहीं, असें मला परवांच गुरुजींनीं सांगितलें आहे.

बाळः—पण या युक्तीनें आपलें काम सहज होतें हें मात्र खरें.

हरीः—बाळ, आणखी एक मौज मी तुला सांगतों. हा इकडे पडलेला लांकडाचा दुसरा ओंडा तूं पाहिलास ? हा तूं आणि मी दोघे मिळून येथून उचलून ते जे लोक तिकडे ओंडे फोडीत आहेत त्यांजकडे नेऊन देऊं या. तूं येतोस ?

बाळः-पण तो आपणां दोघांस उचलून नेववेल कसा ? मध्येंच पाया-वर पडला तर पाय मोडून जाईल म्हणजे झालें !

हरीः-" त्यासाठीं आपण युक्ति करूं." असें म्हणून त्यानें तेथें पड-लेली एक दोरी घेतली व एक लांब काठी त्या लांकडांतून शोधून काढून तिच्या मध्याला ती दोरी बांधून, खालीं ती त्या ओंड्यास बांधली. आणि तो बाळास म्हणाला--" बाळ, तूं कोणचें टोक धरतोस ?"

बाळः—" हें माझ्या बाजूकडील टोंक मी उचलतों." असें म्हणून त्यानें ती बाजू व हरीनें दुसरी बाजू उचलली. हरीची बाजू बाळाच्या बाजूच्या दीडदोन पट लांब होती. त्यामुळें हरीपेक्षां बाळाला ओझें जास्त झालें. मग त्यांनीं खटपट करून चार पावलें तों ओंडा वाहून नेला; तों बाळ थकला. तो म्हणाला-" आपल्याला नाहीं बोवा हें ओझें उचलत. हरी, तूं रे कसें हें ओझें खुशाल उचललेंस ? दमला नाहींस ?"

हरीः—तूं माझ्या बाजूस येशील तर तुला समजेल.

मग बाळानें आपली बाजू सोडून हरीची बाजू धरली व हरी बाळाचे बाजूस आला. तों बाळाला ओझें फारच कमी झालें व हरीला दुप्पट झालें ! मग तो ओंडा आणखी चार हात वाहून नेल्यावर तो थांबवून हरी म्हणालाः—" बाळ, आतां तुझ्या बाजूला पूर्वीपेक्षां ओझें कमी वाटलें तें कां, हें तुला समजलें का ?"

बाळ म्हणालाः—कां तें तूं सांग पाहूं ?

हरीः—" मघांचीच तरफेची कल्पना लक्षांत आण, म्हणजे झालें. पहा;

जितकी लहान तितकें ओझें जास्त; त्याप्रमाणें येथेंही काठीची बाजू जी लहान असेल तिकडे ओझें जास्त पडतें व मोठ्या बाजूकडे कमी पडतें. आतां जर ही दोरी काठीला आपण अगदीं मधोमध बांधली, तर दोघांस ओझें अगदीं सारखें होईल. " असें ह्मणून हरीनें ती दोरी सोडली व पुनः अगदीं मधोमध त्या काठीस बांधली. आणि मग ते तो ओंडा उचलूं लागले. तेव्हां बाळाला आतां त्याची बाजू पहिल्यापेक्षां कमीच, पण दुसऱ्या खेपेपेक्षां जास्त जड वाटली. मग तो ह्मणालाः—" हरी, मला तुझी बाजू दे पाहूं. " आणि हरीकडील बाजू त्यानें धरून पुनः दोघांनीं तो ओंडा उचलिला. तो तितकाच जड लागला. तेव्हां बाळ ह्मणालाः——

" खरोखर, ही किती मौज आहे ! एवढी ही एक साधी काठी, पण हिच्यांतसुद्धां एक मोठी जादूच भरली आहे असें मला वाटतें ! "

हरीः—गुरुजी म्हणतात, अशी जादू प्रत्येक वस्तूंत भरलेली आहे; ती आपणांस ठाऊक नाहीं. ती ठाऊक झाली तर मग केवढी मजा होईल !

बाळः—खरेंच; असें जर आपणांस सारें ज्ञान होईल, तर आपणांस एवढा आनंद होईल व एवढें सुख वाटेल कीं, तसें दुसऱ्या कशानेंही होणें शक्य नाहीं. हरी, या गोष्टी आपणांस अद्याप माहीत नाहींत !

इतक्यांत या मुलांचा काय खेळ चालला आहे तें पाहण्यासाठीं गुरुजी तेथें आले. त्यांना तो सर्व प्रकार पाहून आनंद वाटला. मग बाळाच्या शेवटच्या भाषणावर ते ह्मणाले—अरे, अशा पुष्कळ गोष्टी आपणांस अद्याप माहीत झाल्या नाहींत हें अगदीं खरें. पण जन्मतःच सर्व ज्ञान कधीं कोणास झालें आहे ? पण आपण एकेक गोष्ट समजून घेत आहोंत, यानें आपल्या ज्ञानांत भर पडत असून, दरएक दिवस आदल्या दिवसापेक्षां आपणास अधिक आनंदाचा वाटत आहे. हा केवढा लाभ आहे ! याप्रमाणें शेवटपर्यंत कांहीं ना कांहीं तरी नवीन ज्ञान करून घ्यावयास ही पृथ्वी व हींतील लक्षावधि पदार्थ आपणांस पुरेसे आहेत, यांत शंका नाहीं.

हरीः—आणि गुरुजी, पृथ्वी व तीवरील पदार्थ संपत आले तर आकाशांत चंद्र, सूर्य व नक्षत्रें खूप भरलेलीं आहेतच ! तें ज्ञान आपण मिळवूं.

गुरुजीः—आणि तींही सर्व संपलीं तर या सृष्टीचा निर्माणकर्ता जो सर्वसमर्थ परमेश्वर त्याचा शोध करणें, त्याच्या प्राप्तीनें कृतार्थ होणें हाही एक अत्यंत महत्वाचा विषय शिल्लक आहेच !

हरीः—मग इतकें सर्व करून घ्यायला आपल्याला हा एकच काय, पण हजारों जन्मदेखील पुरणार नाहींत !

गुरुजीः—हो. आणि अशा अनेक जन्मांनींच आपण परमेश्वराच्या ठिकाणीं पोंचणार आहों. भगवद्गीतेंत श्रीकृष्णांनीं म्हटलेंच आहे—

बहूनां जन्मनां अन्ते ज्ञानवान् मां प्रपद्यते ॥

असो; आतां, ओंझ्याला बांधलेली काठी दोहों अंगांस सारखी असली म्हणजे दोहों बाजूंस वजन सारखें पडतें, नाहीं तर तें कमीजास्त होतें, हें तुम्हीं आतां पाहिलेंच. आपण जी तराजू पाहतों तींत हीच गोष्ट साधलेली असते. चला आपण घरीं जाऊं व घरची तराजू घेऊन तिचे प्रयोग करूं.

असें ह्मणून ते सर्व घराकडे वळले. घरीं येतांच शास्त्रीबोवांनीं आपली मोठी तराजू बाहेर काढिली; आणि ते म्हणालेः—पहा, ही तराजूची दांडी अगदीं मध्यावर दोरींत अडकविली असल्यामुळें सध्यां हीं पारडीं अगदीं समतोल राहिलीं आहेत. आतां जर दोहोंकडे सारखेंच वजन टाकलें तर तीं अशींच समतोल राहतील. यामुळेंच आपणांस तराजूनें कोणताही जिन्नस तोलून दुसऱ्यास देतां येतो व दुसऱ्यापासून घेतां येतो. पण आतां पहा; मी ही दोरी मध्यावरून जरा बाजूस सरकवितों. आतां ही एक बाजू दुसरीच्या दीडपट झाली; त्याबरोबर पहा, मोठ्या बाजूचें पारडें कांहीं वजन न टाकतांच कसें खालीं गेलें व लहान बाजूचें वर आलें ! आतां हीं पारडीं जर आपणांस समतोल करावयाचीं असतील, तर या लहान बाजूला इकडच्यापेक्षां अधिक वजन टाकलें पाहिजे. पहा,

आतां या बाजूस मी दीड शेर वजन टाकतों, व मोठ्या बाजूस एक शेर टाकतों. आतां हीं पारडीं अगदीं समतोल झालीं.

हरी ह्मणाला—तर मग गुरुजी, असा एक नियमच झाला कीं, तराजूचीं दोन्ही पारडीं समतोल करावयाचीं असलीं तर, एक बाजू दुसरीच्या ज्या पटीनें मोठी असेल, त्याच पटीनें त्या दुसऱ्या बाजूला पहिलीपेक्षां अधिक वजन टाकलें पाहिजे.

गुरुजी—बरोबर. यासाठीं तराजूच्या दांडीस दोरी अगदीं मध्यावर बांधलेली असावी. नाहीं तर आतांच्या सारखी तराजू तयार केली तर, मोठ्या बाजूस तीन शेरांचें वजन टाकलें असतां लहान बाजूच्या पारड्यांत साडेचार शेर माल टाकावा लागेल. मग विकणाराचा तोटा होईल. परत हेंच तीन शेरांचें वजन या दुसऱ्या बाजूस टाकलें तर पहिल्या पारड्यांत दोन शेरांचा माल टाकतांच दांडी समतोल होईल. पण यायोगें आतां माल घेणाराचा तोटा होणार.

बाळ ह्मणाला—मग गुरुजी, एक माप या पारड्यांतून व दुसरें त्या पारड्यांतून, असें घातलें तर कशाला कोणाचा तोटा होईल ?

गुरुजीः—छे; तेंही विकणाराला तोट्याचें व घेणाराला नफ्याचें असतें. आतांच पहा, हें तीन शेरांचें वजन मोठ्या बाजूस टाकून माल जोखला तो ४।। शेरांचा गेला. पुनः परतून तें तीन शेरांचें वजन लहान बाजूस टाकून मोठ्या बाजूनें माल जोखला तो दोन शेर गेला. एकूण ६।। शेर माल गेला. अर्थात् अर्धा शेर माल जास्त गेला.

हरी ह्मणाला—मग जर एकाद्या व्यापाऱ्यानें तराजू अगदीं मध्यावर दोरीस अडकविली नाहीं असा आपणांस संशय आला, तर आपण दोन बाजूंनीं दोन मापें घ्यावीं, म्हणजे आपणांस माल अर्थातच अधिक मिळेल.

गुरुजीः—आणि म्हणूनच सर्व व्यापारी लोक आपल्या तराजूस दोरी अगदीं मध्यावर बांधून ठेवितात. असो. अशीच एक दुसरी गोष्ट आपल्या

रोजच्या उपयोगांत आहे. तो आपल्या आडाचा रहाट. त्याच्या योगानें आपण केवढी मोठी घागर भरून दोनतीन पुरुषांखालून वर ओढतों. पण तीच घागर या जिन्यावरून माडीवर न्यावयाची म्हटली तर आपणांस किती अवघड जातें! याचें कारण रहाटाचा दोर ज्यांवरून फिरतो तें चक्र लहान असतें व रहाट ओढावयाच्या मुठीचें चक्र मोठें असतें, हें होय. त्या दोराच्या चक्रापेक्षां मुठीचें चक्र जितकें मोठें, तितकें आडांतून घागर वर ओढणें सोपें होतें; मोठ्या पहारेनें जसा दगड सहज कोलतां येतो, तसाच प्रकार येथें होतो. ती तरफेचीच कल्पना या रहाटांत घेतलेली आहे. यावरून मनुष्य आपली कल्पनाशक्ति चालवून आपलें किती मोठें काम कसें थोड्या श्रमांत सिद्धीस नेतो तें सहज समजून येतें.

हरीः—गुरुजी, मघाशीं याच गोष्टीवर आम्ही बोलत होतों. पहारेनें दगड उचलणें व पाचर खोंचून ठेवून लांकूड फोडणें या गोष्टी अशाच शहाणपणाच्या आहेत, नाहीं? आणि अलीकडे लोक जीं यंत्रें उपयोगांत आणितात, त्यांतही अशाच कल्पना चालविलेल्या आहेत, नाहीं गुरुजी?

गुरुजी—हो. पण यंत्रांत यापेक्षां बऱ्याच अधिक कल्पना चालवून मनुष्याचे पुष्कळ श्रम वांचविले असतात. बाकी ज्या योगानें आपले थोडे तरी श्रम वांचतात, त्या सर्व कल्पनांस यंत्र म्हणावयास हरकत नाहीं. तर मग आज यंत्रशास्त्राच्या मूळ कल्पनांपैकीं चार कल्पना तुम्हांला माहीत झाल्याः—

१ तरफ, २ पाचर, ३ तराजू, ४ चाक.

बाळ म्हणाला—खरोखर गुरुजी, शिक्षण घेणें व ज्ञान संपादन करणें ही किती उत्तम गोष्ट आहे! यांत किती मौज आहे! आणि यापासून व्यवहारांत प्रत्यक्ष फायदा तरी किती होतो! आतां मला असें वाटतें कीं, सारखें शिकतच रहावें!

गुरुजीः—अगदीं बरोबर. भगवद्गीतेंत सुद्धां हेंच सांगितलें आहे—

न हि ज्ञानेन सदृशं पवित्रं इह विद्यते ॥

# ३६ अदमी नव्हे, सैतान !

दुसरे दिवशीं नित्याप्रमाणें ओवरींत आल्यानंतर हरीनें बाळास एक प्रश्न केला कीं–" खरा सुखी कोण ? " बाळ ह्मणाला, " अगदीं खरोखर सुखी म्हणजे राजा; राजाइतका सुखी दुसरा कोण असणार ? "

त्यावर हरी म्हणाला:—मला तर वाटतें कीं, राजाला मुळींसुद्धां सुख नसतें. आपले शिवाजीमहाराज तुला ठाऊक आहेत का ? त्यांच्या गोष्टी तूं वाच, म्हणजे तुला समजेल कीं, राजाला काय सुख असतें ? काल मीं शिवाजीमहाराजांची बखर थोडीशी वाचली, तेव्हां मला तर असें वाटलें कीं, राजा व्हावयाचें, म्हणजे मृत्यु, संकटें व हाल यांच्या अगदीं महासमुद्रांत उडी घ्यावयाची !

बाळ:—तूं त्या बखरींत शिवाजीमहाराजांची काय गोष्ट वाचलीस ?

हरी:—दिल्लीहून औरंगजेबाचा एक मोठा सरदार एकदां शिवाजी-महाराजांवर चाल करून आला. तेव्हां महाराजांनीं त्याचें जें शासन केलें त्याची गोष्ट मीं काल वाचली. सांगूं तुला ती गोष्ट !

बाळानें हो म्हणतांच हरीनें सांगण्यास आरंभ केला.

× × × × ×

शिवाजी महाराजांनीं राजगड, तोरणा, पुरंदर वगैरे किल्ले घेऊन मराठ्यांच्या राज्याची स्थापना करावयास सुरवात केली होती. विजापूरकरांनीं त्याचें पारिपत्य करण्यासाठीं अफझुलखाननामक एक मोठा सरदार प्रचंड सैन्यानिशीं शिवाजीमहाराजांवर पाठविला होता, त्यालाही त्यांनीं ठार करून त्याच्या सर्व सैन्याचा पुरा मोड केला. तेव्हां दिल्लीचा बादशहा औरंगजेब यास तें वृत्त कळतांच त्याला मोठी काळजी लागली. मग शिवाजीवर चाल करून जाऊन त्यास ठार करण्याकरितां किंवा त्यास धरून आणण्याकरितां कोण तयार आहे, ह्मणून त्यानें आपल्या दरबारांत

बिचारलें व पैजेचा बिडा पुढें टाकला. पण शिवाजी—

बाळ मध्येंच म्हणाला—पैजेचा बिडा टाकला म्हणजे रे काय हरी?

हरीः—पूर्वी अशी एक पद्धति होती कीं, शत्रूचा मोड करून त्यास ठार करण्यासाठीं किंवा त्यास जिवंत धरून आणण्यासाठीं जो कोणी सरदार तयार होईल, त्यानें दरबारांत बादशहाच्या सिंहासनापुढें जाऊन तशी प्रतिज्ञा करावयाची व सर्वांच्या समक्ष बादशहानें पुढें ठेवलेला एक मानाचा बिडा उचलून घ्यावयाचा. असा बिडा उचलून घेतल्यानंतर काम फत्ते न करतां परत येण्यांत त्या सरदाराची अप्रतिष्ठा असे. त्यामुळें तो सरदार आपलें काम साधण्यांत मग आपल्या जिवाचीही परवा करीत नसे.

बाळः—मग तो पैजेचा बिडा कोणीं उचलला?

हरीः—तेंच सांगतों. तो बिडा उचलण्यास प्रथम कोणीच तयार होईना. कारण अफझुलखानासारख्या जाड्या सरदाराचा शिवाजीनें वध केल्यापासून सर्व दरबारांत त्याचा धाक वाटूं लागला होता. पण मग कोणीच उठत नाहींसें झाल्यामुळें दिल्लीसारख्या सार्वभौम बादशहाच्या तक्ताची किंमत नाहींशी होणार असें पाहून शाहिस्तेखान नामक एक सरदार पुढें झाला आणि म्हणालाः—" खावंद, शिवाजी म्हणजे काय? मी त्याला तावडतोब कैद करतों; व त्याचे सर्व किल्ले सर करून, त्यास बांधून हुजुरास हजर करतों!" आणि असें म्हणून त्यानें तो बिडा उचलला! तेव्हां बादशहास मोठा आनंद वाटला. तो म्हणाला—शाबास! शाहिस्तेखान, तुम्ही आमची अब्रू राखलीत! शिवाजीला पकडून आणावें, नाहींतर गर्दीस मिळवावें." असें म्हणून त्यानें त्याजबरोबर एक प्रचंड सैन्य दिलें. एक लाख घोडेस्वार, पांचशें हत्ती, शंभर उंट, मोठा बिस्तृत तोफखाना आणि सर्व तऱ्हेचें सामान भरलेल्या कित्येक गाड्या, व पायदळ तर अत्यंत मोठें असें बरोबर दिलें. औरंगजेबाची म्हणे रावणासारखी संपत्ति. त्यानें सोनें, रुपें, मोहरा, होन व रुपये असें एकंदर ३२ कोटी द्रव्य कित्येक गाड्या भरून

त्याजबरोबर दिलें. आणि पोशाख व अलंकार देऊन मोठ्या समारंभानें त्यास शिवाजीवर रवाना केलें. ती सर्व फौज एवढी मोठी होती कीं, तिनें ठाणें दिलें म्हणजे दोन दोन कोस मुलुख आडून जाई! अशा त्या प्रचंड सैनेसह दिल्लीहून निघून दरकूच दरमजल करीत करीत तीन महिन्यांनीं शाहिस्तेखान पुण्यास येऊन पोंचला.

बाळ म्हणाला:—केवढी मजा! एवढी मोठी संपत्ति व इतकें मोठें सैन्य बरोबर; आणि बादशाहानें दिलेला पोषाक व अलंकार! मग त्या सरदारास काय आनंद व सुख वाटलें असेल! माझ्याजवळ जर एवढी सेना व एवढी संपत्ति दिली, तर मग मी काय—

हरी:—काय, शिवाजीमहाराजांचा पराभव करशील?

बाळ:—हो! शिवाजीचा काय, वाटेल त्याचा पराभव करीन! कारण मग मला काय कमी आहे? राजाच मी!

हरी:—उजेड पडला राजाचा! नुसता पोषाख व अलंकार घालून तूं राजा होणार. तूं पराभव कशाचा करणार? तूं लढाई तरी कधीं पाहिली आहेस काय?

बाळ:—मीं कशाला लढाई पाहावयाला पाहिजे? मी सैन्याला हुकूम करीन! मग एक लाख घोडा चाल करून गेल्यावर शिवाजी कोठें पळेल? मग त्याला पकडून आणायला मला कठीण काय?

हरी:—वाहवा! हाच का तूं राजा? मग तूं राजा त्या सैन्याचा नव्हेस! फक्त रेशमी कोटाचा व गळ्यांतल्या अलंकारांचा राजा तूं! मग तूं घरच्या शिवाजीला! सैन्य आपलेंच आपण पाहिल्याबरोबर कोठल्या कोठें दडून बसशील झालें! पुढें एवढ्या प्रचंड सैन्यानिशीं आलेल्या त्या सरदाराची शिवाजीच्या हजार दोन हजार लोकांनीं कशी दाणादाण उडवून दिली ती ऐक तर! म्हणजे तूं म्हणशील कीं, नको रे बाबा राजा व्हायला, व नको तें शिवाजीवर चालून जायला!

बाळः—काय, त्या सरदाराचा शिवाजीनें पराभव केला ?

हरीः—हो ! ऐक कसा तो. तो सरदार आपणावर चालून येत आहे असें वर्तमान इकडे शिवाजीमहाराजांस कळतांच आपल्या मातोश्री जिजाबाई यांचा त्यांनीं सल्ला विचारला; व बरोबरच्या सरदारमंडळींत बसून त्याचा विचार सुरू केला. त्या सरदाराची फौज लाखाची; बरोबर तोफखाना, घोडेदळ, पायदळ आणि कोट्यवधि रुपयांचा खजिना ! अशा सरदारापुढें आपला काय पाड, असें प्रथम सर्वांना वाटलें. परंतु शरण तर जावयाचें नाहीं हा महाराजांचा निश्चय; आणि लांचलुचपत दाखविण्याला त्यांना सामर्थ्य कोठून असणार ? तेव्हां त्यांचा व त्यांच्या बरोबरीच्या सर्व लोकांचा निश्चय झाला कीं, धैर्य धरून तोंड द्यावयाचें; मग काय होईल तें होवो ! मग त्यांनीं ताबडतोब आपली सर्व जमवाजमव केली. आपले जवळचे निवडक एक हजार लोक घेतले; आणि खानाचा जेथें तळ पडला होता तिकडे ती आपली एवढीशी फौज घेऊन ते निघाले.

बाळ म्हणालाः—एक हजार लोक बरोबर घेऊन शिवाजीमहाराज एक लाख सैन्यावर हल्ला करावयास निघाले ! मग तो शिवाजी अगदींच अडाणी असला पाहिजे. मग त्याचा पराभव त्या खानानें सहज केला असेल ! त्यानें दोन लाख सैन्य कां बरोबर घेतलें नाहीं ?

हरीः—अरे, एकच हजार लोक, पण ते होते कसे ? सारे महाराजांसाठीं प्राण द्यायला अगदीं एका पायावर तयार ! सारे अगदीं कणखर व काटक. चैन व नाजुकपणा यांचा लेश त्यांचे ठिकाणीं नव्हता. संकटांची परवा नाहीं, श्रमाची खातर नाहीं; आणि युद्धांत वार लागणें हें ज्यांना भूषण वाटावयाचें, असे जिवास जीव देणारे मावळे लोक ही शिवाजीची सेना. मोंगलांच्या रोजच्या त्रासानें सदोदित स्वसंरक्षणासाठीं ज्यांना डोळ्यांत तेल घालून बसावें लागे ते मराठे वीर ते. हा राजा, हा सरदार व हा एक साधा शिपाई असा त्यांच्यांत भेद नव्हता. सर्व सारखे ! उन्हातान्हांतून व

रानावनांतून सगळे बरोबर चालावयाचे. कधीं खायला मिळावें, कधीं नाहीं; व मिळालें तरी काय, तिखट आणि भाकरी. रात्रीच्या वेळीं कोठेंही माळा-वर घटका दोन घटका पडून झोप घेतली कीं, लागलीच उठून चालले पुढें मजला मारीत! असे हाल काढणारे व जीविताची पर्वा न बाळगणारे लोक एक हजारच, पण ते लाखांना भारी असतात! खानाचे लोक सारे पगाराच्या आशेनें कामें करणारे; मिजासींत वाढलेले; तंबू, डेरे, राहुट्या नेहमीं बरोबर; आणि दारू पिऊन सदोदित धुंद राह-णारे! मोठें अवसान आणून पुढें सरतील, पण प्रत्यक्ष सामना द्यावयाचा प्रसंग त्यांना नको असावयाचा. एखाद्या ठिकाणीं लष्कराची दोनदोन तीनतीन महिने छावणी पडली म्हणजे यांचें फावलें. मग दारूच्या निशेंत व नाचतमाशांच्या गर्दींत सारी सेना दंग व्हावयाची. त्यामुळें अशल्या विलासी व ऐषआरामी लोकांवर काटक व हालअपेष्टा सहन करणाऱ्या लोकांचा जय व्हावा हें अगदीं साहाजिकच आहे. तेव्हां मघाशीं सांगितल्या-प्रमाणें एक हजार निवडक लोक स्वतःच्या बरोबर घेऊन व आणखी एकेक हजाराच्या दोन तुकड्या नेताजी पालकर व मोरोपंत पिंगळे यांजबरोबर देऊन व बापूजीपंत देशपांडे खेडकर यांचे बाळाजी व चिमणाजी हे दोघे मुलगे आपले जिवलग व चांगले हुषार म्हणून बरोबर घेऊन शिवाजी-महाराज रात्र झाल्यावर रायगडाहून निघाले आणि रात्रीं बाराच्या सुमारास पुण्यास येऊन पोंचले. खानाचे लोक जागजागीं ठेवलेले होतेच. त्यांनीं विचारलें 'हे कोणाचे लोक आहेत! कोठें चालले आहेत?' तेव्हां त्यांस अघाडीस असलेल्या बाळाजी व चिमणाजी देशपांडे यांनीं सांगितलें कीं, "लोक खानाचे आहेत. चौकी पहाऱ्यावर गेलों होतों. आतां पाळी बदल-ल्यामुळें परत चाललों आहोंत." असें करून सर्व मंडळींसह शिवाजी-महाराज पुण्यास येऊन पोंचले. पण आतां शहरांत प्रवेश कसा करावा, असा मोठा प्रश्न येऊन पडला. अशा वेळीं आगाऊ ठरल्याप्रमाणें शहरांतून

एक लग्नाची वरात बाहेर देवीस आली; तिजबरोबर शिवाजीमहाराज व त्यांचे अगदीं जिवश्च कंठश्च स्नेही अशीं सुमारें २५ माणसें वेष पालटून शहरांत शिरलीं. तो मध्यरात्रीचा सुमार; शहरांत सर्वत्र सामसूम झालेलें. खानाचे लोक निर्धास्तपणें झोंपीं गेले होते. त्यांना वाटलें–" शिवाजी कोण्या झाडाचा पाला ! तो एवढें प्रचंड सैन्य चालून येत असलेलें कळतांच घाबरून मरून गेला असेल ! त्याच्या संबंधांत पाहारा काय करावयाचा आहे ? " त्यामुळें शाहिस्तेखान हा जेथें उतरला होता तेथवर श्रीशिवाजीमहाराज व त्यांचे बरोबरची २५ माणसांची टोळी खुशाल येऊन पोंचली. मग देवडीवाले बेसावध पाहून महाराज आंत शिरले व खान जेथें झोंपीं गेला होता तेथें आले. तों वाड्यांत सर्वत्र गलबला झाला कीं, शत्रूचे लोक आंत शिरले ! त्याबरोबर खान घाबरला व उठून पळत बायकामंडळींत शिरून लपून बसला ! शिवाजीमहाराज व त्यांचे लोक बायकांवर कधीं हत्यार धरीत नाहींत असें त्यानें ऐकिलें होतें. म्हणून त्यानें जीव बचावण्याची ही एक युक्ति केली. परंतु त्या गर्दींतही खानाच्या दिवाणखान्यांत तेवत असलेल्या समयांच्या उजेडांतून खानाला बायकांत घुसतांना शिवाजीमहाराजांनीं पाहिला व लागलीच त्याची पाठ घेऊन त्यावर तरवारीचा वार केला. पण तितक्यांत पलीकडील खिडकींतून खानानें उडी घेतली व वार त्याच्या बोटांवर ओझरता बसून बोटें तेवढीं तुटलीं व स्वारी निसटली. इतक्यांत खानाचे पाहाऱ्यावरचे लोक सर्व आपआपल्या तरवारी वगैरे घेऊन इकडे धावून आले व ' गनीम कोठें आहे ' म्हणून शोधूं लागले. त्याबरोबर शिवाजीच्या सर्व मंडळींनेंही गनीम कोठें आहे म्हणून तपास करीत असल्याचा बहाणा केला ! आणि गर्दींत मिसळून शहराबाहेर त्यांचें ठाणे होतें तेथें ते सर्व सुखरूप आले व परत लगेच राजगडाकडे चालले. खानाचे लोक आपल्या पाठलागास येतील तर त्यांना चकविण्यासाठीं, आगाऊ ठरल्याप्रमाणें, कात्रजच्या रस्त्यावरील लोकांनीं जागजागीं आपले पोत पेटवावे म्हणून

खुणेचा करणा वाजविला. त्याबरोबर त्या रस्त्यावर पोत पेटले ! ते पाहून त्या रस्त्यानें गनीम गेला असें समजून तिकडे खानाचे लोक धावले व शिवाजीमहाराज सकाळपर्यंत खुशाल राजगडास जाऊन पोंचले.

बाळ म्हणाला:—शाबास ! काय तरी शिवाजीचें चातुर्य ! पण हरी, त्या रात्रीं शिवाजीनें झोंप कोठें घेतली ?

हरी:—तेंच तूं आतां पहा, कीं शिवाजी हा स्वतः राजा; पण त्याला वेळेला जेवण नाहीं कीं झोंप मिळाली नाहीं ! इतके हाल त्यांनीं सोसले, म्हणून त्यांना स्वराज्य स्थापितां आलें. पण 'मी राजा' म्हणून जर ते चैनींत व विलासांत निमग्न झाले असते, तर राज्य राहोच, पण नुसती शिपाईगिरी तरी त्यांना साधली असती का ?

बाळ:—छे बोवा ! असल्या शिवाजीला जिंकायचें म्हणजे अशक्यच ! पण हरी, खानाच्या लोकांनीं दिवस उगवल्यावर सिंहगडावर जाऊन सहज त्यास पकडलें असेल ! दिवसा शिवाजी कोठें व किती लपणार ?

हरी:—अरे, सिंहगड किल्ल्यावर पोंचल्यावर तर शिवाजी कोणाच्याच हातीं लागणें शक्य नव्हतें. शिवाजी अशा डोंगरी किल्ल्यांत रहात असल्यामुळें व त्या भागांतील लहान सहान सर्व वाटा व किल्ल्याखालचीं भुयारें हीं सर्व शिवाजीच्या लोकांच्या माहितींत असल्यामुळें शिवाजी या किल्ल्यावरून त्या किल्ल्यावर कसाही निसटून जाई. त्याला "सह्याद्रींतला उंदीर" असें म्हणत असत ! याप्रमाणें शिवाजीनें खानाचें पारिपत्य केल्यानंतर खानानें लागलीच शिवाजीला पकडण्याचा आपला विचार आपल्या सामर्थ्याबाहेर आहे हें ओळखलें. तो म्हणाला—"गनीम माझ्या खास दिवाणखान्यांत येईपर्यंत एकाही सैनिकाला हें कळूं नये हें केवढें नवल आहे ! यावरून आपल्या एवढ्या मोठ्या प्रचंड सेनेंत आपल्या कामावर सावध राहणारा माणूस कोणीच नाहीं म्हणावयाचा ! सारे लोक निमकाला हराम ! आतां कशाचा भरंवसा धरावा ! आज शिवाजीनें बोटें

तोडलीं; उद्यां येऊन डोकें कापून जाईल! शिवाजी अदमी नाहीं; बडा सैतान आहे! त्यानें मोठाच दगा दिला आणि पुन्हाही वारंवार तो दगा देईल." आणि असा विचार करून त्यानें आपल्या सैन्यास परत दिल्लीस कूच करण्याचा हुकूम दिला!

बाळ म्हणालाः—हरी, एवढा मोठा सरदार, एवढें मोठें सैन्य, एवढा मोठा तोफखाना व एवढी मोठी संपत्ति, इतकें असून शिवाजीनें त्याला भिववून परत पळवून लावलें, हें मोठेंच आश्चर्य आहे!

हरीः–मोठा सरदार कशानें? उंची व भव्य पोशाखानें आणि सोन्याच्या अलंकारांनीं? मोठें सैन्य कशानें? बाजारबुणग्यांच्या खोगीरभरतीनें? दारू आणि नाच-तमाशे यांत रातभर रंगून जाण्यानें? मोठा तोफखाना कशानें? त्याला वाहावयास लावलेल्या हत्तींच्या व उंटांच्या योगानें? आणि मोठी संपत्ति कशानें? रुपये व होन यांनीं? जीवावरच्या प्रसंगांत शिरून आपल्या राजाचें नांव राखील तो मोठा सरदार; हालअपेष्टा सहन करून शत्रूवर वाघासारखे तुटून पडणारे स्वामिनिष्ठ लोक तेंच मोठें सैन्य; शत्रूच्या गोटांत शिरून त्याची बित्तंबातमी बरोबर काढून आणून देणारे हेर हाच शत्रूचा अभेद्य तट फोडणारा तोफखाना! व हातीं शिर घेऊन रणांगणांत वीरश्रीनें घुसावयाची शूर वृत्ति हीच मोठी संपत्ति होय!

बाळः—हरी, मला आतां असें वाटतें कीं, आपण शिवाजीच्या सैन्यांत जावें आणि अगदीं मोठा पराक्रम करावा! त्यांत प्राण गेला तरी बेहेत्तर!

हरीः—पण तूं मोठा पराक्रम करणार कोणचा! का, प्राण घालविणें हाच मोठा पराक्रम?

बाळः—नाहीं! मी मोठी लढाई करीन! आणि शत्रूच्या लोकांना भराभर जमिनीवर पाडीन!

हरीः—पण तुला तरवार धरतां येते काय? घोड्यावर बसतां येतें काय? शिळ्या भाकरीवर किंवा नुसत्या हुरड्यावर राहतां येतें काय?

आळावर झोंप घेतां येते काय ? शत्रु मागें लागला तर क्षणांत कोठच्या-कोठें पळून पसार होतां येतें काय ? ऊन, पाऊस व थंडी सोसतां येते काय ? पोहतां येतें काय ? झाडावर चढतां येतें काय ? कड्यावर चढतां किंवा उतरतां येतें काय ? अथवा तरवार उचलून एक वार करण्यापुरती तुझ्या दंडांत ताकद तरी आहे काय ? तूं कधीं जोरजोडी करतोस ?

बाळः—एक लढाईला जावयाचें म्हणजे इतकें यावें लागतें, होय ? व शिवाजीला व त्याच्या बरोबरच्या मावळे लोकांना हें सगळें येत होतें ?

हरीः—तूं शिवाजीमहाराजांचा स्वराज्यस्थापनेचा इतिहास वाच, म्हणजे मावळे लोकांच्या अंगीं काय काय गुण होते ते तुला समजतील ! कोणती तरी एक बखर वाच, म्हणजे सुद्धां पुरे.

बाळः—मग हरी, आतां मी जोर-जोडी नेमानें करावयास लागतों. घोड्यावर बसून जाणें हें तर मला आधींच आवडतें. तर मी तें आतां शिकणारच. आणि इतर साऱ्या गोष्टी ज्या आतां तूं सांगितल्यास, त्या सर्व आतां मी करावयास लागतों. मग आपण थोड्याच दिवसांत अगदीं मोठे शूर सरदार होऊं ! आपल्या देशावर जर कोणी शत्रु चाल करून आला, तर आपण जाऊन त्यास अगदीं शिवाजीमहाराजांप्रमाणें चीत करून पिटाळून लावूं ! नाहीं का रे हरी ?

हरीः—प्रथम आपण आपली सर्व तयारी केली पाहिजे. नंतर सरकारी लष्करांत अगदीं एका साध्या शिपायाचें काम पत्करलें पाहिजे. व मग तेथें आपल्या अंगचें शौर्य व हुषारी दाखवून सरदारी मिळविली पाहिजे. पण इतकें करावयाचें तर सायंकाळीं ८ वाजल्यापासून सकाळीं ८ वाजेपर्यंत मऊ गादीवर लोळावयास मिळावयाचें नाहीं हें खूप समजा ! आणि सरदार झाल्यावर तर त्याच्याहीपेक्षां अवघड व जोखमीचीं कामें अंगावर घेतलीं पाहिजेत व जिवाची परवा सोडून तीं केलीं पाहिजेत ! मग आतां सांग बरें, राजा होणें किती सुखाचें आहे तें ?

# ३७ अग्नये स्वाहा !

बाळः—मला वाटतें, श्रीशिवाजीमहाराज व त्यांचे जवळचे मराठे लोक यांच्याइतके शूर लोक या पृथ्वीवर कोठेंही नसतील ! इतके जिवावर उदार होऊन लढणारे दुसरे कोण असणार ?

हरीः—मावळे लोक अत्यंत शूर खरे; पण रजपूत लोकही इतकेच शूर आहेत. त्यांच्याहि अद्‌भुत पराक्रमाच्या गोष्टी इतिहासांत फारच आहेत. उदेपूर, मेवाड येथील राण्यांच्या शौर्याच्या गोष्टी तर फारच विलक्षण आहेत. चितोडच्या वेढ्याची हकीगत परवां गुरुजी सांगत होते, ती तूं ऐक म्हणजे तुझी खातरी होईल. चला, आपण गुरुजींकडे जाऊं.

असें म्हणून हरी गुरुजींकडे निघाला. बाळही मागून चालला. मग गुरुजींपाशीं जाऊन त्यांनीं चितोडची हकीगत सांगा असें ह्मणतांच गुरुजी मोठ्या आनंदानें ती गोष्ट सांगूं लागले.

× × × ×

अल्लाउद्दिन खिलजी नांवाचा दिल्लीचा एक मोठा बादशहा होता. त्याच्या राज्याच्या विस्तार बराच मोठा असून त्याची संपत्तिही अगणित होती. पदरीं मोठमोठे सरदार असून वारंवार स्वाऱ्या व लढाया करून त्यानें आसपासचा पुष्कळ मुलूख जिंकून घेतला होता. परंतु शेजारींच असलेल्या राजपुतान्यांतील रजपूत लोकांना जिंकल्याशिवाय त्याच्या मनाला समाधान वाटेना. रजपूत लोकांचें राज्य स्वतंत्र राहावें, ते आपले मांडलिक म्हणून आपला अंमल मानावयास तयार असूं नयेत, हें एक त्याच्या मनाला शल्य होऊन बसलें. म्हणून त्यानें आपलें सर्व लक्ष आतां रजपूत लोकांवर स्वाऱ्या करून त्यांस आपले अंकित करून घेण्याकडे लाविलें. चितोडचा किल्ला त्यांमध्यें विशेष बलाढ्य आहे असें पाहून त्यानें आपलें प्रचंड सैन्य जमविलें आणि अकस्मात् जाऊन किल्ल्याला वेढा दिला; आणि आंत राण्यास

निरोप पाठविला कीं, 'किल्ला निमूटपणें आमचे स्वाधीन करावा आणि आमचें अंकित म्हणून कबूलपत्र पाठवावें.'

चितोडास या वेळीं लक्ष्मणसिंग म्हणून एक बालराजा गादीवर असून सर्व कारभार त्याचा चुलता भीमसिंग हा पाहात होता. अल्लाउद्दिनानें किल्याला वेढा घालून वरीलप्रमाणें निरोप पाठवितांच सर्वजण मोठ्या काळजींत पडले. अल्लाउद्दिनाची सेना प्रचंड! एवढ्या मोठ्या सेनेला चितोडसारख्या मूठभर प्रदेशांतील लोकांनीं तोंड कसें द्यावें? पण रजपूत लोकांचें शौर्य अपार! त्यास दुसरी उपमा साऱ्या जगावर कोठें सांपडावयाची नाहीं. निमूटपणें गड स्वाधीन करणें तर कालत्रयीं शक्य नव्हतें. व रजपुतासारखी जात, जी वीर्यशौर्याची खाण, ती आपली स्वतंत्रता गमावून मोगलांची अंकित होऊन राहण्याची गोष्ट तरी सुखासुखी पतकरील ही कल्पनाच व्यर्थ होती. किल्ला फार दिवस लढवितां येणें शक्य नाहीं, हें तर सर्वांना दिसत होतें, परंतु किल्ला स्वाधीन करून अल्लाउद्दिनाचे अंकित म्हणून म्हणवून घ्यावयाचें, ही कल्पना सर्व चितोडांत एका पोरालासुद्धां पसंत नव्हती! तेव्हां सर्वांचा विचार घेऊन भीमसिंगानें अल्लाउद्दिनास निरोप पाठविला कीं, "रजपूत लोक जिवंतपणीं तर कोणाचे अंकित व्हावयाचे नाहींत!"

निरोप पोंचतांच अल्लाउद्दिनास खूप क्रोध आला! मग त्यानें वेढ्याचें काम अगदीं जारीनें चालू ठेवून रजपुतांचा अभिमान उतरावयाची प्रतिज्ञाच केली! नंतर किल्ल्याच्या सर्वांगास फिरून, जागजागीं सुरुंग लावून किल्ल्याचा तट ढासळण्याचा प्रयत्न त्यानें जोरानें चालविला. परंतु किल्ला फार उंच व अगदीं डोंगराच्या कड्यावर बांधला असल्यामुळें त्यांत त्यास फारसें यश आलें नाहीं. तेव्हां असा नुसता वेढा देऊन किती दिवस स्वस्थ बसावें, म्हणून तो मोठ्या विचारांत पडला. नंतर त्यानें पुनः किल्ल्यांत निरोप पाठविला कीं, "भीमसिंगाची राणी पद्मिनी हिला तेवढी मजकडे पाठवा; म्हणजे मी वेढा उठवून चालता होतों."

परंतु त्याची हीहि आशा व्यर्थ होती. पद्मिनी भीमसिंगाची राणी, ही सर्व राजपुतान्यांत अत्यंत सुंदर म्हणून प्रख्यात होती. तेव्हां चितोडवर हल्ला करण्यांत, तिला हस्तगत करावें हा एक अल्लाउद्दिनाचा दुष्ट हेतु होताच. तेव्हां त्यानें तूर्त चितोड राहो, पण पद्मिनी तरी हस्तगत व्हावी म्हणून हा प्रयत्न चालविला. पण आतां हा प्रश्न तर त्या रणधुरंधर वीरमणींच्या अब्रूचाच होता. तेव्हां असल्या प्रश्नाला साफ नाहीं असें उत्तर देण्याला त्यांनीं एका क्षणाचाही अवधि घेतला नाहीं! शत्रूचें बळ प्रचंड, किल्ला फार दिवस लढाविणें अशक्य, त्यामुळें अल्लाउद्दिनाच्या मागणीचा इनकार करणें म्हणजे त्याच्या रोषाला बळी पडण्याचीच तयारी करणें! परंतु रणांगण हेंच ज्यांचें घर व युद्धांतील तरवारींचे वार हेच ज्यांचे अलंकार, त्या रजपूत वीरांनीं अल्लाउद्दिनाच्या असल्या कोणत्याही मागणीस नमावयाचें नाहीं असाच पूर्ण निश्चय केला व त्यास साफ नकार तावडतोब कळविला!

पद्मिनीच्या सौंदर्याचीं वर्णनें वारंवार कानावर आल्यामुळें अल्लाउद्दिनाला पद्मिनीचा अगदीं ध्यास लागून गेला होता. तेव्हां वरील निरोप ऐकून तो काळजींत पडला. तो म्हणाला—"हे एवढेसे तर लोक, पण आज चार महिने झाले, अजून हार येत नाहींत, हें मोठें नवल आहे! तथापि चिंता नाहीं; मला नुसतें पद्मिनीचें दर्शन झालें तरी पुरे." मग 'नुसतें दर्शन मला घडवावें' म्हणून त्यानें निरोप पाठविला. तो गडावर पोंचतांच पुन: गडावर विचार सुरू झाला. मग सर्वांच्या विचारानें अल्लाउद्दिनास असा परत निरोप गेला कीं, "साक्षात् पद्मिनीचें दर्शन तुम्हांस होणें नाहीं; तथापि आरशांतून तिच्या प्रतिबिंबाचें फक्त दर्शन करवूं." मग तो निरोप ऐकून अल्लाउद्दिनानें ती गोष्ट मान्य केली. तेव्हां त्यास गडावर आणवून भीमसिंगानें आरशांतून पद्मिनीचें दर्शन करविलें. आणि त्यास परत पोंचविण्यास तो स्वतः किल्ला उतरून त्याच्या छावणीपर्यंत आला. पण भीमसिंग याप्रमाणें शिष्टाचारास अनुसरून आपल्या अगदीं गोटांत

आलेला पाहून अल्लाउद्दिनानें त्याच्याशीं कपट केलें! आपल्या लोकांकरवीं त्यास अकस्मात् पकडून कैद केलें! अट हीच कीं, " पद्मिनीस स्वाधीन कर; म्हणजे तुझी सुटका करतों ! "

याप्रमाणें भमिसिंग शत्रूच्या गोटांत जाऊन, अकस्मात् कैद होऊन पडल्याची वार्ता गडावर पोंचतांच सर्व लोक अगदीं काळजींत पडले ! आतां भीमसिंगाची सुटका करावी कशी, हा मोठा प्रश्न पडला ! पण अशा प्रकारें सर्व लोक चिंतातुर झाले असतां राणी पद्मिनी हिनें यत्किंचित् घाबरून न जातां मोठ्या शहाणपणानें एक युक्ति काढिली व ती सरदार लोकांस सांगून ती म्हणाली—शत्रूस कळवा कीं, गडाचा वेढा उठवून चालूं लागावें; पद्मिनीस आपले गोटांत पोंचवितों. मात्र राणी पद्मिनी आपल्या दर्जाप्रमाणें बरोबर आपला दासींचा लवाजमा घेऊन येईल. त्या दासींना कोणत्याही प्रकारें पीडा होऊं नये. दासींच्या ७०० पालख्या राणीच्या मेण्याबरोबर राहतील. कांहीं तेथून पुढें दिल्लीस जातील; व कांहीं गडास परत येतलि. "

मग त्याप्रमाणें गडावरील लोकांकडून अल्लाउद्दिनास निरोप कळविण्यांत आला. मग अल्लाउद्दिनाचा आनंद काय विचारावा ! पद्मिनीसारखी त्रैलोक्यसुंदरी आज आपणास मिळणार, म्हणून तो अगदीं वेडा होऊन गेला ! मग त्यानें ताबडतोब आपले लोकांस वेढा उठवून दिल्लीस कूच करावें ह्मणून हुकूम दिला व पद्मिनीची वाट पहात तो नानाप्रकारचें मनोराज्य करीत, आपल्या तंबूंत इकडून तिकडे फिरूं लागला. ठरलेली वेळ होतांच गडावरून पद्मिनीच्या दासींच्या पालख्या एकीमागून एक उतरूं लागल्या. एकेक पालखीस सहासहा भोई लावले होते. मग त्या सर्व पालख्या अल्लाउद्दिनाचे गोटापाशीं येऊन पोंचतांच ' पद्मिनीचा मेणा माझ्या तंबूंत येऊं द्या ' म्हणून त्यानें हुकूम सोडला. तेव्हां बरोबरच्या लोकांनीं विनंती केली कीं, राणा भीमसिंग मुक्त करून, त्यास पद्मिनीचा

शेवटचा निरोप घेण्यास एकवार थोडी अवधि मिळावी. मग तें अल्लाउद्दिनानें कबूल केल्याबरोबर भीमसिंग पद्मिनीच्या भेटीस आला व परत जावयाच्या पालख्यांपैकीं एकींत बसून गडाच्या पायथ्यापर्यंत गेला, व तेथें त्याचेकरितां तयार ठेवलेल्या घोड्यावरून तो किल्ल्यावर जाऊन पोंचला! पद्मिनी त्याच प्रकारें त्याजबरोबर परत निघून गेली! इकडे अर्धा तास होऊन गेला तरी भीमसिंगाची भेट संपत नाहीं, असें पाहून पद्मिनीच्या भेटीसाठीं अत्यंत आतुर झालेला अल्लाउद्दिन तंबूबाहेर येऊन ओरडून म्हणाला—" भीमसिंग! कितना देर हुवा? किदर है पद्मिनी! जलदी भेज देवो. " पण काय? पहातात तों तेथें भीमसिंग नाहीं व पद्मिनी नाहीं! सातशें पालख्यांतून एकेक हत्यारबंद रजपूत वीर उडी टाकून बाहेर पडला! व पालखी वाहणारे भोई, जे रजपूत शिपाईच होते, तेही हत्यारें घेऊन सरसावले! आणि लगेच दोन्ही पक्षांचें तुंबळ युद्ध सुरू झालें! अल्लाउद्दिनाचे लोक वेढा काढून, लढाई संपली असें समजून, रेंगाळत ढिलाईनें चालले होते. ते परत वळत तोंपर्यंत या रजपूत वीरांनीं आपल्या समशेरीनें शत्रूच्या हजारों लोकांस कंठस्नान घातलें! अल्लाउद्दिन ताबडतोब पळाला, नाहींतर तोच प्रथम ठार व्हावयाचा! मग रजपुतांनीं भयंकर रणकल्लोळ आरंभितांच अल्लाउद्दिनाचे लोक धांवून आले व त्यांनीं त्या थोड्याशा रजपूत लोकांस चारी बाजूंनीं कोंडलें. तरी ते शूर रजपूत शत्रूची फळी फोडून सारखे सेनेंत घुसत व आपले हातचे तरवारीनें मराभर त्यांचे बळी घेत! असें होतां होतां त्यांची संख्या आतां फार कमी होऊं लागली आणि उरलेले लोक सुद्धां शत्रूच्या लक्षावधि सेनेशीं झगडतां झगडतां अगदीं थकून गेले. पण शत्रूस पाठ दाखवावयाची नाहीं, शरण जावयाचें नाहीं, अंकित व्हावयाचें नाहीं, या आपल्या ब्रीदास जागून, त्यांनीं आपल्यांतला एकूणएक वीर रणांगणावर पडेपर्यंत अल्लाउद्दिनाचे लोकांस लोळविण्यास कमी केलें नाहीं! शेवटीं अल्लाउद्दिनाच्या प्रचंड सेनेपुढें

या एक हजार लोकांचें सर्व रणचातुर्य फळास न येऊन, ते सर्व शूर व स्वातंत्र्यप्रिय रजपूत वीर त्या रणधुमाळींत शिरून कोठच्या कोठें नष्ट होऊन गेले !

पण या प्रकारानें अल्लाउद्दिनाची फार निराशा झाली. पद्मिनी हातची गेली, व भीमसिंगानेंही तुरी दिल्या. आणि कल्पना नव्हती एवढा मोठा सेनेचा नाश या अवघ्या हजारभर वीरांनीं केला ! यामुळें त्यास अतिशय वाईट वाटलें. याप्रमाणें निराश होऊन तो परत वळला. पण चितोडचें राज्य स्वतंत्र राहूं द्यावयाचें नाहीं व पद्मिनीही संपादन करावयाची हा आपला दुष्ट हेतु त्यानें सोडला नाहीं. त्यानें पुनः लागलीच सैन्याची तयारी करून चितोडावर दुसरी स्वारी केली.

आतां या वेळीं मात्र चितोडकरांनीं जें अद्वितीय शौर्य व स्वातंत्र्यप्रेम दाखविलें, त्यायोगें चितोडचें नांव इतिहासांत सारखें चकाकत राहिलें आहे ! अल्लाउद्दिनाच्या स्वाधीन व्हावयाचें नाहीं, हा तर त्यांचा वज्रनिश्चय ! तेव्हां किल्ला आतां लढविणें शक्य नाहीं असें पाहिल्यानंतर सर्वांनीं जोहार करावयाचें ठरविलें व किल्याचे दरवाजे उघडून सर्वजण मोंगलांवर वाघासारखे तुटून पडले ! आणि अल्लाउद्दिनाच्या असंख्य सेनासागरांत शिरून आपल्या तरवारींनीं मोंगलांचीं डोकीं चेंडूसारखीं भराभर हवेंत भिरकावून देत देत कोठच्या कोठें पार झाले ! त्यांनीं आपलें सर्वस्व गमावलें, पण अंकित व्हावयाचें नाहीं हा निश्चय ढळूं दिला नाहीं !

बाळ म्हणालाः—केवढे तरी शूर लोक हे ! अंकित न होण्याचा यांचा केवढा तरी बाणा ! एवढा पराक्रम आम्हांला करतां येईल का हो ?

गुरुजीः—ज्या तऱ्हेचें डोळ्यांपुढें उदाहरण असतें, तसा मनुष्य बनतो. आपणही अशा लोकांचीं उदाहरणें डोळ्यांपुढें ठेविलीं, त्यांचे इतिहास वाचले, त्यांचे चरित्रांचा अभ्यास केला, तर आपणांलाही त्यांच्याइतकी स्वातंत्र्यप्रीति उत्पन्न होईल व त्यांनीं केलेले पराक्रम आपणही करूं शकूं. पण असल्या गोष्टी जर आपण ऐकल्या नाहींत, वाचल्या नाहींत, पाहिल्या

नाहींत, तर आपण तसे बनूं अशी आशा करणें व्यर्थ आहे.

हरी म्हणालाः--पण गुरुजी, 'जोहार' करावयाचा म्हणजे काय ?

गुरुजी:--हो, तें सांगतों ऐक. रजपूत लोकांच्या पराक्रमी वृत्तीचें हें एक उत्कृष्ट द्योतक होऊन राहिलें आहे. त्या लोकांना जेव्हां एकाद्या युद्धांत शत्रूचा मोड होण्याची आशा नसे, अशा वेळीं ते सर्व जिवावर उदार होऊन शत्रूवर तुटून पडून मरत ! पण असे आपण गर्दींत शिरल्यावर शत्रूनें आपल्या पश्चात् आपला गड घेतला तर मग आपल्या स्त्रिया, मुली वगैरे त्याचे हातीं लागतील; व मग आपली अब्रू ती काय ? अशा विचारानें ते अशा निर्वाणीच्या युद्धास बाहेर निघते वेळीं स्वतःच आपण आपल्या सर्व स्त्रिया व मुली वगैरे यांस एका मोठ्या चितेवर रचून त्यांस अग्नि लावीत व मग आपण 'जय हर' म्हणून बेहोषपणें शत्रूवर एकदम तुटून पडत ! त्या वेळच्या त्यांच्या 'जय हर' या संकेत शब्दांवरून त्या प्रकारास 'जोहार' असें नांव पडलें आहे.

हरी:--मग चितोडचे लोक असा जोहार करून जेव्हां अल्लाउद्दिनावर तुटून पडले, तेव्हां पद्मिनी त्यास मिळाली नाहींच म्हणावयाची !

गुरुजी:--अर्थात् नाहीं ! अल्लाउद्दिन गडावर जाऊन पाहातो तों त्या मोठ्या चितेंत हजारों स्त्रिया व मुली 'अग्नये स्वाहा' झाल्या, तींतून क्वचित् कोठें कोठें धूर निघत आहे असें त्यास आढळलें. या वेळीं पद्मिनीचा या प्रकारें शेवट झालेला पाहून अल्लाउद्दिन फार हळहळला !

बाळ:-अल्लाउद्दिन तर मग फारच दुष्ट होता ! तो प्रथम पद्मिनीला पहावयास गडावर आल्यावर, भीमसिंगानें तेथेंच त्यास ठार कां केला नाहीं ? मीं तर त्यास तेथून जिवंत जाऊंच दिलें नसतें !

हरी:--बाळ, खऱ्या शूर पुरुषाला कपटानें वागावयाची मुळीं गरजच काय ? रजपूत लोक हे खरे शूर; ते असलें क्षुद्र काम कशाला करतील ? व यांतच त्यांचा फार थोरपणा आहे !

# ३८ गोकुळअष्टमी.

याप्रमाणें गोविंदशास्त्री आपल्या विद्यार्थ्याचें शीलसंवर्धन मनोरंजक गोष्टींच्या, उपदेशाच्या व स्वतःच्या आचरणाच्या योगानें अत्यंत काळजी-पूर्वक करीत असतां श्रावणाचा महिना सुरू झाला आणि श्रीकृष्णजन्माचे दिवस येऊन ठेपले. तोंच वर्तमान आलें कीं, "यंदां तात्यासाहेब देशपांडे जहागीरदार यांच्या येथें गोकुळअष्टमीचा उत्सव मोठ्या थाटानें व्हावयाचा आहे! यंदां ते शहरांत येऊन राहिले असल्यामुळें शहरांतील त्यांची कित्येक थोर थोर श्रीमंत स्नेही मंडळी उत्सवास यावयाची असून, परगांवच्याही त्यांच्या आप्तेष्ट मंडळींना चार दिवस श्रीकृष्णचिंतनांत घालविण्याकरितां, किंवा श्रीकृष्णाच्या निमित्तानें चैनींत व आनंदांत घालविण्याकरितां आमंत्रणें आतां रवाना होऊं लागलीं आहेत!" तेव्हां या उत्सवाच्या गर्दींत आतां परत बाळ जाऊन मिसळला म्हणजे आतांपर्यंत त्याच्या मनावर ज्या निरनिराळ्या गोष्टी, वारंवार, हरतऱ्हा करून बिंबविण्याचा आपण प्रयत्न केला, त्या कितपत टिकतील, असा गोविंदशास्त्र्यांच्या मनास संशय वाटूं लागला. किंबहुना, या उत्सवाच्या जोराच्या पावसानें हें नवें बीजारोपण खळखळून वाहून जाऊन, परत पूर्वीची श्रीमंतींत व लाडांत रुजलेली व वाढलेली वृत्ति कोठें अंशतः राहिली असेल तिला पुनः अंकुर यावयाचा, असेंही त्यांस भय वाटूं लागलें. तोंच तात्यासाहेबांचा निरोप आला—'उत्सवासाठीं आठ दिवस चिरंजीव बाळ यास व त्याबरोबरच त्याचा मित्र हरी कुलकर्णी यासही अवश्य पाठवावें.' अशी विनंतिपत्रिका तात्यासाहेबांनीं स्वहस्तें लिहिलेली दिवाणजींनीं त्यांच्या हातीं आणून दिली. चिठी पोंचतांच गोविंदशास्त्री यांनीं हरी व बाळ यांना बागेंतून बोलावून आणिलें; आणि गोकुळअष्टमीच्या उत्सवासाठीं तुम्हांला घेऊन जाण्याकरितां तात्यासाहेबांचा टांगा आला आहे, म्हणून त्यांस

कळविलें. त्याबरोबर बाळाची चर्या आनंदानें अगदीं खुलून गेली. कोठें आहे तांगा, म्हणून पाहण्याकरितां तो धांवतच दाराशीं गेला; व मग थोड्या वेळानें परत येऊन, गुरुजी काय म्हणतात तें ऐकावयासाठीं मोठ्या आतुरतेनें समोर उभा राहिला !

हरी म्हणालाः-गुरुजी, मी कशाला बरोबर ? मला नाहीं तेथें करमायचें. पूर्वी मी तेथें एक दिवस गेलों होतों, तर मला तेथून केव्हां घरीं येईन असें झालें होतें !

गुरुजीः—पण आपला बाळ तेथें असणार, त्याच्याबरोबर तूं असलास तर त्यालाही बरें वाटेल. शिवाय तुला तेथील श्रीमंती थाटाशीं काय करावयाचें आहे ? तेथें कीर्तनें, पुराणें चालतील; भजनपूजन चालेल. त्यांत तुझी पुष्कळ करमणूक होईलच.

यानंतर हरीला नाहीं ह्मणावयाला फारसें सयुक्तिक कारण सांपडलें नाहीं. श्रीकृष्णउत्सवाचें आमंत्रण; शिवाय बाळाशीं आपली इतके दिवसांची गट्टी. या दोन विचारांमुळें तो त्याबरोबर जाण्यास तयार झाला व गुरुजींनीं त्यांस निरोप दिला. आपण शिकविलेल्या गोष्टी कितपत दृढ झाल्या, हें समजून येण्याला हा प्रसंग बरा आहे, असा विचार करून त्यांनीं त्यांस १०-१५ दिवसांची पूर्णपणें रजा दिली. गेले ८-१० महिने हे दोघे विद्यार्थी सारखे त्यांजवळ असत; व त्यांच्याकडे त्यांचें विशेष लक्ष असे. ते आतां १५ दिवस त्यांना भेटणार नव्हते. त्यामुळें निरोप देतांना त्यांना बरेंच अवघडल्यासारखें वाटलें. हरीनेंही निरोप घेतांना फारसा आनंद दाखविला नाहीं. पण बाळाचें लक्ष आतां सारें घराकडे वेधलें. 'आतां आपण थोडे दिवस तरी येथून सुटलों; आतां आई अगदीं दाराशीं वाट पाहात बसली असेल व घरीं जातांच आपले केवढे लाड करील !' या विचारांत त्याचें मन गुंग झालें होतें. तोंच तांगा दाराशीं येऊन ठेपला.

तांग्यांतून उतरून बाळ घरीं येतांच राधाबाईचा आनंद काय विचारावा?

रोज सारा दिवस पोर त्या गोविंदशास्त्र्याच्या घरीं किंवा त्या देवालयांत गुंतून राहावयाचें, तें तूर्त टळलें, म्हणून त्यांना फार संतोष वाटला. मुलगा दृष्टीस पडतांच त्यांनीं त्यास उचलून एकदम कडेवर घेतलें; व एकदां, दोनदां, तीनदां त्याचें चुंबन घेतलें. मग त्यांनीं माणसास सांगून लागलीच घरांतील नवा पोषाख काढून त्यास घालावयास दिला व आतां त्या नव्या पोषाखांत बाळाची स्वारी मिरवूं लागली! तात्यासाहेबांचा एकुलता एक मुलगा, जहागिरी मोठी, घरीं पैसा पुष्कळ; तेव्हां उत्सवासाठीं आलेल्या गांवांतील सर्व स्त्रीजनांचा व परगांवाहून आलेल्या आप्तजनांचाहि बाळ हा अत्यंत कौतुकाचा विषय होऊन राहिला. कोणी त्याचें चुंबन घेई; कोणी जवळ येऊन कौतुकानें एकादा प्रश्न विचारीत पाठीवरून हात फिरवी; कोणी उगीचच शाबासकी देई. कोणी कांहीं खाऊ देई; कोणी पेढ्याचा एक मोठा पुडा त्याच्या हातावर आणून ठेवी. घरांतील चाकरमाणसें वारंवार पुढें येऊन मुजरे करीत; "बाळासाहेब, फिरावयास येतां का? टांगा जोडलेला आहे!" म्हणून कोणी विचारीत; कोणी जवळ जाऊन बाळासाहेबांच्या पायांतील बूट-विजार हातानें झाडून साफ करीत; कोणी त्यास घेऊन वाड्यांतल्या वाड्यांत इकडे तिकडे फिरवीत; कोणी एक सुरेखसें फूल आणून त्याच्या हातीं देई; कोणी एकादा फुलांचा गुच्छ करून तो त्याचे टोपीवर बसवी. अशा प्रकारें श्रीमंतांच्या घरीं तूर्त चिरंजीव बाळासाहेब हेच सर्वांच्या आराधनेचा विषय होऊन बसले. राधाबाई व त्यांच्या मैत्रिणी बसल्या म्हणजे बोलावयाला मुख्य विषय बाळ. एकजणीनें म्हणावें, "बाळ पण अगदीं कसा शोभतो राधाबाई! टोपी, कोट व विजार घालून जोत्यावर उभा असला म्हणजे अगदीं राजबिंडाच वाटतो!" दुसरीनें म्हणावें—"मी तर बाई, आधीं त्याला उचलून कडेवर घेऊन पांचचार मुके घेतें आणि मगच आंत येतें!" तिसरीनें म्हणावें—"बाळ पण किती गोरें पान आहे! आणि डोळे तर कसे

अगदीं कसे–" चवथी म्हणे, " राधाकाकू, दृष्ट लागेल हो याला ! आतां रोज याची दृष्ट काढीत जा बरें ! " आणि पांचवी तर लागलीच त्याला हातायीं धरून सर्वजणींपुढें घेऊन येई, व ' उठा ग, कोणी तरी याची दृष्ट काढा ! ' असें म्हणून स्वतः त्याजकडे पाहातच राही ! हे सर्व प्रकार राधाबाईच्या आनंदाला अगदीं पूर आणून सोडीत; व बाळहि त्यायोगें आपण कोणी मोठे थोर आहोंत अशा कल्पनेनें भरून जाई ! उत्सवाचे सर्व दिवस प्रायः असाच प्रकार चालला.

पण या सर्व गर्दीत बिचाऱ्या हरीची वाट काय ?

बाळाचा सोबती हरी, हा पुष्कळ वेळ त्याच्याबरोबर असे. पण त्याचा पोषाख अर्थात् बाळाच्या मानानें फारच भिकार. एक टोपी, एक सदरा आणि एक नेसतें धोतर. त्यामुळें हा बाळाच्या बरोबरीचा नसून, बाळाच्या बरोबर कसा असतो, व बाळही त्यास बरोबर कां फिरूं देतो, असें पुष्कळ माणसांना वाटे. एकदां बायकांत हा प्रश्न निघाला. तेव्हां एकजणीनें सांगितलें—" अहो, ते गोविंदशास्त्री आहेत ना ? त्यांच्याकडे बाळ शिकायला असतो; आणि हरीहि म्हणे तेथें असतो. तो त्यांनीं याच्याबरोबर पाठवून दिला आहे. गरीबाचा पोर. दोन दिवस जेवेल, खाईल; कांहीं मजा पाहील, झालें. नाहींतर त्याला असले उत्सव कोठले पाहायला मिळणार ! "

तेव्हां दुसरी एक बाई म्हणाली—" पण तो बाई दिसतो कसा राठ ? ब्राह्मणाचा आहे असें कांहीं कोणी म्हणणार नाहीं ! "

राधाबाई म्हणाल्या–" अहो तो कसला ब्राह्मण ! तो व त्याचे आईबाप सारे स्वतः खपून शेतकी करतात ! "

त्यावर तिसरी एक बाई म्हणाली— मग राधाकाकू, त्याला तुमच्या बाळाच्या संगतीला हो कशाला ठेवला आहे ? त्यामुळें त्याला नकळत तसल्याच भिकार चाली लागतील. तुम्हांला नाहीं तसें वाटत ? मी तर बाई आपल्या गोपुनानाला व वेणुताईला असली संगत अगदीं लागूं नये म्हणून

सारखी जपत असतें. काकू, आतांपासून जें वळण लागेल तेंच पुढें जन्मभर ! म्हणून आतांच जपायला हवें हो !

राधाबाई:—पण त्यास काय करणार बाई ? ते दोघे त्या गोविंदशास्त्र्याकडे शिकायला असतात ना ?

त्यांची मैत्रिण:— ते गोविंदशास्त्री चांगले शहाणे व सज्जन माणूस आहेत. पण त्यांना हा हरी इतका काय आवडतो ! त्यांना म्हणावें— ' बाळ आहे तोंवर त्या पोराला घरीं राहावयाला सांगा. बाळाचें शिक्षण संपलें म्हणजे मग त्याला घ्या जवळ व शिकवा काय हवें तें ! ' बाळाच्या संगतीला तें भिकार पोर हवें कशाला !

राधाबाई:— अहो, ते काय तें ऐकणार आहेत ? ते कांहीं पैसे घेत नाहींत; मग त्यांस आमची भीड काय वाटणार आहे ? ते रागावले तर बाळालाच पाठवूं नका म्हणतील ! ते फार उत्तम पंतोजी आहेत असें तिकडून फार वेळ सांगायचें. पण उत्तम कसले कपाळाचे ! शिकणें नव्हे, हे पोराचे हाल चालविले आहेत झालें !

याप्रमाणें स्त्रीजनांमध्यें हरीचा सत्कार चालला होता. पण या समुदायांत हरीला हरीच्या वृत्तीचा एक मुलगा मात्र आढळला. त्याचें नांव रामकृष्ण असें होतें. मुलाला शिकविण्यासंबंधांत रामकृष्णाच्या वडिलांच्या कल्पना पुष्कळच वेगळ्या तऱ्हेच्या होत्या. जोर जोडी करून, नमस्कार घालून मुलांनीं आपली शरीर-प्रकृति सुदृढ करणें ही त्यांना पहिली महत्त्वाची गोष्ट वाटे. दिवस ऐन पावसाळ्याचे असोत किंवा हिंवाळ्याचे असोत, मुलानें पहाटे ५ वाजतां उठून थंड पाण्याचें स्नान करून हजार नमस्कार घातले पाहिजेत, असा त्यांचा आग्रह; आणि अगदीं पायांनीं सुद्धां कित्येक मैलांचा प्रवास करण्यास मुलांची लहानपणापासूनच तयारी पाहिजे असें त्यांचें म्हणणें. अशा प्रकारच्या त्यांच्या विचारामुळें त्यांचा मुलगाही अर्थात् शरीरानें चांगला सुदृढ व कणखर बनला होता. आणि श्रीमंतींत व चैनींत

दिवस घालविण्याच्या प्रकाराबद्दल त्याला अर्थातच तिटकारा वाटूं लागला होता. साधेपणानें रहावें, खर्चही बेताबातानें करावा हें वळण त्यास अर्थात् घरचेंच होतें. त्याचें शिक्षणही असेंच एका गुरुजींच्याकडे झालें असून त्यांजपाशीं त्यानें मराठी व संस्कृत भाषांचें ज्ञान चांगलें मिळविलें होतें. इंग्रजीही तो कामापुरतें लिहूं वाचूं लागला होता. परंतु इंग्रजीच्या नादानें आपली स्वभाषाही आपण विसरून जावें, व सर्व विचारसुद्धां इंग्रजींत करूं लागून आपण वर्णानें नाहीं तरी निदान भाषेनें साहेब बनावें, हें त्याच्या वडिलांस अगदीं वेड्यासारखें वाटे. आणि इंग्रजांच्या चालीरीती स्वीकारून आपण आपला जुना सनातन धर्म बुडवावा, याचा त्यांना अगदीं संताप येत असे! ते म्हणत–'इंग्रजांना जर आमच्या देशांत येऊन आम्हांवर राज्य करावयाचें आहे, तर त्यांनीं आमची भाषा हवीतर शिकून घ्यावी; पण त्यासाठीं आम्हीं आपल्या भाषेचा त्याग कां करावा?' त्यामुळें सर्व व्यवहारांत भाषा शुद्ध मराठी व लिपी मोडी, क्वचित् बालबोध आपण वापरली पाहिजे, असा त्यांचा फार कटाक्ष असे.

तात्यासाहेबांच्या घरीं गोकुळाष्टमीच्या उत्सवासाठीं जमलेल्या सर्व मंडळीला जो हरी अगदीं उपेक्षणीय वाटला, तो याला आपला मित्र वाटला, व त्याला पाहून हरीही मोकळे मनानें दोन गोष्टी बोलूं लागला. या उत्सवाच्या गर्दींत जे प्रकार हरीस पाहावयास मिळत, त्यांजवर त्याचे पुष्कळ विचार चालत; आणि रामकृष्ण त्याच्याशीं बोलूं लागला म्हणजे ते सर्व तो उघड करी. त्यामुळें रामकृष्ण त्याच्यापेक्षां जरी वयानें थोडा मोठा होता, तरी आपल्या या नव्या चिमुकल्या मित्राशीं बोलतांना त्यास फार आनंद वाटूं लागला. आणि तेथें जमलेल्या सर्व मुलांमध्यें हरी अधिक चणचणित, शहाणा व भला मुलगा आहे असें त्याचें मत झालें.

---

# ३९ कथेकरी बोवा.

तात्यासाहेब इनामदारांच्या घरांतील सर्व पाहुणे मंडळींनीं हरीचा व बाळाचा याप्रमाणें अगदीं वेगवेगळ्या तऱ्हेनें सत्कार केला; तरी हरीच्या मनाला अत्यंत रमविणारी व वेधून टाकणारी एक गोष्ट या प्रसंगीं होती. ती म्हणजे दररोज चाललेलें बाईकर बोवांचें कीर्तन. बोवांची व्याख्यानशैली वेधक असून, श्रीकृष्णचरित्रांतले निरनिराळे प्रसंग श्रोतृगणापुढें वर्णन करून सांगतांना बोवा त्यांशीं अत्यंत तन्मय होऊन जात असत. बोवांचा वेष अगदीं साधा; अंगांत कंफनी, डोकीवर भगवा फेटा, हातांत चिपळ्या आणि पायांत चाळ. कथा सांगतांना वारंवार गाहिवरून यावयाचें, आणि वर्णनांत मोरोपंतांच्या शेंकडों आर्या भराभर सारखे म्हणावयाचे! त्यामुळें कीर्तनांत रसपरिपोष फारच उत्तम होई. श्रीकृष्णचरित्र मुलांच्या तर अत्यंत आवडीचें; तेव्हां मुलांचा पुष्कळ समुदाय कथेला नित्य हजर असावयाचा. पण तात्यासाहेबांसारख्या गृहस्थांच्या येथील उत्सवांत झगझगीत जांभळी-निळी पगडी घातलेला, मुद्रेनें अगदीं रेखीव, जरीकांठी उपरणें पायघोळ सोडलेला, जरीचेंच धोतर नेसलेला आणि कथाप्रसंगाच्या वर्णनापेक्षां ज्याचा पेटीवर व तालासुराच्या गाण्यावरच भर अधिक असा हरिदास खरोखर पाहिजे होता, असें बऱ्याच स्त्रियांचें मत होतें, व राधाबाईची त्यांस सहानुभूति होती. त्यामुळें त्यांच्या मैत्रिणी व स्वत: त्या कीर्तनास फारशा बसत नसत. तात्यासाहेबांनीं एकदां शिफारस करून कीर्तनास बोलाविलें, तेव्हां "पण घरांतील कामें कोण पाहणार!" अशा एका वाक्यांत त्यांची संभावना करून त्या आपल्या मैत्रिणीकडे निघून गेल्या! पण एवढ्या मंडळींशिवाय हरिदासबोवांचें कीर्तन सर्वांस आवडीचें झालें. हरी तर इतका एकाग्र होऊन ऐके कीं, त्यानें एकदां हरिदासबोवांच्या मुखाकडे दृष्टि लावली, म्हणजे

मध्यें बुक्का लावावयाच्या वेळीं व शेवटीं आरतीच्या वेळीं काय ती चळे ! आसपास कोण बसले आहेत हें कांहीं त्याच्या ध्यानांत येत नसे ! बाळूचें कौतुक करणारीं मुलें हरीच्या त्या दारिद्री पोषाखामुळें त्याला क्षुद्र लेखून त्याची वारंवार चेष्टा करीत; त्यांचे ते सर्व चाळे या कीर्तनप्रसंगींही चालत. तीं त्याच्यामागें राहून त्याच्या कुचेष्टा करून खदाखदा हांसत; व त्यांत बाळूही असे. परंतु मागें चाललेल्या या चेष्टा हरीला कळत नसल्यामुळें त्या मुलांना त्या क्रीडेचें पूर्ण सुख भोगितां येत नसे. मग त्यास कोणी तरी डिवचीत व नंतर त्यानें मागें पाहिलें म्हणजे मग खूप हांसत. परंतु त्यांकडे विशेष लक्ष देण्यास कीर्तनप्रसंगीं हरीला सवड नसे. मग हरी जितका अधिक शांत राही, तितकें त्या सर्व मुलांना अधिक उत्तेजन येऊन त्यास तीं पुनः पुनः डिवचीत, व कसेंही करून त्यास चिडवावयाचें असा अगदीं पण करीत ! हा प्रकार एके दिवशीं तात्यासाहेबांच्या ध्यानांत आला. मग ते त्या मुलांकडे पाहतात तों त्यांत आपला बाळहि असल्याचें दिसून आलें. तेव्हां त्याचा त्यांना बराच राग आला. कीर्तनानंतर त्यांनीं त्यास हाक मारून पुनः असें न करण्याबद्दल बजावलें; व हरी-सारख्या आपल्या मित्राशीं प्रेमानें न वागल्याबद्दल त्यांनीं त्याची बरीच निर्भर्त्सना केली. बाळाची अशी कानउघाडणी करणें तात्यासाहेबांना जरू-रीचें वाटलें, तरी राधाबाईस तो प्रकार मानवला नाहीं. लागलीच त्या रागावून पुढें झाल्या; आणि " पुरें झालें मेलें हें शिक्षण ! माझें बाळ कसें वाळून चाललें आहे या जाचानें. रोज मेली ती गोविंदशास्त्र्यांची शाळा; व एके दिवशीं पोर घरीं आलें तर येथेंहि त्याला जाच ! तो भिका-रडा हरी कोण कुणाचा, आणि त्यासाठीं माझ्या बाळाला एवढें रागें भरा-वयाचें तें काय ? " असें कांहीं बोलून बाळाच्या हातास धरून त्या त्याला लागलीच घरांत घेऊन गेल्या.

याप्रमाणें आपल्या पूर्वीच्या परिस्थितींत येतांच बाळ पुनः मूळच्या

स्वभावावर जाऊं लागला. पण हरीनें या उत्सवाच्या दिवसांचा चांगला उपयोग करून घेतला. भजनाच्या व आरतीच्या वेळीं मोठ्या प्रेमानें तो आंबत येई, व अंतःकरण अगदीं सद्गदित करून देवाचें स्तवन करी व प्रार्थना करी. वाईकरबोवांनीं तर त्याचें अंतःकरण ईश्वरभक्तीकडे अधिकच वेधिलें. पहिल्याच दिवशीं त्यांनीं ध्रुवाचें आख्यान सांगितलें. त्या वेळीं राजानें मांडीवर बसवून घेतलें असतां सापत्न मातुश्रीनें लाथेनें त्याला खालीं ढकललें, तेव्हां त्या राजपुत्राचा—मानी ध्रुवबाळाचा—जो अपमान झाला, तो प्रसंग त्यांनीं फारच बहारीनें वर्णन केला ! त्या वेळीं क्षणैक तरी सर्व श्रोत्यांची वृत्ति अपमानाच्या दुःखाशीं तद्रूप झाली व राजपत्नीचा सर्वांना अत्यंत तिरस्कार वाटला. नंतर त्या अपमानामुळें दुःखी होऊन जेव्हां ध्रुवबाळ अरण्यास निघाला, तेव्हां अरण्यांतील नानाप्रकारच्या हालअपेष्टांचें वर्णन त्यांनीं असें इतकें सुंदर पुढें उभें केलें कीं, ध्रुवासारखा ८ वर्षांचा राजकुमार; एकटा, अनवाणी, बरोबर कोणी नसतां, परमेश्वराच्या भेटीसाठीं निर्धार करून अरण्यांत निघालेला पाहून पुष्कळांचे डोळे पाण्यानें भरून आले ! व हरीला तर डोळ्यांतील आसवें आवरेनाशीं झालीं ! राजा उत्तानपाद त्यास वारंवार परत बोलावूं लागला; राज्य व सर्व संपत्ति देतों म्हणाला; व आर्जव करूं लागला; परंतु त्या दृढनिश्चयी बाळानें पाऊल माघारीं घेतलें नाहीं ! "मला राज्य नको, संपत्ति नको. अपमानाच्या दुःखाची भर किती राज्यें मिळालीं तरी काय होणार ! तर, जेथून वारंवार ढळावें लागणार नाहीं, असें शाश्वत पद जें कोणतें व जेथें कोठें असेल तेंच मला पाहिजे. तें मिळेल तर मी थांबेन, नाहीं तर असेंच व्रत निरंतर चालवीन." असें त्या चिमुकल्या बाळानें मोठ्या निश्चयानें, धैर्यानें व तेजस्वितेनें दिलेलें उत्तर ऐकून राजा निरुत्तर झाला व निराशेनें परत वळला. पुढें पुष्कळ हाल सोशीत ध्रुव अरण्यांत चालला असतां नारदांनीं शाश्वत पदप्राप्तीचा मार्ग नीट दाखवून दिला व

त्यायोगें त्यास शेवटीं साक्षात् परमात्म्याचें—श्रीविष्णूचें दर्शन झालें ! त्या वेळीं तें भेटीचें वर्णन करतांना बोवा आनंदानें निर्भान होऊन व डोळे पाण्यानें भरून जाऊन जेव्हां बिठोबाअण्णांचा " भगवान् आनंदाचा कंद, हरि हा आनंदाचा कंद " हा कटाव म्हणत डुलूं लागले, तेव्हां तर हरीच काय, पण तात्यासाहेब व त्यांचे कांहीं स्नेही सुद्धां अगदीं सद्गदित होऊन डोळ्यांस वारंवार पदर लावूं लागले ! तो प्रसंग अत्यंत बहारीचा झाला व हरीसारख्या कोमल मनाच्या मुलाच्या हृदयांत तर तो खोल जाऊन बसला ! तो सबंध दिवस हरी तसाच त्या आनंदाच्या तंद्रींत, कोणाशीं फारसा न बोलतां, एकलकोंडाच राहिला. चेष्टा करण्यांत बाळ जरी प्रमुख नव्हता, तरी तो आपल्या त्या श्रीमंत सोबत्यांमध्यें नेहमीं असे. तेव्हां गुरुजींपाशीं असतांना आपलें एकमेकांचें संभाषण किती चांगल्या विषयांवर होत असे, व त्यायोगानें आपण रोज कसें नवें नवें ज्ञान व माहिती संपादन करीत असूं, याची हरीनें एकदां त्यास आठवण दिली. पण बाळानें त्याचा कांहीं विचार न करतां, ' काय त्यांत आहे ! ' असें म्हणून आपलाच क्रम पुढें चालविला.

कीर्तनें दररोज चालू होतीं. पहिल्या दिवशींच्या ध्रुवाख्यानानें हरीचें मन त्या कीर्तनांकडे फारच वेधलें. मग तो उत्तररंगांतील कथांप्रमाणें पूर्वरंगांतील उपदेशाकडेही लक्ष देऊं लागला. बोवांनीं सांगितलें:— " देव, परमेश्वर, हा सर्व सुखाचें माहेरघर आहे. त्याची भेट व्हावी हें आपलें सर्वांचें जन्माचें सार आहे; त्यास उपाय त्याची भक्ति हा होय. ' देव आपला पाठीराखा आहे; संकटीं तो धावून येऊन आपल्याला सांभाळील ' असा विश्वास निरंतर ठेवणें ही ती भक्ति होय. यासाठीं त्याचें चित्तांत वारंवार स्मरण करावें, व आपलें, पुढें असलेलें, नेमलेलें काम आपण मन लावून करावें; त्यांत अंगचुकारपणा करूं नये. म्हणजे तो कृपाळू परमात्मा आपणांवर प्रेम करतो; व मग आपली भक्ति चांगली

विकास पावते, ” असा विषय त्यांनीं पहिले दोन दिवस सांगितला. तिसरे व चौथे दिवशीं मुलांचा विद्याभ्यास व गुरुगृहवास यांचें महत्त्व सांगून, गृहस्थाश्रम स्वीकारल्यानंतर जे नीतिनियम जपून आचरणांत आणावयाचे असतात ते सांगितले; व कांहीं एका विशेष कालमर्यादेपर्यंत हे घरचेदारचे व्यवहार व्यवस्थितपणें करून पार पाडल्यानंतर पुढें मनुष्यानें परलोकप्राप्तीसाठीं ईश्वराकडे मन लावावयाचें असतें असें सांगितलें. नंतर पांचवे व सहावे दिवशीं त्यांनीं सर्व जगताचे व्यवहार सुखानें चालण्याकरितां कांहीं विचारी व बुद्धिमान ब्राम्हण लोक, कांहीं धाडसी व कर्तबगार क्षत्रिय लोक, कांहीं काटकसरी व द्रव्य संपादणारे वैश्य लोक व कांहीं केवळ एकनिष्ठ हुकूम पाळणारे शिपाई लोक यांची आवश्यकता कशी आहे तें सांगून त्यांचीं कर्तव्यें व स्वभाव यांचें वर्णन करून, गीतेंतील गुणकर्मविभाग सांगितला. आणि सातवे दिवशीं श्रीकृष्णचरित्रांतून या सर्व प्रकारांचा एकेक दाखला त्यांनीं काढून दिला. याप्रमाणें गोकुळाष्टमीचा सर्व उत्सव हरीच्या हृदयाला अत्यंत आनंददायक व बुद्धीला मोठा बोधक होऊन गेला. आणि आपला सर्व बोध हरी हा किती एकाग्रतेनें श्रवण करीत असतो हें त्या कीर्तनकारांच्या लक्षांत येऊन त्यांच्या मनांत त्याजबद्दल प्रेमभाव उत्पन्न झाला !

---

## ४० गायन आणि पारणें.

गोकुळाष्टमीच्या दिवशीं कीर्तन रात्रीं व्हावयाचें होतें, म्हणून रोजच्या कीर्तनाच्या वेळेला एक उत्तम गवईबोवा बोलाविले होते. नित्याप्रमाणें हरी, बाळ, त्याचे सोबती व इतरही कित्येक मंडळी गायन ऐकण्यास हजर होती. गवयीबोवांचें गायन सुरू झालें. आरंभीं बराच वेळ वीणा नीट लावण्याकरितां खुंट्या पिळावयाच्या व तारा ताणावयाच्या खटपटींत

गेल्यावर नमनास आरंभ झाला, व नंतर गवयीबोवा अगदीं आवेशांत येऊन पुढें पुष्कळ जोरानें ताना घेऊं लागले ! त्या त्यांच्या ताना ऐकून व त्यांचे हावभाव पाहून श्रोतृजन बरेच रंगून गेले. हरिदासबोवांचा भिकार भगवा पोशाख पाहून कंटाळलेल्या राधाबाई व त्यांच्या मैत्रिणी यांना हा गायनाचा प्रसंग पुष्कळ समाधानकारक झाला. बाळ व त्याच्या संगतीचीं मुलेंही त्यांत रंगल्यासारखीं दिसूं लागलीं. पण हरीची वृत्ति आज या विषयांत रमेना. पदें काय आहेत, त्यांत कोणता विषय गोविला आहे, त्यांचा अर्थ काय आहे हें कांहीं कळावें म्हणून त्यानें प्रथम पुष्कळ मन लावून गायन ऐकलें; पण त्या तानांच्या गर्दीत एकहि अक्षर त्यास स्पष्ट ओळखतां येईना. मग त्याला वाटलें कीं, ज्यांचा अर्थ कळत नाहीं अशीं हीं पदें, देवाची काय किंवा आणखी कोणाचीं काय, निरुपयोगीच होत. हें नुसतेंच ऐकावयाचें; यांत कांहीं ज्ञान होणार नाहीं, बोध मिळणार नाहीं. मग त्यांत गोडी कशी लागणार ? तथापि " इतके लोक जर मोठ्या आवडीनें तें ऐकत आहेत, तर ते सर्व वेडे व आपण तेवढे शहाणे असें तरी कसें समजावें ? तर आपले विचार सुद्धां चुकीचे असतील " असेंही त्याच्या मनांत आलें; आणि मंडळींतून जाणें योग्य नाहीं म्हणून तो तसाच पुनः आपलें मन त्यांत लागावें म्हणून प्रयत्न करूं लागला. पण तें त्यास साधलें नाहींच. त्यास पेंग येऊं लागला. तो त्यास आवरेना. मग जवळच्याच एका खांबावर रेलून तो लौकरच झोंपीं गेला; आणि सर्व लोक गायन संपवून उठले तेव्हां त्या गडबडीनें जागा झाला ! त्यावरून सर्व मुलांना त्याची थट्टा करायला आणखी एक कारण मिळालें ! एक जण ह्मणाला—" अरे हा पापी; देवाच्या उत्सवांत बसून झोंप घेत होता ! " दुसरा ह्मणाला—" नाहीं, त्याची समाधि लागली होती ! तो मागील जन्मींचा योगिराज पुनः जन्मास आला आहे. " तिसरा म्हणाला—" कसला योगिराज ! भिकारडा कुठला ! त्याला हें गायन म्हणजे कशाशीं

खावें हें ठाऊक असेल तर ना!" चवथा म्हणाला—"अरे, त्याचें एक मेंढरू चुकलें आहे! तें कोठें सांपडेल म्हणून तो अगदीं शांत मन करून विचार करीत बसला होता." पांचवा म्हणाला—"अरे, तो स्वतःच एक मेंढा आहे!" व असें म्हणून खदखदा हांसत त्याच्या अंगावर जाऊन रेलला! बाळ हें सर्व पाहतच होता. मुलें अंगावर येऊं लागतांच हरी बाजूला होऊन घरांत निघून गेला. बाळाला हें सर्व कसें रुचतें याबद्दल मात्र त्याच्या मनाला विशेष वाईट वाटलें.

दुसरे दिवशीं पारणें झालें. तात्यासाहेब इनामदारांचा उत्सव! त्यामुळें अर्थात् पान फार झालें. गांवांतील बहुतेक सर्व मोठमोठे लोक पंक्तीस होते. जेवणाचा थाट तर केवढा मोठा होता तें सांगावयासच नको. पंगत दोन तासांच्या वर चालली होती! शेजारच्या खोलींत गवईबोवांच्या तानांवर ताना चालू होत्या! पंक्तींतही मधून मधून कोणी मोठे जाडे संस्कृत श्लोक ऐकणाराला त्यांतले एकही अक्षर न कळेल अशा प्रकारें वारंवार ताना घेत म्हणून, सीताकांतस्मरणाचा गंभीर जयघोष करीत होते. पंक्तीमधून जिलब्यांचें ताट माणसाबरोबर फिरवीत, लोकांस आग्रह करीत, स्वतः तात्यासाहेब इकडून तिकडे वारंवार जात येत होते. "अहो, पुरे!" असें ओरडून पंक्तींतील ते सर्व मोठमोठे श्रीमंत लोक जिलब्यांचीं ताटेंच्या ताटें पानांत घेत होते व पुनः नेटानें व शर्ती मारून सर्व ताट रिकामें करून तात्यासाहेबांस बोलावीत होते! दोन तासपर्यंत हा आग्रह चालला होता. शेवटीं ढीगचे ढीग लोकांच्या ताटांत राहूं लागले, व आतां नव्यानें आणलेलीं ताटें रिकामीं करावयाला पंक्तींत जागा लौकर आढळेनाशी झाली! तरी तात्यासाहेबांचा आग्रह चालूच होता. मग जेव्हां सर्व पंक्तींतून गलबला झाला कीं,—'आतां पुरे!' 'आतां पुरे!' तेव्हां तात्यासाहेबांनीं भात वाढावयास एकदांची परवानगी दिली!

नंतर पानसुपारीचा थाटही असाच फार मोठा झाला. त्या वेळीं

तात्यासाहेब दिवाणखान्यांत एका तक्याला टेकून बसले होते व बाळ तेथेंच त्यांच्याजवळ उभा होता. लोक पानसुपारी देत घेत होते. हरी अर्थातच मोकळा होता. तो एका बाजूस उभा असलेला पाहून त्याच्या थोडा परिचयाचा झालेला रामकृष्ण त्याच्यजवळ आला व म्हणाला–"हरी, आजची मेजवानी कशी काय झाली !"

हरी म्हणालाः–मला नाहीं आवडली.

रामकृष्णः—कां रे ? जिलबी चांगली नव्हती ?

हरीः–तसें नव्हे. पण जेवणासारख्या साध्या, रोजच्या आवश्यक गोष्टींना एवढा मोठा थाटमाट केलेला मला आवडत नाहीं. भूक लागते म्हणून जेवावयाचें; नाहींतर जेवण हें काय परब्रह्म आहे ? शेंकडों माणसें त्या एका जेवणासाठीं आज राबत होतीं ! जेवावयाला पदार्थ तरी किती, शेंकडों ! एवढें महत्व जेवणासारख्या साध्या गोष्टीला कां यावें हें मला समजत नाहीं ! आणि तात्यासाहेबांचा तो आग्रह काय विलक्षण ! जिलब्या लोकांनीं खाल्ल्या किती व पानांतून राहिल्या किती, त्याला काहीं गणती ! आणि आग्रह करून भुकेपेक्षां अधिक अन्न खाणें व खाऊं घालणें हें आरोग्याच्या दृष्टीनें तरी हानिकारक नाहीं काय ? पण मोठमोठे लोकही अशा गोष्टींत रंगून गेलेले पाहून मला तर नवल वाटलें. त्याच जिलब्या दुसऱ्या शेंकडों भुकेलेल्या लोकांना उपयोगीं पडल्या नसत्या काय ? किंबहुना तेवढ्याच खर्चांत भाकरी वाटल्या असत्या तर दुप्पट लोकांचा निर्वाह झाला असता ! शिवाय आरडाओरड काय ! गलबला काय ! पुरे पुरे काय ! व घाला घाला काय ! हें जेवण नव्हे, हा एक निराळा भोजनोत्सवच म्हणावयाचा ! मला तर तो प्रसंग केव्हां एकदा संपेल असें झालें ! तेवढ्या वेळांत मीं भारतांतले किंवा रामायणांतले दोनतीन अध्याय वाचले असते.

रामकृष्णाला हरीचे हे विचार आवडले, पण त्यावर त्यानें फारसें उत्तर दिलें नाहीं. तो एवढेंच म्हणाला–" हरी, तूं अद्याप श्रीमंत झालेला दिसत

नाहींस. हें सर्व बरोबर समजण्याकरितां तुला श्रीमंत झालें पाहिजे!"

हरी:—" छे छे! मी श्रीमंत कध्धीं होणार नाहीं! कालच्या हरिदासबोवांनीं सांगितल्याप्रमाणें गरीबींतच देवाचें स्मरण राहतें व गरीबींतच मनुष्य भला राहतो. म्हणून कुंतीमातेची नेहमीं प्रार्थना असे कीं,

आपदः सन्तु नः शश्वत् ।

आणि तुकारामबोवांचेंही म्हणणें हेंच कीं,–

विटंबो शरीर होऊ का विपत्ति । परी राहो चित्तीं भगवान् ॥

---

# ४१ रस्त्यांत कलागत !

गोकुळाष्टमीचें पारणें झालें; पानसुपारी होऊन बाहेरची मंडळी घरोघर परत गेली. घरचे पाहुणे खाल्लेलें अन्न केव्हां जिरणार, या विचारांत असतांच, दिवाणखान्यांत सांपडेल तशा जागेवर पसरून झोंपी गेले; व राधाबाई आपल्या मैत्रिणींच्या जेवणांत व पानसुपारींत गढून गेल्या! अशा वेळीं बाळ व त्याचे सर्व स्नेही यांना फुरसतीचा वेळ मिळाला व कोठेंतरी बाहेर फिरावयास जावयाचें सर्वांनीं ठरविलें. हरीहि नेहमींप्रमाणें बरोबर निघाला. हरीच्या मुग्धपणाबद्दल सर्वांची तक्रार चाललीच होती. पण बाळ कांहीं विचारीत नाहीं तोंवर इतरांच्या तक्रारीकडे लक्ष देण्याचें कारण नाहीं, असें हरीनें ठरविलें. याप्रमाणें चालतां चालतां ते गांवाबाहेरील एका मोठ्या पटांगणांत येऊन पोंचले. तोंच थोड्या अंतरावर लोकांची पुष्कळ गर्दी जमलेली त्यांस दिसून आली. लौकरच त्यांना कळलें कीं, तेथें एक मोठा पोसलेला बैल व १०।१२ शिकारी कुत्रे यांची झुंज व्हावयाची आहे. त्याबरोबर तिकडे सर्वांचें मन ओढलें. पण आपले आईबाप आपल्यास काय म्हणतील याचा कांहींना विचार पडला. राधाबाईंनीं तर बाळाला अगदीं गळ्याची शपथ घालून सांगितलें होतें कीं, 'कोठेंही दूर जाऊं नको व

कोणत्याही गर्दींत मिसळूं नको. ' तेव्हां आतां काय करावें अशा विचारांत जों सर्वजण आहेत, तोंच एकजण म्हणाला–" आपण त्या गर्दींत जा कशाला ? आपण दूर उभें राहूनच तें काय आहे तें पाहूं. "

दुसरा म्हणाला–" अरे, मला ठाऊक आहे: कीं, तेथें त्या बैलाला अगदीं घट्ट जखडून बांधतात. मग आपल्याला तेथें कशाची भीति आहे ?"

तिसरा म्हणाला–" अरे, एकमेकांच्या चहाड्या सांगायला आपण काय मूर्ख आहोंत ? मी तर कधीं सांगणार नाहीं घरांत ! " तोंच सर्व जण ओरडले–" नाहीं, नाहीं, आम्ही नाहीं सांगणार ! " इतक्यांत चौथ्यानें शंका घेतली कीं–" हरी कांहींच बोलत नाहीं हें काय ? " पण लागलीच पांचव्यानें त्याचा कैवार घेतला–" छे, तो सुद्धां सांगणार नाहीं ! काय रे हरी, तूं सांगणार आमची चहाडी ? "

हरी ह्मणाला—मला कोणाची चहाडी सांगण्याची काय गरज आहे ? पण मला विचारलेंच तर मी खरें नको सांगूं तर काय करूं सांगा ?

तों एक मुलगा ह्मणाला:–" अरे, त्यांत काय आहे ? विचारलेंच तर तुला असें नाहीं का सांगतां येणार, कीं, ' आम्ही पोईच्या नाक्याकडे हिंडावयास गेलों होतों,' नाहींतर ' एका मैदानांत खेळत होतों ! ' अधिक सांगायला कशाला हवें ?

हरी:–पण असें सांगितलें म्हणजे खरें सांगितल्यासारखें कसें होईल ? शिवाय दुसरी गोष्ट मी तुम्हांला सांगतों; माझें तुह्मी ऐका. ही झुंज पाहावयाला जाणें म्हणजे मोठें धोक्याचें आहे. बाळ हा तर राधाबाईचा फार लाडका आहे. त्या आतांपासूनच त्याच्याबद्दल सारख्या काळजी करीत बसल्या असतील. तर आपण आतां परत जावें, हें चांगलें.

पण हरीचा हा विचार कोणास फारसा मानवला नाहीं. एकजण म्हणाला:–अहाहा ! मोठे आलेत आजोबा उपदेश करायला ! त्याला वाटतें मीच काय तो शहाणा व दुसरे सारे मूर्ख !

दुसरा आणखी पुढें होऊन म्हणालाः— अरे, तूं बोलून चालून एक भिकारडा पोर; तुला बाळानें अमुक करावें व अमुक न करावें म्हणून सांगायचा काय रे अधिकार ! बाळानें बरोबर आणला, म्हणून राजश्री, एवढ्या तुमच्या गमज्या चालल्या आहेत होय !

तिसरा म्हणालाः— मी जर बाळाच्या जागीं असतों, तर असल्या उद्धट पोराला तावडतोब घरीं हाकलून दिलें असतें !

त्यांत एक जरा वयानें मोठा मुलगा होता. त्याचें नांव महेश्वर. तो एकदम हरीच्या पुढें येऊन दांत विचकून त्याला म्हणाला:—" म्हणून तूं हे बाळाचे उपकार फेडणार वाटतें ! हेराचें काम करून व सर्व इत्थंभूत बातमी घरीं सांगून, खाल्ल्या घरचे वासे मोजतोस होय ! "

अशी हरीवर सर्वांनीं अगदीं पुष्पवृष्टि चालविली ! आतांपर्यंत बाळ हा आपली कांहींच बाजू घेत नाहीं असें पाहून हरीस खेद वाटत होता; पण आतां या प्रकारापासून बाळास एक प्रकारें करमणूकच होत आहे असें पाहून तर त्यास विशेष दुःख झालें. मग तो महेश्वरास म्हणाला:— " तुम्ही जसे बाळाबरोबर सारेजण आलां, तसाच मी पण आलों; मग तुम्ही जर हेर असाल तर मलाही हेर म्हणा हवें तर. पण भिकारडा म्हणण्याचें कारण नाहीं. तुम्हांला जितकी माझी गरज, तितकीच मला तुमची आहे. मी कांहीं तुमच्याकडे मागावयाला आलों नाहीं ! आणखी, मी कितीही दरिद्री झालों, तरी तुम्हां कोणाकडे मी कधींच याचना करावयास येणार नाहीं हें खास समजा. मी माझें शेत नांगरून आपलें पोट खुशाल भरीन.

हरीचें हें झणझणीत उत्तर ऐकून त्या सर्व मुलांचा राग वाढला. मग त्यांनीं त्याचा असा अर्थ करून दाखविला कीं, हरीनें यांत बाळाचा पाणउतारा केला ! मग बाळालाही तसेंच वाटलें; व त्यालाही हरीचा राग आला. मग हरीचे आजपर्यंतचे उपकार व प्रेम सर्व विसरून तो हरीला म्हणाला:— हरी, सांभाळ हो ! तूं माझा पाणउतारा करीत आहेस ! "

हरीः— नाहीं ! बाळ, उलट तूं आणि हे तुझे सर्व सोबती माझाच पाण-उतारा करीत आहेत !

बाळः— नाहीं; आम्ही अगदीं सरळ बोलत आहों. मग तूं असा कोण मोठा माणूस लागून गेला आहेस, कीं तुझ्याशीं आम्हीं बोलायला भ्यावें ?

हरीः— मी मोठा माणूस नाहीं. पण आतांपर्यंत मला वाटत होतें कीं, तूं खरोखर मोठा माणूस आहेस ! पण—

बाळः— पण काय ? मी आतां मोठा माणूस नाहीं ह्मणतोस ? मग लगावूं का एक चांगलीशी ? " आणि असें म्हणून बाळानें त्याच्या एक तोंडांत देऊन त्यासरशीं त्याची टोपी उडविली ! पण बाळ आपला मित्र असें जाणून हरीनें तें सर्व निमुटपणें सहन केलें. पण त्यास त्यायोगें फार वाईट वाटलें व तो बाजूस झाला आणि दोन्ही हात डोळ्यांवर धरून एक-दम हुंदका देऊन रडूं लागला ! डोळ्यांतून घळघळां आसवें चाललीं !

याप्रमाणें बाळानें हरीच्या तोंडांत देतांच सर्व मुलांना फार आनंद वाटला. ' भली खोड मोडली ' असें म्हणत ते सर्वजण त्याच्या भोंवतीं गोळा झाले; आणि त्यांनीं त्याची आणखी चेष्टा खुशाल चालविली ! कोणी हरामखोर, कोणी चुगलखोर, कोणी भित्री भागुबाई, कशी रडत बसली; इत्यादि प्रकारें बोलून सर्वांनीं त्याचा यथेच्छ छळ सुरू केला ! महेश्वरानें तर त्याची शेंडी धरून ओढली. त्याबरोबर हरीनें त्याचे हाताला हिसडा देऊन शेंडी सोडवून घेतली, आणि तो म्हणाला— " महेश्वर, पहा आं ! तूं माझ्या वाटे जातोस ! " या वेळची ती हरीची मुद्रा पाहून बहुतेक मुलें चपापलीं व लागलींच मागें झालीं. पण महेश्वर हा एक दांडगेश्वर व भांडणांत पटाईत मुलगा होता; तो पुनः गुरकावून म्हणाला— " हो हो, आम्ही वाटे जाणार ! तुझ्यासारख्या हरामखोराला आम्ही असेंच बक्षीस देणार ! बाळूची चपराक पुरी झाली नसली तर सांग, म्हणजे आणखी दुसरी एक मी लगावतों ! "

हरी:— महेश्वर, तुझ्या सगळया शिव्या व सगळी बडबड मी आतांपर्यंत मुकाट्यानें ऐकून घेतली आणि अजूनही घेईन. पण लक्षांत ठेव कीं, बाळाची चपराक मीं सोसून घेतली, पण तशी दुसऱ्या कोणाची सुद्धां घेणार नाहीं. जर कोणाला प्रचीती घ्यावयाची असेल तर त्यानें पुढें यावें! मग मी भित्री भागूबाई आहे का काय आहे तें त्याला दाखवीन!

तें उत्तर ऐकतांच महेश्वरानें उद्दामपणानें लागलीच हरीला चपराक लगावलीच! लागलीच हरीनें उलट रट्टा लगावून त्याला कोलमडून पाडिलें! त्याबरोबर महेश्वराला हरीच्या बळाचा अंदाज झालाच; पण फजितीच्या भयानें तो पुढें झाला आणि दांत ओंठ खाऊन सर्व बळ अगदीं एकत्र करून त्यानें पुनः हरीला एक गुद्दा लगावला आणि त्याला खालीं पाडलें! हरी महेश्वरापेक्षां वयानेंही कमी व अंगानेंही कमी होता. तथापि तो पुन्हां उठला आणि हाताला अगदीं झिणझिण्या येतील अशा तऱ्हेनें त्यानें पुनः एक रट्टा महेश्वराच्या मानेवर मारला! याप्रमाणें तीनदां, चारदा, पांचदां झालें; तथापि कोणी माघार म्हणून घेईना. त्यामुळें त्यांच्या त्या झटापटीला बरेच मोठें स्वरूप येत चाललें! महेश्वर बळवान असल्यामुळें त्यानें हरीला बरेच लोळविलें, पण हरी कठीण व काटक असून, माराला मोजणारा नव्हता. त्यामुळें तो तितक्या वेळां पुनः पुनः उठला व त्यानें पुनः पुनः महेश्वराला भराभर भरपूर रट्टे चालविले! तेवढ्यांतच हरीला दम लागला; श्रम खूप झाले; तरी तो हटला नाहींच. शेवटीं बराच वेळ चाललेल्या झटापटीमुळें महेश्वरच आधीं थकला; मग तो खूप संतापून दांत ओठ खाऊं लागून आणीबाणीवर येऊन, सांपडेल तसा व सांपडेल तेथें त्यास मारूं लागला व चावूं लागला! त्या रागाच्या आवेशांत त्याचें अंग थरथर कांपूं लागलें व त्याला त्यामुळें नीट उभेंही राहवेनासें झालें. शेवटीं त्यानें अगदीं निकरानें हरीवर चाल केली. मग तो मागें वळून पुनः जों हरीवर येतो, तेवढ्यांत हरीनें सवड मिळवून, मागून त्याची तंगडी धरून, एक

पेच घालून त्यास संबंध उचलला आणि सर्व मुलांच्या देखत जमिनीवर जोरानें आपटला ! त्याबरोबर तो अगदीं चीत झाला आणि विव्हळत तेथेंच पडून राहिला !

महेश्वराला हरीनें असा फेकून दिल्यावर इतर पोरें काय, सारींच हरीच्या बाजूचीं झालीं ! आणि हा वेळपर्यंत ज्या हरीवर सर्वांनीं कुचेष्टांचा अगदीं मारा चालविला होता, त्याच, हरीचें ते आतां "शाबास हरी ! हरीची फत्ते !" अशा आरोळ्या ठोकून अभिनंदन करूं लागले !

## ४२ बैलाची पैज

पण हें भांडण आतां येथेंच संपलें, व समोरील गर्दीकडे आतां मुलांचें लक्ष विशेष वेधलें. सदू पाटलानें आपल्या बैलाची पैज लावली होती; आणि शिकारी कुत्रे अंगावर सोडले असतां तो त्यांना चीत करतो, कीं स्वतः हार जातो, हें आज ठरावयाचें होतें. हा अद्‌भुत खेळ पाहण्यासाठीं शेंकडों लोक त्या पटांगणावर जमले होते. महेश्वराला हरीनें दूर भिरकावून दिलें, त्याच क्षणाला सदू पाटील आपला बैल घेऊन तेथें आला. त्याच्या बरोबर पुष्कळच गर्दी चालली होती. बैल मोठा पुष्ट असून चांगला तेजस्वी दिसत होता. एक लांब कासरा त्याच्या शिंगाला बांधला होता. गळ्यांत जाड मण्यांची माळ असून तिला दोन तीन घांटा लावलेल्या होत्या. त्या खळखळ खळखळ वाजत असून त्याबरोबर आसपासच्या लोकांचें मन त्या खेळाकडे आकर्षण करीत होत्या. शेवटीं ती मंडळी जेथें तो खेळ व्हावयाचा होता, त्या मैदानावर येऊन पोंचली. मग समोंवतालची लोकांची गर्दी दूर सारण्यांत आली. नंतर एक मोठी लोखंडी मेख त्या जागेवर मधोमध पुष्कळ खोल ठोकून एका लांब दोरानें तो बैल तीस घट्ट बांधण्यांत आला. नंतर बैलाच्या पाठीवर एक थाप मारून सदू पाटलानें आपली सर्व तयारी

झाल्याचें सूचित केलें !

बाळ आणि त्याचे महेश्वरादि सारे मित्र त्या बैलाबरोबर त्या गर्दीत मिसळले. या वेळीं आपले आईबाप काय म्हणतील, असा कोणासच विचार सुचला नाहीं. कोठेंही गर्दीत न मिसळण्याबद्दल राधाबाईंनीं मुद्दाम सर्वांना व विशेषतः बाळाला बजावून सांगितलें होतें; व बाळानें तें कबूल केलें होतें. पण तें सर्व, तो बैल व त्या खेळास जमलेला तो सर्व लोकांचा थवा पाहून सर्वजण विसरले आणि खेळाची तयारी होतांच सर्वांनीं सांपडेल ती जागा आपापणांला कायम केली. हरी सर्वांच्या मागें होता. त्याला असला खेळ पाहण्याची फारशी आवड नव्हती. त्याचें अंतःकरण कोवळें असल्यानें, मनुष्यांच्या केवळ करमणुकीसाठीं आतां या बैलाचे व कुत्र्यांचे हाल होणार हें ध्यानीं येऊन त्याच्या मनाला खेद वाटला. पण आपण बाळाबरोबर बाहेर आलों असतां त्यास सोडून परत जाणें आपणास योग्य नाहीं असें त्याच्या मनांत आलें व त्यामुळें त्या निमित्तानें त्यास त्या खेळाच्या जागीं बाळावर लक्ष ठेवून थांबून राहणें भाग झालें. मग त्यानें त्या सर्व गर्दीत फिरून बाळ कोठें बसला आहे तें शोधलें. व तो नजरेंत आल्याबरोबर आपणही जवळच एके ठिकाणीं खेळ पाहण्याच्या मिषानें उभा राहिला.

खेळास सुरवात झाली; आणि एक मोठा उग्र शिकारी कुत्रा प्रथम त्या बैलाचे अंगावर सोडण्यांत आला. बैल चांगला पोसलेला असून फार बलाढ्य होता. तो कुत्रा अंगावर आला तरी त्याला त्याचें कांहींच वाटलें नाहीं. ती त्याची गंभीर वृत्ति अशी होती की, दीर्घकाळचें हाडवैर मनाशीं धरून जरी कोणी शत्रु पुढें आला, तरी तोही थंड व निर्वैर होऊन व हातचें हत्यार टाकून परत वळावा ! अशी त्याची सुंदर, सात्त्विक व गंभीर वृत्ति पाहून हरीला त्या बैलाबद्दल फार प्रेम वाटूं लागलें व त्याचे पुढें होणारे हाल लक्षांत येऊन त्याचा कळवळाही आला. त्याला वाटलें–आपण सदू पाटलाकडे जावें; व त्याची विनंती करून तो बैल तेथून सोडवावा; व त्या जागीं त्या

कुत्र्यांचे हल्ले सहन करावयासाठीं हवें तर त्यास सांगावें कीं, मी तेथें उभा राहतों! आणि अशा विचारानें तो तेथून उठण्याची खटपट करूं लागला! पण ती त्याची पोरकल्पना अर्थातच व्यर्थ होती. शिवाय आतां खेळाकडे सर्व लोकांचें लक्ष गुंतून गेल्यामुळें आतां गर्दीतून मार्ग काढणेंही त्यास शक्य नव्हतें. तो कुत्रा काय पराक्रम करतो याकडे सर्वांचे डोळे लागले. तो कुत्रा बैलाच्या अंगावर चालून गेला व त्याच्या तोंडाला डसण्याचा त्यानें पहिला प्रयत्न केला. पण त्याबरोबर त्या थोर जनावरानें सहज एक मानेस हिसडा दिला; आणि शिंगावर घेऊन तें कुत्रें एकाद्या फुलासारखें इतकें दूर भिरकावून दिलें कीं, तें जमिनीवर पडतें तर त्याचे तुकडे तुकडे झाले असते; पण लोकांच्या गर्दीवरच तें जाऊन आदळलें! त्या वेळीं त्याचे रक्षक दोघेचौघे धावून पुढें झाले, आणि त्यास त्यांनीं आपल्याच हातांवर झेललें! पण एवढ्यांतच त्याचा दम संपला! मग तत्स-लाच आणखी एक कुत्रा बैलावर सोडण्यांत आला. त्या वेळींही तोच प्रकार झाला. अगदीं अंगावर येऊन डसेपर्यंत तो बैल असा शांत व गंभीर राहिला कीं, जणूं आपणावर कोणाचा हल्लाच नाहीं! पण अगदीं तोंडावर चालून येतांच त्यानें त्याला जी एक ढुशी दिली, त्यांतच तें अर्धमेलें होऊन गेलें! नंतर तिसरा कुत्रा पुढें सोडण्यांत आला; तों त्याचीही तशीच वाट लागली; आणि याप्रमाणें आपल्या तीनही विरोधकांची वाट लावून पुनः तो बैल, पुढें काय होतें तें शांतपणें पहात, एखाद्या अनुभवी योद्धयाप्रमाणें तेथें निवांत उभा राहिला!

याप्रमाणें कुत्र्यांचे वेगवेगळे तीनही हल्ले व्यर्थ झाल्यावर सदू पाटलाचा पक्ष विजयी झाला असें वाटून त्याजकडील लोकांनीं मोठ्यानें आरोळ्या चालविल्या, व खेळ संपल्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. इतक्यांत दुसऱ्या बाजूच्या लोकांनीं उचल करून, दुसरे तीन कुत्रे एकदम बैलावर सोडा-वयाचा हट्ट धरला. मग बरीच गडबड उडाली; आणि पुनः एकदां बैलाचें

सामर्थ्य अजमावयाचें ठरलें. मग ते तीन कुत्रे एकदम तिन्ही बाजूंनीं त्याच्या अंगावर सोडतांच, ते आवेशानें येऊन त्याचा लचका तोडावयाचा प्रयत्न करूं लागल्यावर त्या उमद्या जनावराचा शांतपणा कमी झाला. मग तो अगदीं कावराबावरा झाला. कारण एकाला ढुशी द्यायला जावें तर दुसरा पायांशीं धांवे व त्याजकडे वळावें तर तिसरा पाठीवर उडी घेई! त्यामुळें तो अत्यंत क्षुब्ध झाला आणि डुरकण्या फोडूं लागला! संतापानें त्याचे डोळे लाल झाले आणि त्यांतून आगीच्या ज्वाळा बाहेर पडतातशा दिसूं लागल्या! इकडून तिकडे फिरून त्याच्या तोंडाला फेस आला. ते कुत्रे तिघे तीन बाजूंनीं त्यावर सारखी चढाई करीत होते. गुरगुरून, भुंकून व शक्य तर चावा घेऊन त्यांनीं त्याला अगदीं जेरीस आणलें! शेवटीं अगदीं निराश होऊन अत्यंत संतापानें त्या बैलानें समोरच्या एका कुत्र्यावर धांव घेतली. आणि तें पायांखालीं घोटाळतांच त्यास तेथेंच लाथाडून पूर्ण चीत केलें! तोंच दुसरा कुत्रा पुढें आला; त्याला त्यानें हुंदाडतांच त्याचें शिंग त्याच्या पोटांत शिरलें आणि तेंही मग निपचित होऊन पडलें! तोंच तिसऱ्यानें त्याच्या पायाचा चांगलाच लचका धरला. मग त्यावर तो जों उसळून धांव घेतो, तोंच त्याच्या गळ्याच्या दोरीस अत्यंत जोराची ताण बसून ती तुटली! आणि तो क्षुब्ध झालेला भयंकर बैल मोकळा होऊन स्वैर धावूं लागला! आतां प्रेक्षक लोकांची काय दाणादाण झाली असेल याचें वर्णन करणें अशक्य आहे! सर्वांची पांचावर धारण बसली, व ज्यास जी वाट सांपडेल तिकडे तो धांवत सुटला! कित्येक लोक आपटले, कित्येक चेंगरले व कित्येक पळाले! सर्व रानभर माणसें पसरून गेलीं. एका क्षणापूर्वीं जे लोक नाना तऱ्हांनीं कुत्र्यांना उत्तेजन देऊन, पुढें त्या बैलाचे कसे काय हाल होतात तें पाहण्यासाठीं मोठे आतुर होऊन बसले होते, तेच आतां त्या जनावराच्या तावडींतून आपण कसे सुटूं म्हणून निराशेनें पळतां भुई थोडी करीत होते! तो बैल तर वाऱ्या-

सारखा मैदानावर चालला ! त्यानें कित्येकांना तुडविलें, कित्येकांना आपटून जखमा केल्या आणि कित्येकांचें रक्त काढून आपल्यावर केलेल्या अन्यायाबद्दल तेथें जमलेल्या लोकांना बराचसा मोबदला दिला ! आतां जेथें बाळ व त्याचे सोबती उभे होते तिकडे तो धांवत आला ! पोरें सारीं घाबरून खूप पळालीं. पण पळणार कुठें ? " आई आई ! मेलों मेलों ! " अशा आरोळ्यांची सर्वत्र गर्दीच उसळली. आणि हरीचा उपदेश थोड्याच वेळापूर्वी ज्यांनीं झिडकारला, त्यांना ' कोठून आपणास ही बुद्धि सुचली ' असें वाटून भरपूर पश्चात्ताप झाला. पण आतां त्याचा उपयोग नव्हता. पण एवढ्या साऱ्या गर्दीत हरीचें धैर्य अद्याप कायम होतें. तो ओरडला नाहीं व पळालाही नाहीं. बैलाची मुसंडी त्याच्यावर येतांच चटकन् उडी घेऊन तो बाजूस झाला; आणि बैल तसाच पुढें गेला. पुढें बाळ पळत चालला होता. बैल पाठीशीं आल्याचें कळतांच तर तो फार घाबरला. व पुढें लागलीच पाय घसरून पडलाच ! आणि बैलाच्या पायांखालीं सांपडून आतां एका क्षणांत चेंगरणार अशी वेळ आली ! पण हरीनें तेवढ्यांत शिताफी केली ! एक अणकुचीदार लोखंडी मेख तेथें जवळच पडली होती ती चटकन् उचलून, धांवत जाऊन, त्यानें ती त्या बैलाच्या पाठींत खोचली ! त्याबरोबर तो संतापलेला बैल पुढें बाळास तुडवून जावयाचा तो तत्काळ मागें फिरून हरीवर चालून आला ! आतां बाळावर उपकार करायला गेल्याबद्दल आपल्याच जीवाला मुकावयाची पाळी हरीवर आली ! पण इतक्यांत हरीला एका झाडाचा आसरा मिळाला. आणि बैल धावून अंगावर आला असतां झाडाच्या मागें मागें लपत त्यानें झाडाला २–३ फेऱ्या घातल्या. बैल खूप चवताळला होता; पण झाडामागें लपलेल्या या एवढ्याशा पोराला ढुशी देण्याला त्याला अवसर मिळेना. तथापि २–३ प्रदक्षिणा करूनही बैलानें हरीची पाठ सोडली नाहीं; तेव्हां आतां तेथून कसें निसटावें याची हरीला मोठी काळजी उत्पन्न झाली. तोंच सदू पाटील

व त्याचे दोघे तिघे मित्र तिकडून धांवत आले; व सदूनें त्या जनावराच्या पाठीवर एक जोराचा तडाखा लगावला आणि त्या बलाढ्य जनावरालाही एका तडाक्यांत बांकविलें! आणि चटकन् पुढें होऊन हातचा दोराचा फांस त्यानें त्याचे गळ्यांत अडकविला!

याप्रमाणें बैल पकडला जातांच चोहोंकडचा गलबला बंद झाला. बाळ रस्त्यावरच मूर्च्छित पडला होता, तिकडे हरी धांवला. तोंच दुसरीकडून बाळाचे घरची चाकरमंडळी, बाळाच्या शोधार्थ फिरत असलेली, तेथें आली; आणि त्यांनीं त्याला उचलून घेतलें. बाळाला कांहीं दुखापत वगैरे झालेली नव्हती; फक्त भयानें तो अगदीं गांगरून गेला असल्यामुळें बेशुद्ध झाला होता. लौकरच तो सावध झाला आणि ते सर्वजण मग त्याला घेऊन त्याच्या घराकडे चालले.

---

## ४३ चौकशी चालली!

राधाबाई अर्थातच घरीं होत्या. त्यांना इकडे बाळाची काय दशा झाली हें अर्थातच ठाऊक नव्हतें. तथापि त्यांच्या मनाला काळजी वाटतच होती. इतक्यांत एक बातमी येऊन पोंचली कीं, 'हरीनें महेश्वराशीं आज मारामारी केली!' ती ऐकतांच त्यांची बाळाविषयींची काळजी थोडी वाढलीच व हरीसंबंधाच्या तिरस्कार-वृत्तींतही ती एक भर पडली. वेणू आणि गोपाळ यांना हरी घरीं आल्यापासून अप्रिय होऊन बसला होता; त्यांनींही हा प्रसंग साधून हरीसंबंधानें खोटेंनाटें सांगून राधाबाईंचें मन त्याजविषयीं आणखी कलुषित करण्याचा प्रयत्न चालविला. इतक्यांत तात्यासाहेब तेथें आले. तोंच तेथल्या सर्वजणींनीं "बाळ कोठें गेला आहे? हरीनें म्हणे कोणालासें मारलें! असलें पोर कशाला घरीं ठेवलें आहे?" इत्यादि प्रकारें कांहीं तरी सांगावयास लागून एकच गर्दी करून सोडली. तेव्हां

" हें अगदीं अशक्य आहे, ' असें म्हणून हरीची बाजू मांडण्याचा त्यांनीं पुष्कळ प्रयत्न केला. पण राधाबाईंची समजूत होईना. तेव्हां शेवटीं ते म्हणाले—" हरीचा तुह्मां सर्वांना जर कंटाळा आला असेल, तर तो आतां आज उद्यां जाणारच आहे. पण तो आहे तोंवर त्याशीं तुम्ही म्हणतां तसें वागणें अगदीं योग्य नाहीं. मला तें मुळींच खपणार नाहीं ! "

तोंच एक बाई बाहेरून गडबडीनें धांवत आली आणि म्हणाली—

" राधाकाकू ! राधाकाकू ! अहो, काय झालें ऐकलेंत का ? बिचारें पोर ! आपला बाळच हो तो ! "

राधाबाई घाबरून म्हणाल्याः—" अग मग ? काय झालें त्याला ? कुठें आहे तो माझा बाळ ? "

बाई म्हणाली—" अहो, नाहीं कांहीं; त्याला कांहीं फारसें लागलें नाहीं म्हणे. हरीनें त्याला बैलाची व कुत्र्यांची झुंज पाहायाला नेलें; आणि तेथें बैलानें बाळाला पाडलें म्हणतात; आणि आतां तुमचा नारायणा त्यास आपल्या खांद्यावरून इकडे आणीत आहे ! "

त्या बाईच्या तोंडून हे शब्द पुरे निघतात न निघतात तोंच राधाबाईनीं ' अग बाई ! ' म्हणून एक किंकाळी फोडली ! आणि लगेच त्या धाडकन जमिनीवर पडल्या ! तोंच आसपासच्या स्त्रिया धावल्या व राधाबाईस उठवून बसवून व वारा घालून सावध करूं लागल्या. तात्यासाहेबांनाही तें ऐकल्याबरोबर काळजी वाटूं लागली; व खरें काय आहे तें समजून घेण्यासाठीं ते दाराशीं धावत गेले. तोंच समोरून कांहीं मुलें, त्यांचे एकदोघे नोकर व त्यांच्या कडेवर बाळ असे येतांना त्यांनीं पाहिले. जवळ येतांच बाळ फार घाबरला आहे, पण त्यास दुसरी कांहीं इजा झालेली नाहीं, असें पाहून त्यांस अंमळ धीर आला व नंतर ते खरा प्रकार काय झाला म्हणून बारकाईनें चौकशी करूं लागले. पण त्यांचें त्या मंडळींशीं बोलणें सुरू होतें न होतें इतक्यांत आंतून राधाबाई धावत आल्या; आणि बाळाला

एकदम उचलून, कडेवर घेऊन, तोंडावरून हात फिरवून ' माझा बाबा, माझा बाबा ' करीत आपल्या मातृप्रेमाचें नेहमींप्रमाणेंच किंबहुना त्याहून अधिक प्रदर्शन करूं लागल्या !

थोड्या वेळानें त्यांचा तो प्रेमाचा उमाळा जरा थंड झाल्यावर त्यांनीं समोरच्या मुलांकडे पाहिलें; व त्यांत हरी तेवढा नाहीं असें पाहून त्या एकदम म्हणाल्या—" तरीच; तरीच तें भिकारडें कार्टें आंत आलें नाहीं बरें! बरें झालें मेल्याला त्या बैलानें चांगलें तुडविलें असलें तर ! तसलेंच तें आहे गुणी ! "

बाळ म्हणाला—आई, कोण तें ? कोणाला तूं म्हणतेस हें ?

राधाबाई—अरे, दुसरें कोण असणार त्या हरीशिवाय ? इकडून त्याचा जेव्हां तेव्हां काय पण कैवार घ्यावयाचा ! त्यानें तर आज माझ्या बाळावर केवढी भयंकर वेळ आणली होती ! पण अंबाबाईनें कृपा केली बरें !

बाळ—काय, हरी ? हरीनें का मला त्या गर्दीत नेलें ? छे छे ! त्यानें तर मीं गर्दींत जाऊं नये म्हणून मला किती तरी वेळ सांगितलें. पण आई, मींच खरें म्हटलें तर बेपर्वाईनें त्याचा उपदेश मनांत आणला नाहीं.

बाळानेंच असें उत्तर दिल्यावर राधाबाई अगदीं चूप झाल्या. मग तात्यासाहेबांनीं विचारलें—" बाळ, तर मग कोण तो इतका मूर्ख, कीं ज्यानें तुला तो खेळ पहावयाला नेलें ? "

बाळ—खरें म्हटलें तर आम्हां सर्वांचाच तो गुन्हा आहे—फक्त एकट्या हरीशिवाय. हरीनें आम्हां सर्वांना न जाण्याबद्दल सांगितलें आणि मला तर तो असें सुद्धां म्हणाला कीं, ' बाळ, घरीं तुझ्या वडिलांना हें कळलें म्हणजे ते घाबरून जातील व काळजी करीत बसतील ! '

आतां तर राधाबाई आपल्या चुकीबद्दल पुष्कळच ओशाळल्या. मग जराशी त्यांची बाजू उचलून धरण्याच्या हेतूनें त्यांची जवळची एक मैत्रीण म्हणालीः—" अहो, तो हरी तसा हुषार आहे हो ! गर्दींत आपण सांपडूं

नये म्हणून स्वारीनें तिकडे न जाण्याचा आग्रह चालविला असेल. भित्रें पोर तें. भारी कसब त्याचें ! ”

त्याबरोबर लागलीच त्यांतून एक मुलगा पुढें होऊन म्हणाला—“ छे छे ! हरी तसा भित्रा नाहीं हो ! कारण बाळानें मारलेली चपराक प्रथम त्यानें अगदीं गरिबासारखी खाल्ली व एकीकडे जाऊन तो रडत बसला, हें पाहून आम्हांलाही तसेंच वाटलें. पण महेश्वरानें शेंडी धरल्याबरोबर हरीनें त्यास जेव्हां हिसडा दिला आणि मग जेव्हां दोघांची जुंपली, तेव्हां हरीच्या अंगचें खरें धाडस आम्हांस पहावयास मिळालें ! अहो, महेश्वर इतका मोठा बळवान्, पण हरीनें शिकस्त करून त्यास चीत केलें; आणि त्यानंतर तरी काय, हरी सारखा आमच्या मागून येतच होता. त्याचें लक्ष सारें बाळाकडे होतें. हें मीं स्वतः पाहिलें. मग जेव्हां तो बैल मोकळा सुटला तेव्हां काय झालें तें मात्र मला ठाऊक नाहीं ! ”

तें ऐकून तात्यासाहेब राधाबाईस म्हणाले—“ पाहिलेंस ? असल्या हरीला घरीं ठेवून घेतला तर तुझें काय बिघडलें ! ” नंतर मुलांना म्हणाले “ मग पुढें काय झालें रे ? बाळ कसा सांपडला व तेथून मग कसा सुटला हें तुम्हांस ठाऊक आहे ? ”

तोंच त्यांचा एक नोकर पुढें झाला व म्हणालाः—“ मी त्या वेळीं तेथें होतों. मीं तो सर्व प्रकार पाहिला. ” आणि नंतर त्यानें घडलेली सर्व हकीकत इत्थंभूत निवेदन केली. त्यांत हरीनें अकस्मात् धावून जाऊन तो खवळलेला बैल बाळाला अगदीं तुडवून जाण्याच्या बेतांत असतां निर्धास्तपणें पुढें होऊन त्याला जी मेख टोचली, व तो बैल परत त्याच्याच अंगावर धावून आला असतां त्यानें झाडाभोंवतीं फिरून जो आपला बचाव केला तें ऐकून सर्वांना अगदीं पराकाष्ठेचें नवल व कौतुक वाटलें. जो तो म्हणूं लागला कीं, “ इतकें धैर्याचें काम, या एवढ्याशा पोरानें केलें ! आणि केवळ आपल्या सोबत्याच्या जिवाकरितां ! धन्य त्याची ! ”

आतां राघाबाईंचा नूर तर फारच मावळला. हरीच्या या वृत्तांताचा सर्वांवर इतका उत्कृष्ट परिणाम झाला कीं, जणूं हरीचे गुण वर्णन करण्यांत आतां तेथें जमलेल्या लोकांत चढाओढच सुरू झाली. तात्यासाहेबांना तर हा सर्व प्रकार ऐकून फार संतोष वाटला. आतां या गुणवान मुलाला पुढें बोलावून पोटाशीं घ्यावा अशा बुद्धीनें ते त्या जमलेल्या मंडळीमध्यें त्यास पाहूं लागले. पण हरी त्यांस कोठें दिसेना. तेव्हां ते म्हणाले— " इतका आमचा उपकारकर्ता हरी, तो सध्यां कोठें आहे? तो तुम्हां सर्वां-बरोबर इकडे परत कसा आला नाहीं ! बिचारें पोर आणखी एखाद्या अडचणींत सांपडलें नाहीं ना ! " व असें म्हणून ते हरीसंबंधानें फारच चिंताक्रांत झालेले दिसले.

तोंच एकानें सांगितलें—" नाहीं, नाहीं; हरीला बहुधा लागलें नाहीं. आतांच तो आपल्या गुरुजींच्या घराकडे जातांना मीं रस्त्यावर पाहिला. "

तात्यासाहेब म्हणाले—तो तिकडे गेला ! तर मग खरोखरच या मुलांनीं त्याला विशेष त्रास दिला असावा. कारण त्याशिवाय तो असा मला न विचारितां परभारें एकदम जावयाचा नाहीं. हो, मघाशीं तो कोण बरें म्हणत होता कीं, हरीनें एक चपराक सोसली म्हणून ! बाळ, तूं तर नाहींना दिलीस ! आपल्या इतक्या उत्कृष्ट सोबत्याशीं तूं असा कृतघ्नपणा केलास काय ! खरें सांग बरें !

त्याबरोबर बाळानें मान खालीं घातली. लागलीच डोळे पाण्यानें भरून येऊन अश्रु गालावर ओघळूं लागले; आणि गाल लाल झाले. तें पाहून लागलीच राघाबाई पुढें झाल्या, व तात्यासाहेबांनीं त्यास आणखी कांहीं विचारूं नये म्हणून, त्या त्यास कडेवर घेऊन घरांत निघाल्या. पण लागलीच तात्यासाहेब म्हणाले– " हां, पुरे झाला आतां लडिवाळपणा ! ही वेळ नव्हे त्याला कडेवर घ्यावयाची व त्याचें कोड करावयाची ! किती हलकेपणा व मूर्खपणा आहे यांत याचा, तें कळलें काय ! हें वर्तन

म्हणजे माणसाला लाज वाटायला लावणारें आहे. यानेंच त्या हरीस चप-राक मारली, दुसरें काय ? त्यायोगें त्यानें त्यालाच नव्हे तर आपल्याला सुद्धां काळोखी लावली आहे ! ”

आतां तर बाळाला आपला हुंदका अनावर झाला ! आणि आता त्याच्या डोळ्यांतून अश्रूंच्या धारा चालल्या. मग राधाबाईस राहवेना. त्यांनीं त्यास तसेंच एकदम घरांत नेलें. त्याबरोबर त्यांच्या सर्व मैत्रिणींनींही तो दिवाणखाना रिकामा केला. जातां जातां राधाबाई पुटपुटल्याच,—“ बिचारें सोन्यासारखें एकुलतें एक पोर, त्यास बोलायचें तरी किती ? त्याचा एवढा काय मोठा गुन्हा झाला तरी ? आणि त्याचें प्रायश्चित्त तरी त्यास आतांपर्यंत काय थोडें झालें आहे ? ”

राधाबाई आंत गेल्याबर लागलीच तात्यासाहेबांनीं, ज्या मुलानें बाळानें हरीस मारल्याबद्दल सांगितलें होतें, त्यास एकीकडे बोलावून घेतलें व त्यास त्यासंबंधीं आणखी बरेच प्रश्न केले. त्या मुलालाही त्यासंबंधांत कांहीं लपवालपवी करणें जरूर नसल्यामुळें त्यानें तें भांडण जसेंच्या तसेंच तात्या-साहेबांना सांगितलें. दुसऱ्या मुलांनीं फार चिडविल्यामुळें बाळानें हें केलें, असें म्हणून त्यानें बाळाची बजू थोडीशी सावरली खरी, तरी एकंदर हकीगत ऐकून बाळाच्या अन्यायाची व दांडगाईच्या वर्तनाबद्दलची गोष्ट तात्यासाहेबांच्या मनाला अगदीं खोल लागून राहिली.

असो, पण हरी कोठें आहे ?



# ४४ गुरुजींच्या घरीं.

बाळाला नेण्यासाठीं तात्यासाहेबांचे घरचीं माणसें आलीं, व त्यांनीं त्यास उचलून सुरक्षितपणें घराकडे चालविलें. असें पाहून हरीची एक काळजी दूर झाली. मग त्यांजबरोबरच तात्यासाहेबांच्या घरीं त्यानें यावें, पण त्याचें पाऊल पुढें पडेचना. घरांतील सर्व माणसें तर आपला पूर्ण कंटाळा करतात हें त्यास आधींच कळून चुकलें होतें. तात्यासाहेब जरा बरें पाहात, प्रेमही दाखवीत; पण "आपला जो मुख्य जिवलग बाळ, त्याचें मन आपल्यासंबंधांत अतिशय कलुषित झालें असून, आज तर चपराक मारून त्यानें त्याचा कळस केला; तर आतां त्याजबरोबर तात्यासाहेबांच्या घरीं जाऊन आपणास काय करावयाचें आहे," असें त्या गरीब स्वाभिमानी मुलास साहजिकच वाटूं लागलें. ध्रुवाची गोष्ट त्यानें नुकतीच ऐकिली होती. तिचें त्यास स्मरण झालें, व वाटेंतील ती सर्व मुलांची वर्तणूक पुनः त्याच्या डोळ्यासमोर उभी राहतांच त्यास पराकाष्ठेचें वाईट वाटलें ! तो रडूं लागला; व बराच प्रयत्न करूनही त्यास आपले हुंदके आवरतां येईनात. सायंकाळ होत आली व खेळ पाहण्यास आलेल्या लोकांपैकीं आतां कोणीच कोठें दिसेनासे झाले. आतां आपण येथें किती वेळ थांबणार, असें त्यास वाटूं लागलें. आतां परस्पर घरींच जावें असा विचार प्रथम त्याच्या मनांत आला. पण आपण गुरुजींच्या सांगण्यामुळें बाळाचे घरीं गेलों. तर त्यांस भेटल्याशिवाय तरी घरीं जाणें योग्य नाहीं, असें वाटून त्यानें आतां आपलें पाऊल शास्त्रीबोवांच्या घराकडे वळविलें. डोळ्यांतून अश्रु अद्याप चाललेच होते; व अपमान असह्य होऊन अक्षय्य पदाचा शोध करण्यासाठीं एकाकी अरण्यांत चाललेल्या ध्रुवाची मूर्ति सारखी त्याच्या डोळ्यापुढें उभी होती. "नको हे श्रीमंत लोक व नको ही त्यांची संगति ! ध्रुवानें एवढ्या मोठ्या राज्याचा त्याग केला; मग आपणास तरी या श्रीमंत व बडे लोकां-

अशा संगतींत राहण्याची गरज काय ? ध्रुवानें अरण्यांत जसा वास केला, तसा आतां आपणही रानांत आपल्या झोंपडींत जाऊन करूं; आणि मोट धरीत, किंवा उसाला पाणी पाजीत, आपल्या पिकांशीं खेळत आपले दिवस घालवूं. आतां आपणास हे मोठे लोक नकोत; व हें मोठें शहरही नको. ध्रुवाला नारदमुनि भेटले, त्याप्रमाणें आपले गुरुजी आपल्याला सर्व गोष्टी कशा प्रेमानें शिकवितात ! आम्ही नसलों तर त्यांस अगदीं चैन पडत नाहीं. आठ दिवसांपूर्वी मी आणि बाळ उत्सवास जाण्याकरितां त्यांचा निरोप घेऊन जेव्हां तात्यासाहेबांच्या टांग्यांत चढलों, तेव्हां त्यांच्या डोळ्यांतून पाणी आलें ! केवढें हें त्यांचें आपल्यावर प्रेम ! आणि नित्य नवानवा बोध किती गोड ते देतात ! गोष्टी तर त्यांजवळ किती भरल्या आहेत कोण जाणे. आणि आपल्यालाही आपल्या शेतीसारख्या शारीरिक व्यवसायांत ज्ञानाची कांहींतरी जोड करून ठेविली पाहिजे. ज्ञानाशिवाय खरें सुख तें काय ! तेव्हां असे आपले अत्यंत प्रेमळ गुरुजी, आपल्यास रोज अमृत पाजणारे, त्यांना न भेटतां आपण घरीं जाणें योग्य नाहीं; आणि तेही आपली वाट पहात बसले असतील. आतां त्यांसच ही झालेली सर्व हकीगत जाऊन सांगावी व मग त्यांच्या आज्ञेनें घरीं जावें. " असें हरीनें ठरविलें व तो तिकडे निघाला.

गुरुजींची मूर्ति दाराशींच उभी होती. त्यांस पाहतांच पुनः हरीच्या नेत्रांतून पाणी आलें. तें त्यानें पुष्कळ लपविलें, तरी तें गोविंदशास्त्र्यांच्या ध्यानांत आल्याशिवाय राहिलें नाहीं. लागलीच त्यांनीं " हरी, काय रे झालें ? " म्हणून प्रश्न केलाच. मग जरा थांबून आपला हुंदका आवरून हरीनें क्रमानें सर्व हकीगत त्यांस सांगितली. ती सर्व ऐकून गुरुजींना बरेंच वाईट वाटलें. ते म्हणाले—" हरी, शेवटीं तुम्ही ज्या प्रेमानें येथून गेलां तें प्रेम व ती गोडी तुमच्यांत राहिली नाहीं तर ! याबद्दल मला विशेष वाईट वाटतें. "

हरीः—" गुरुजी, मलासुद्धां या गोष्टीचेंच फार वाईट वाटतें. पण मला असें वाटतें कीं, मी आपल्याकडून बाळाच्या संबंधांत एकही चूक केली नाहीं. तो माझ्याशीं नीट वागला नाहीं असें जरी मला अद्याप वाटतें, तथापि त्याच्याबद्दलचें माझें प्रेम अगदीं कमी झालेलें नाहीं. त्याला कोणतीही दुखापत वगैरे झालेली नाहीं, हें मीं पाहिलें; व त्यास त्याचीं माणसें येऊन घेऊन जात तोंपर्यंत त्याला मीं सोडिलें नाहीं."

गुरुजीः—पण हरी, एक गोष्ट थोडीशी चुकलीच. कारण तूं आज तात्यासाहेबांना न भेटतांच इकडे निघून आलास; आणि तुझ्या मित्रालासुद्धां तूं जातों म्हणून कळविलें नाहींस! तात्यासाहेब तरी तुझ्याशीं फार अगत्यानें वागत होते, हें खरें ना!

हरीः—ही चूक माझ्याकडून होत आहे असें मलाही थोडेंसें वाटत आहे. पण गुरुजी, या प्रसंगीं मला दुसरें काय करतां येण्याजोगें होतें हें सांगा बरें? 'या गर्दींत तूं जाऊं नको; घरीं राधाबाई फार काळजींत पडतील व तात्यासाहेबही रागें भरतील' म्हणून मीं बाळास किती तरी वेळां कळवळून सांगितलें. पण शेवटीं सोबत्यांच्या नादीं लागून त्यानें तसा उपदेश केल्याबद्दल मलाच मारिलें! मीं तें सर्व मुकाट्यानें सोसून घेतलें. पण इतकें झाल्याबर मला त्याच्या घरांत जायला कांहींच आधार नाहीं असें वाटलें. कारण आपला मित्रच आपल्या उलट झाल्याबर मीं तेथें बोलावें-चालावें कोणाशीं? झालेली गोष्ट घरांत तात्यासाहेबांस सांगूं जावें तर आपणच आपल्या मित्राविरुद्ध तक्रार केल्यासारखें होणार.—चहाडी केल्यासारखें होणार! व तसें कांहीं न सांगावें तर 'बाळ व तूं आतां पूर्वीप्रमाणें कां वागत नाहीं?' म्हणून कोणी विचारल्यास काय उत्तर द्यावें? मग लोकांना असें सहजच वाटावयाचें कीं, पोर किती कृतघ्न आहे पहा! आठ दिवस उत्सवांत जेवून खाऊन शेवटीं बाळाशीं नीट बोलतही नाहीं! कारण बाळानेंच मला दूर केलें आहे हें त्यांस कळणार कसें? म्हणून मग

मीं तिकडे न जातां इकडेच यावयाचें ठरविलें ! आतां घरीं कामें बरींच आहेत, तेव्हां त्यासाठीं आतां कांहीं दिवस घरींच राहावयास जावें लागणार आहे. तरी त्यास तुमची परवानगी मिळाली म्हणजे बरें.

गुरुजी:—हरी, खरोखर तूं फारच सुस्वभावी मुलगा आहेस ! तुझें मन फार थोर असून तुला संकटांत सांपडलेल्या सर्वांचा कळवळा येतो. याबद्दल मला किती तरी आनंद वाटतो ! याच कारणानें हरी, आतांपर्यंत तूं जें केलेंस तें सर्वच मला पसंत आहे. पण हरी, बाळानें एक वेळ जी चूक केली तिजबद्दल त्याची मैत्री तूं आतां कायमची सोडून देणार काय ?

हरीः—छे छे. त्याच्यावरचें माझें प्रेम कमी होणार नाहीं. पण आम्ही आपलीं गरीब माणसें. आपण असल्या श्रीमंतांच्या संगतीस कशाला लागावें ? खरोखरच गुरुजी, आपला तिरस्कार करणाऱ्या या लोकांचें नांव नको असें मला वाटतें. बाळ व त्याचे श्रीमंत सोबती खुशाल एकमेक खेळूं द्या. मी आपला माझ्या बरोबरीच्या मुलांशींच संगति करीन. पण गुरुजी, मीं त्याची संगति सोडली असें म्हणण्यापेक्षां त्यानेंच माझी संगति सोडली हें म्हणणें अधिक बरोबर नाहीं काय ?

गुरुजी:—पण बाळ जर तुझी क्षमा मागावयास आला तर ?

हरी:—क्षमा कसली ? मी त्याचा राग आतां मनांत धरलेला नाहीं. मला ठाऊक आहे कीं, बाळ जरा रागीट व हट्टी आहे; तरी त्याचें अंतः-करण कांहीं वाईट नाहीं; आणि माझी अशीही खात्री आहे कीं, त्या दुसऱ्या मुलांनीं जर त्यास भरीस घातलें नसतें, तर तो माझ्याशीं असें चमत्कारिक वर्तन करता ना.

गुरुजी:—मला वाटतें, बहुधा बाळाला आपल्या वर्तनाचा पश्चात्ताप होईल. तेव्हां यापुढें तो असें कांहीं करील अशी शंका धरावयास नको. तथापि तो स्वतः तसें कबूल करीपर्यंत आपणांस त्याचा तसा विश्वास धरतां येणार नाहीं हें मात्र खरें.

याप्रमाणें बोलणें होऊन हरी आपल्या शेतीच्या कामासाठीं आपल्या घरीं गेला. आणि सकाळीं उठून गोविंदशास्त्री तात्यासाहेबांस भेटण्याकरितां त्यांच्या घरीं आले.

---

# ४५ तुळशीदास.

गोविंदशास्त्री म्हणजे अत्यंत निस्पृह गृहस्थ. ते आज न बोलावतां तात्यासाहेबांच्या घरीं आलेले पाहून त्यांस फार आनंद झाला. त्यांनीं मोठ्या प्रेमानें त्यांचा सत्कार केला. नंतर इकडच्या तिकडच्या गोष्टी चालतांच, तात्यासाहेबांचें मन एकाद्या चिंतेनें व्याप्त झाल्यासारखें सहजच दिसून आलें. तेव्हां शास्त्रीबोवांनीं त्याचें कारण ओळखून लागलीच प्रश्न केला:-" बाळ कोठें आहे ? आणि कालच्या खेळाच्या गर्दींत काय काय प्रकार झाला ? त्याला कांहीं दुखापत तर झाली नाहीं ? "

तेव्हां तात्यासाहेबांनीं हरीनेंच सांगितलेली हकीगत त्यांस पुन: सांगून ते म्हणाले:—" शास्त्रीबोवा, हरीसारख्या मुलाच्या यानें तोंडांत मारावी, या गोष्टीनें काय सिद्ध होतें ? खरोखर, आतां हा निवळेल, अशी आशा आतां कांहीं मला वाटत नाहीं. तुम्हीं इतकें कळकळीनें शिकविलेंत; आज आठ महिने सारखा प्रयत्न केलात; पण तो या पोरानें सर्व व्यर्थ घालविला ! पालथ्या घागरीवर पाणी. त्याच्या कालच्या या गोष्टीवरून असें दिसतें कीं, एका उद्दामपणाशिवाय त्याला दुसरी एकही गोष्ट ठाऊक नाहीं. इतका कृतघ्नपणा व इतका उद्दामपणा, शास्त्रीबोवा, मला वाटतें, दुसऱ्या कोणत्याही मुलाजवळ आढळणार नाहीं ! आतां मला यासंबंधांत आशा धरावयाला काय जागा आहे ? " आणि असें म्हणून ते अत्यंत चिंताक्रांत होऊन राहिले !

शास्त्रीबोवा म्हणाले:—घडला हा प्रकार वाईट घडला यांत शंका नाहीं.

पण तात्यासाहेब, एवढ्यावरून तुम्ही म्हणतां तशी माझी कल्पना होत नाहीं. बाळ अंतःकरणाचा चांगला आहे, त्यामुळें तो सुधारण्याचा प्रयत्न करण्याला भरपूर वाव आहे असें अद्याप मला वाटतें. हा फक्त संगतीचा परिणाम आहे. लोकांच्या हातून जीं दुष्ट कृत्यें घडतांना आपण पाहतों तीं सर्वच त्यांच्या दुष्ट बुद्धीमुळें झालेलीं असतात असें नाहीं. मी तर असें खास ह्मणतों कीं, मनुष्याच्या अंतःकरणांत दुष्टपणा मूळचा नाहीं. पण मनाचा कमकुवतपणा मुख्यत्वेंकरून त्याजकरवीं वाईट गोष्टी घडविण्यास कारण होतो. तेव्हां मनुष्याची सुधारणा करण्याला, संगतीनें व उदाहरणानें त्याच्या मनाची निश्चयशक्ति वाढविणें हेंच फक्त आवश्यक आहे. चांगल्याची आवड त्याचे ठिकाणीं स्वाभाविकच आहे. त्यामुळें या प्रसंगीं निराश होण्याचें मला कारण दिसत नाहीं.

तात्यासाहेबः—शास्त्रीबोवा, आपण माझी समजूत करीत आहां एवढेंच. पण काय हा उच्छृंखलपणा ! केवढी ही दांडगाई ! हा काय राग म्हणावयाचा ! मला याचें अद्याप सारखें नवल वाटत आहे ! रात्रीं मला निवांतपणें झोंप आली नाहीं शास्त्रीबोवा ! सारखा हा विचार मनांत !

शास्त्रीबोवाः—हा राग व हा उच्छृंखलपणा एकपक्षीं भयंकर आहे, यांत शंका नाहीं; पण त्यास योग्य वळण लावलें तर त्यालाच उत्कृष्ट फळ येईल अशी माझी खात्री आहे. इतिहासांत व आपल्या रोजच्या व्यवहारांतही अशीं पुष्कळ उदाहरणें आपणांस पाहावयास मिळतील कीं, कधीं कधीं असल्या मनोवृत्तीमुळें मनुष्य जरी भलत्या आचरणास प्रवृत्त होतो, तरी मनुष्याला पुनः सन्मार्गावर आणून दृढ करण्याला असल्या तीव्र मनोवृत्तिच कारण होतात. तुळशीदासाचें आख्यान तुम्हांला माहीत असेलच. स्त्रीप्रेमाची त्याची वृत्ति एकदम पालटून ईश्वरभक्तीकडे वळली; व त्यायोगें तो पुढें मोठा भगवद्भक्त म्हणून प्रसिद्ध झाला. अपमानाची चीड येऊन ध्रुव हा परमेश्वरप्राप्तीस लागला व शेवटीं ध्रुवपदास कसा पोंचला हेंही तुम्हीं

ऐकलेंच असेल.

तात्यासाहेब:—शास्त्रीबोवा, माझे सगळे दिवस आजपर्यंत खेड्यांत व शेताभातावर फिरण्यांत गेले. फारशीं कथापुराणेंही मीं ऐकिलीं नाहींत. आणि एकादें पुस्तक घेऊन वाचावयालाही मला सवड मिळाली नाहीं; त्यामुळें साधुसंतांच्या गोष्टी मला फारशा ठाऊक झाल्या नाहींत. याचें मला आतां एकादे वेळीं वाईट वाटतें. ध्रुवाची गोष्ट परवां कथेंत मीं ऐकली; परंतु तुळशीदासाची गोष्ट मला माहीत नाहीं.

मग शास्त्रीबोवा सांगूं लागले:—

तुळशीदास हा श्रीरामभक्तींत अहर्निश रंगून गेलेला एक प्रसिद्ध साधु-पुरुष होऊन गेला. हा फार उत्कृष्ट कवि असून त्यानें हिंदी भाषेंत रामाचें सर्व चरित्र गायिलें आहे. ‘तुळशीरामायण’ म्हणून त्याचें नांवही प्रसिद्ध आहे. उत्तरहिंदुस्थानांत तर तें वाल्मीकिरामायणापेक्षांही फार चाहतात. भक्तिविजयांत त्याचें सर्व चरित्र वर्णन केलें असून, तें इतकें सोपें आहे कीं, लहान मुलामुलींनाही तें समजतें. पण हा तुळशीदास एवढ्या मोठ्या पदाला चढला कसा, तें विशेष लक्षांत ठेवण्याजोगें आहे. त्याच्या स्त्रीनें त्याला श्रीरामभक्तीकडे वळविलें! तोंपर्यंत त्याच्या हृदयास ईश्वरभक्तीची ओळखही नव्हती. त्याच्या स्त्रीवर त्याचें प्रेम फार असे. तिच्याशिवाय त्यास कधीं चैन पडत नसे. त्यामुळें तिला माहेरीं जाण्याचा प्रसंग कधीं मिळत नसे. पण पुष्कळ दिवस झाले, आपल्याला आपलें माहेर असून नाहींसें झालें आहे, या गोष्टीचा त्याच्या बायकोस फार खेद वाटूं लागला. मग एकदां माहेरचें बोलावणें आलें असतां, तुळशीदास बाहेर स्नानास गेले आहेत असें पाहून, सासूसासऱ्यांना मात्र कळवून, ती फक्त एकाच दिवसाच्या सवडीनें माहेरीं गेली!

इकडे तुळशीदास घरीं येऊन पाहतात तों आपली पत्नी कोठें दिसेना. मग मातुश्रीस विचारतां, ती नुकतीच माहेरीं गेल्याचें कळलें. मग तुळशी-

दासांस दम कोठचा ! जेवण वगैरे काहींएक न करतां तुळशीदास तसेच थेट आपल्या सासुरवाडीकडे चालले. त्यांना असे उघडे बोडके रस्त्यानें जातांना पाहून लोक सारे आश्चर्य करूं लागले. पण तुळशीदासांचें लोकांकडे लक्ष कोठें होतें ? त्यांचा सारा लय लागलेला आपल्या पत्नीकडे ! मग याप्रमाणें स्वारी चालतां चालतां रात्रीच्या सुमारास आपल्या सासुरवाडीस जाऊन पोंचली.

तुळशीदासांचें आपणावर फार प्रेम आहे हें जरी त्यांच्या पत्नीस ठाऊक होतें, तरी ही स्वारी इतकी तातडीनें आपले शोधास येईल अशी तिला कल्पनाही नव्हती. त्यामुळें व पुष्कळ दिवसांनीं आपले आईबाप भेटले या आनंदामुळें तुळशीदासांच्या आगमनाची तिला व दुसऱ्या कोणालाही कल्पना नव्हती. त्यामुळें रात्रीस तुळशीदास तेथें येऊन पोंचतात तों सर्वत्र सामसूम झालेलें. आंत कडी काढण्यास कोणीच जागें नाहीं असें त्यांस आढळून आलें. मग आतां आंत कसें जावें अशा मोठ्या विचारांत ते पडले. तोंच जवळच एक खिडकी उघडी असलेली त्यांस आढळली. मग तिकडे पाहूं लागतात तों खिडकींतून एक दोर खालीं लोंबत आहे आहे असें त्यांनीं पाहिलें. मग त्यांस मोठा आनंद झाला. आपल्या पत्नीनेंच तो दोर आपणासाठीं सोडलेला आहे असें वाटून, त्या आनंदाच्या भरांत त्यांनीं तो दोर पकडला व त्यास धरून सरासर सरासर ते वर चढले ! मग खिडकींतून आंत शिरतात तोंच तेथें आपली पत्नी बिछान्यावर पडून राहिलेली त्यांस दृष्टीस पडली. मग त्यांचा आनंद काय विचारावा ! इतक्या महाप्रयासानें आपण आल्याप्रमाणें आपली पत्नी आपणास भेटली, या भरांत ते अगदीं देहभान विसरून गेले !

मग ती आनंदसागराची भरती जरा कमी होतांच पत्नीनें विचारलें:—नाथ, आपण या खिडकीवाटे कसे कोठून आलांत ?

तुळशीदासांनीं उत्तर दिलें:—कसे म्हणजे ? तूं जो दोर सोडून ठेवला,

होतास त्याला धरून मीं वर आलों !

पत्नीः—कोठला तो दोर ? मीं कधीं सोडून ठेवला होता ?

तुळशीदासः—तूं नव्हता सोडलास ? मग कोणीं सोडून ठेविला होता ?

तें ऐकून त्यांचे पत्नीला मोठें आश्चर्य वाटलें. मग ती दिवा पुढें करून त्या खिडकीकडे येऊन पाहूं लागली, तों एक मोठा थोरला साप त्या खिडकीशीं असलेल्या एका बिळांत थोडा शिरला असून बाकी सर्व खालीं लोंबत आहे असें दिसून आलें ! त्याबरोबर ती चपापली ! ती म्हणाली—"नाथ ! हाच का तो दोर ? हा दोर नव्हे; हा एक मोठा साप आहे ! पहावा पुढें येऊन हवा तर !" असें म्हणून तिनें तो तुळशीदासांस दाखविला. तेव्हां तुळशीदास म्हणाले—"असेना ! साप काय आणि दोर काय दोन्ही एकच."

पण या उत्तरानें त्यांच्या पत्नीस वाटलेलें आश्चर्य कमी न होतां तें वाढलें. ती म्हणाली—नाथ, काय हें धैर्य ! हें एवढें जिवावरचें धैर्य, पण कशासाठीं ? माझ्या या एवढ्या देहकांतीसाठीं ? आणि ही देहकांति अशी किती काळ टिकणार आहे ? दोन वर्षांनीं, चार वर्षांनीं ही सर्व मावळणार. आणि मग वार्धक्यानें शुष्क झालेली ही आपली पत्नी आपल्याला अगदीं नकोशी होणार ! इतकी जी क्षणभंगुर वस्तु, तिच्यावर नाथ ! आपण एवढें प्रेम करावें काय ? इतकें थोर प्रेम, नाथ ! एकाद्या मर्त्य जीवावर करण्यापेक्षां सर्वसमर्थ व सर्वसुंदर प्रभु लक्ष्मीकांतावर केलें तर त्याचा केवढा उपयोग होईल बरें ! तो सर्व जगाचा अधिपति त्या प्रेमभक्तीनें वश झाला तर मग जगांत आपणांला काय उणें आहे ? सर्व सृष्टि आपली ! चंद्र-सूर्य आपले ! सर्व सौंदर्य आपल्या घरीं ! मग कशाचा तोटा ? व कशाची उणीव ? सर्व सुख आपल्या घरीं चालून येऊन, दुःखाचा लेशही मग आपणांस भासणार नाहीं. मग असा सर्वसमर्थ परमेश्वर श्रीविष्णु सोडून, हे नाथ ! आपण या क्षुद्र स्त्रीदेहावर प्रेम करतां व तें एवढें अलोट

करतां, हें योग्य आहे काय ? वैषयिक प्रेम तुच्छ आहे; दुःखदायी आहे, पण ईश्वरी प्रेम हें सर्वश्रेष्ठ असून सदोदित सुखमय करून ठेवणारें आहे. नाथ ! हें मीं आपणांस सांगावें असें नाहीं; पण ज्या प्रेमानें आपण एव्हा-वर या अंधाऱ्या रात्रीं धांव घेतली व सर्पाचा दोर बनविला, त्याच प्रेमानें मी आपणांस विनंति करतें कीं, आपण हें सर्व प्रेम या देहावरून काढून श्रीरामाच्या ठिकाणीं लावा ! आणि निरंतर सुख प्राप्त करून घ्या ! नश्व-रचें आपलें प्रेम आपणांस किती दिवस बरें रमवील ? तारुण्याचा भर कमी झाला कीं, स्त्रीचें सर्व सौंदर्य व्यर्थ; मग तें मनास रमविण्यास समर्थ असत नाहीं. मग अशा वेळीं आपल्या जिवास सुख व्हावयास आपल्याजवळ काय उपाय आहे बरें ? तर आपण आतांच सावध व्हावें, आणि या क्षुद्र विषयांची आसक्ति सोडून श्रीहरीच्या प्रेमामृतांत रंगून जावें, हेंच योग्य आहे."

याप्रमाणें पत्नीनें बोध केल्यावर त्याचा तुळशीदासारख्या रंगेल तरुणावर काय परिणाम व्हावा बरें ! पण पहा, एवढे हे साधेच विचार ऐकून तुळ-शीदासांचें मन बदललें ! त्यांस तो उपदेश मोठा परिणामकारक झाला. त्यांची पत्नी सात्विक होती, व असल्या शारीरिक विषयी प्रेमाचा खरोखर तिला कंटाळा होता. 'इंद्रियांचे विषय सेवन करणें नेहमीं मर्यादित असावें, व त्यायोगें शेवटीं मन विषयपराङ्मुख व्हावें हें साध्य साधावयाचें आहे,' हा धार्मिक बोध त्या साध्वीच्या अंतःकरणावर आधींपासूनच ठसला होता. मग अशा सात्विक गुरूनें, आपल्या अगदीं प्रेमाच्या मनुष्यानें, अंतःकरणाच्या कळकळीनें केलेला उपदेश व्यर्थ कसा जाईल ? लागलीच तुळशीदासांनीं आपल्या स्त्रीस गुरु केलें व त्या दिवसापासून ते श्रीरामचंद्राच्या प्रेमांत तल्लीन होऊन गेले ! त्यांनीं केलेल्या श्रीरामगुणगानानें आज सारें उत्तर हिंदुस्तान श्रीरामभक्तीची नित्य नवी मेजवानी करून घेत आहे ! आतां त्यांच्या श्रीरामप्रेमाची थोरवी काय वर्णावी ?

याप्रमाणें गोष्ट सांगून शास्त्रीबोवा पुढें म्हणाले—म्हणून तात्यासाहेब,

एवढ्या एका दांडगाईच्या वृत्तीमुळें तुम्हीं आशा सोडूं नये, असें माझें तुम्हांस सांगणें आहे. कारण हाच मोठेपणाचा अभिमान आणि हाच अहाल स्वभाव भलत्या वाटेला लावला तर जसा मुलाला हूड आणि अनावर करून ठेवील, तसाच तो नीट वाटेला लावला तर मुलास उत्कृष्ट शीलवान् बनवून त्याच्या स्वतःच्या व त्याच्या संगतीच्या लोकांस उपकारक झाल्यावांचून राहणार नाहीं.

तात्यासाहेबः—ही तुळशीदासांची गोष्ट मोठी छान सांगितलीत. माझ्या मुलालाही जर असे उत्कृष्ट गुरु तुम्ही व्हाल, तर अंशतः तरी तो पुढें थोर निपजेल अशी मी आशा करितों. पण शास्त्रीबोवा, प्रस्तुत प्रसंगीं या मुलाला कोणतें शासन करणें योग्य असें तुम्हांस वाटतें?

शास्त्रीबोवा:—त्यासाठीं सध्यां त्याच्या मनांत काय विचार चालले असतील ते पाहिले पाहिजेत. तेव्हां सध्यां त्याला या संबंधांत तुम्ही कांहींच बोलूं नका. चार दिवस जाऊं द्या, म्हणजे मग काय करावयाचें तें आपणांस ठरवितां येईल.

मग तात्यासाहेबांनीं शास्त्रीबोवांला जेवणास राहण्याचा आग्रह केला, त्यांनींही तें आमंत्रण मान्य केलें. जेवावयाचे वेळीं राधाबाईनींही त्यांशीं फारच अगत्याचें वर्तन केलें. परंतु बाळ, जो या सर्व आठवड्यांत सर्वांचा कौतुकाचा विषय होऊन राहिला होता, व ज्याचें तोंड सारखें चुरचुर चाललेलें असावयाचें, तो आतां अगदीं चोरासारखा चूप राहिला! गुरुजींच्या पुढें आला कीं, तो अत्यंत नम्र दिसे; आणि त्यांनीं जें कांहीं त्यास विचारावें त्याचीं मोठ्या आदरानें व विनयानें उत्तरें देई. पण एवढ्या सर्व प्रसंगीं त्यानें मान वर करून कांहीं गुरुजींकडे पाहिलें नाहीं; व त्याच्या चर्येकडे पाहिलें असतां, तो मनांतल्या मनांत कशाबद्दल तरी खेद करीत आहे असें दिसत होतें. जेवण झाल्यानंतर, बरीचशी पाहुणेमंडळी निरोप घेऊन आपापल्या घरीं गेली. त्याबरोबर बाळाचे ते सर्व मित्रही गेले!

# ४६ पश्चात्ताप झाला.

याप्रमाणें उत्सव संपवून पाहुणेमंडळी आपापल्या घरीं गेली. आतां घरांत तात्यासाहेब, राधाबाई, बाळ व आजचे पाहुणे गोविंदशास्त्री एवढेच लोक राहिले. भोजनोत्तर पानसुपारी वगैरे झाल्यानंतर तात्यासाहेब जराशी वामकुक्षी करावयास गेले, व दिवाणखान्यांत आतां एकटे गोविंदशास्त्रीच काय ते राहिले. तेव्हां ती एकांत वेळ पाहून बाळ हळूच दारांतून आंत आला; व मनांत कांहीं तरीं बोलावयाचें आहे, पण बोलावयाला ओठ तर धजत नाहींत, अशा प्रकारें शास्त्रीबोवांच्या बाजूस येऊन उभा राहिला. तें पाहून शास्त्रीबोवांनीं मोठ्या कनवाळूपणानें त्याजकडे वळून, त्याचा हात धरून, त्यास पुढें जवळ बसविलें; आणि 'बाळ! काय मनांत आणिलें आहेस? बोल.' असा त्यास प्रश्न केला.

बाळ म्हणाला:—गुरुजी, मी सांगूं कां? माझ्याकडून एक कृतघ्न-पणाची व उद्दामपणाची गोष्ट घडली!

गुरुजी:—चिंता नाहीं. आपण चुकलों असें आपणाला कळणें म्हणजे ती चूक निम्याच्या वर सुधारणें आहे. तेव्हां काय तुला सांगावयाचें आहे तें सांग, भिऊं नको. त्यासंबंधीं तुला हवी ती मदत मी करीन.

बाळ:—पण गुरुजी, मीं असा अपराध केला आहे कीं, तुम्ही रागावून मला कांहीं तरी शिक्षाच सांगावी; क्षमा करूं नये. कारण मी खरोखर अशी एकादी शिक्षाच भोगण्याला योग्य आहें.

गुरुजी:—पण जर तुला तुझा अपराध कळला आहे, तर पुढें तसें कांहीं आपल्याकडून घडूं नये अशी दक्षता तुला घेतां येईलच. मग तुझ्यावर रागावण्याचें मला काय कारण आहे? नाहींतर ज्यांच्याकडून चूक होतच नाहीं अशीं माणसें कोण कोठें आहेत?

बाळ:—पण गुरुजी, इतके दिवस मी तुमच्यापाशीं राहिलों, आणि

तुम्ही माझी सुधारणा करण्याकरितां किती तरी श्रम घेतले; व सर्वांशीं चांगलें कसें वागावें: हें नाना प्रकारच्या गोष्टी सांगून शिकविलेंत; पण मी तुम्हांला सोडून चार दिवस येथें आल्याबरोबर तें सर्व पार विसरलों आणि पूर्वींपेक्षां अधिक बिघडलों !

गुरुजी:—पण ' मी अधिक बिघडलों ' असें अगदीं स्पष्ट, तूं स्वतःच स्वतःसंबंधीं कां म्हणतोस ? तुझ्यांत थोडासा अविचार व उतावळेपणा हे दोन दोष पूर्वींपासूनच आहेत, ते कांहीं तुझे पूर्ण सुटले नाहींत, हें मी आधींच सांगतों; मग त्याचीच गोष्ट तूं सांगणार असशील ?

बाळ:—पण, या वेळचा माझा अपराध त्याहीपेक्षां मोठा आहे. मी उद्दामपणानें व कृतघ्नपणानें वागेन असें तुम्हांला कधीं वाटलें होतें कां ?

गुरुजी:—मला वाटतें तूं कांहीं तरी म्हणत आहेस. ज्याला उद्दामपणा व कृतघ्नपणा हीं नांवें देतां येतील असें वर्तन तुझ्याकडून घडलें असेल असें मला वाटत नाहीं.

बाळ:—पण मी तें सर्व आतां तुम्हांला सांगतों. मग तुम्हीच त्याला काय नांव द्यावें तें सांगा. प्रथम मी जेव्हां तुमच्याकडे शिकण्यास येऊं लागलों, तेव्हां " आम्ही इनामदारांचीं मुलें म्हणजे फार थोर, व इतर गरीब लोक, ते सर्व क्षुद्र " असें मला वाटत असे, हें तुम्हांला ठाऊकच आहे. पण पुढें मला लौकरच ती चूक कळून आली. कारण मला असें आढळलें कीं, मीं ज्यांना क्षुद्र लेखतों त्यांना जे कित्येक उद्योगधंदे करण्याचें ज्ञान आहे तें आम्हांला नाहीं. आम्ही फक्त आपलें बसून खावें व रिकामें हिंडावें; एकही उपयोगाची गोष्ट कांहीं आम्हांस करतां यावयाची नाहीं ! व तेव्हांपासून मला माझ्या त्या गर्विष्ठपणाची लाज वाटूं लागली. पण गुरुजी, मी येथें आल्यापासून मला तसल्याच, स्वतःला मोठे थोर समजणाऱ्या मुलांची संगति मिळाली; आणि त्या नादांत मी तुमचेपाशीं असतांना शिकून घेतलेल्या सर्व गोष्टी अगदीं विसरलों !

गुरुजीः—पण मग त्यांत काय बिघडलें! स्वतःला थोर समजणाऱ्या त्या मुलांच्या संगतीनें तूंहि 'थोर गोष्टी' शिकला असशील. मग त्यानें तुझा फायदाच झाला. त्याबद्दल तुला आनंदच वाटला पाहिजे.

बाळः— नाहीं गुरुजी! ते मुलगे विशेष शहाणे किंवा मोठे शीलवान होते असें नाहीं. एकाही गोष्टीनें जे दुसऱ्या कोणाचा किंबहुना स्वतःचाही उपयोग करूं शकत नाहींत, ते थोर कसचे? पण त्या मुलांच्या संगतीनें मलाही वाटूं लागलें कीं, 'आम्ही मोठे थोर आहोंत; व इतर गरीब लोक सगळे क्षुद्र आहेत. ते आपल्या सहवासास योग्य नाहींत!'

गुरुजीः—तरी कांहीं वावगें नाहीं. कारण मोठेपणा आपल्या अंगीं यावा हें तर प्रत्येकास आवश्यक आहे. तर मग त्या मुलांनीं तुला, मोठेपणानें कसें वागावें व कशानें लोक आपणांस खरोखर थोर म्हणतील, हें चांगलें शिकविलें असेल.

बाळः—नाहीं गुरुजी, अगदीं याच्या उलट मात्र झालें. त्यांच्या संगतींत परोपकार व सौजन्य अंगीं यावयाच्या ऐवजीं उद्दामपणा व दुष्टपणा मात्र जडला; दुसरें कांहीं नाहीं!

गुरुजीः—असें जर झालें असेल तर त्या मुलांची वास्तविक जी योग्यता होती, तिपेक्षां त्यांस तूं फार योग्यतेचे समजलास, असेंच म्हटलें पाहिजे. एरवीं तो संगतीचा परिणाम तुझ्यावर कसा होईल?

बाळः—हो, हीच चूक मजकडून झाली असें मला वाटतें. पण हें मला आधीं कळलें नाहीं. त्यामुळें या आठ दिवसांत त्यांनीं जी गोष्ट केली तीच मीं केली; त्यांनीं हरीची चेष्टा सुरू केली कीं, मीही त्याची चेष्टा करीं! पुढें तर मीं एवढी मोठी चूक केली कीं, हरी हा आपल्याबरोबर नकोच, असेंच मला वाटूं लागलें! व मीं त्यास मारलेंही!

गुरुजीः—हें मात्र वाईट झालें! कारण, हरीचें तुझ्यावर खरें, मनापासून प्रेम आहे, हें मला ठाऊक आहे. असो. तरी पण हरीला हरीचे उद्योग

पुष्कळ आहेत; तेव्हां तुला त्याची संगति नकोशी वाटली तर त्यांत त्याचें काय मोठें नुकसान आहे ? नाहीं तर तुझ्याशीं बोलण्याचालण्यापासून हरीला आपली जमीन कशी नांगरावी व तींतून पीक कसें काढावें, या गोष्टीचें ज्ञान थोडेंच मिळणार होतें ! त्यामुळें शेतकऱ्यांच्या मुलांचीच संगति करणें हरीला खरें म्हटलें तर अधिक फायदेशीर. आणि त्याचा स्वाभाविक कलही तिकडेच आहे. तात्यासाहेबांनीं फार आग्रहपूर्वक लिहिलें नसतें तर तो तुझ्याबरोबर तुझ्या घरींही येता ना. तेव्हां आतां तो भेटला तर मी त्याला हवें तर सांगून टाकीन कीं, 'बाळाला दुसरे सोबती मिळाले आहेत; आतां तूं त्याच्याकडे जात जाऊं नकोस !' म्हणजे झालें ना ?

बाळः—गुरुजी, नका हो असें करूं ! हरी हा माझा खरा मित्र, त्याच्यासारखा मला दुसरा मित्र नाहीं, आणि त्यानें जर माझी संगति सोडली तर मला आतां चैन पडावयाचें नाहीं. मी त्या मुलांच्या नादानें हरीला जी चापट मारली आहे, तें माझें पाप केव्हां आणि कसें नाहींसें होणार तें मला कळत नाहीं !

असें म्हणून बाळ रडूं लागला. गुरुजींनीं तें पाहिलें; परंतु त्याकडे विशेष लक्ष न देतां ते पुढें म्हणाले-पण बाळ, तूं हरीच्या संगतीच्या मागें लागलास, तर तुझी त्या मोठमोठ्या श्रीमंत मुलांची संगति अंतरेल !

बाळः—अंतरली तरी चालेल. मला त्यांचें थोडेंच प्रेम आहे ? पण मला आतां ही काळजी पडली आहे कीं, मीं एवढा मोठा अपराध केला आहे कीं, आतां हरी पुनः मजशीं पूर्वीप्रमाणें प्रेमानें व मोकळ्या मनानें वागेल कीं नाहीं ? अरेरे ! मीं केवढी चूक केली !

असें म्हणून बाळ त्याबद्दल वारंवार हळहळूं लागला. 'मी किती दुष्ट, कृतघ्न !' असें वाटून त्याचे डोळे पाण्यानें पुनः भरून येऊन, तो आतां हुंदके देऊं लागला ! मग थोड्या वेळानें डोळे पुसून तो म्हणाला—

"गुरुजी, हरी मला क्षमा करील का ?"

आणि पुन: अधोवदन करून स्वस्थ राहिला !

गुरुजी म्हणाले—बाळ, तूं हरीशीं असें वर्तन करावयास नको होतें, हें खरें; तथापि हरी हा इतका सुस्वभावी आहे कीं, तुला जर तुझ्या अपराधाबद्दल खरा खरा पश्चात्ताप झाला असेल, तर तो तुला खास क्षमा करील. कांहीं एक मनांत किल्मिष न ठेवतां तो पूर्ववत् तुझ्याशीं गोडीनें वागूं लागेल.

बाळः—असें होईल तर मला केवढा आनंद वाटेल ! मग गुरुजी, तुम्ही त्याला इकडे उद्यां घेऊन याल का ? म्हणजे मी त्याच्याशीं कसा वागतों तें तुम्हांला दिसून येईल.

गुरुजीः—वाहवा ! मग तुला खराच पश्चात्ताप झाला आहे म्हणावयाचा ! बाळ, हरीनें तुजकडे आतां कशासाठीं यावें बरें ? तूं त्याला शिवीगाळ करावीस, त्याचा अपमान करावास, एवढेंच काय, पण कांहीं कारण नसतां तूं त्यास चपराक मारावीस ! ती तरी कशासाठीं ? तर त्यानें तुला चांगला उपदेश करून तुला एका संकटांत शिरण्यापासून परावृत्त करण्याचा प्रयत्न केला म्हणून ! होय ना ? मग तुझी अशी कल्पना आहे ?—कीं, ही तुझी वागणूक अशा प्रकारची आहे कीं, त्याबद्दल त्यानें परत तुझ्या घरीं तुझ्या भेटीस यावें ! तूं केलेल्या अन्यायाबद्दल तुला खंती वाटत आहे अशी त्याची तूं खात्री पटविल्याशिवाय पुनः तुझ्या भेटीस त्यानें कसें यावें ? तो आल्यावर तूं त्याच्याशीं चांगला वागशील असें तरी त्यानें कसें समजावें, हें मला सांग बरें !

बाळः—मग गुरुजी, मी काय करूं या वेळीं ?

गुरुजी:—अरे, तुला जर पुनः मैत्री करावयाची असेल, तर त्याच्या घरीं जाऊन त्यास विनंति करणें हें तुझें काम आहे !

बाळः—पण त्याच्या घरीं त्याच्या आईबापांच्या देखत मी जर त्यास जाऊन भेटलों व कांहीं बोललों, तर तें बरें कसें दिसेल ?

गुरुजी:—कां बरें दिसणार नाहीं? वा! तुझी तुझ्या मित्राच्या घरीं जाऊन त्यास भेटण्याचीही तयारी नाहीं! म्हणजे तुझी कल्पना अशी दिसते कीं, एकादें अन्यायाचें कृत्य केलें, तरी तें एकवेळ आपणास शोभेल; पण अन्यायाचें परिमार्जन करण्यासाठीं आपण आपल्या मित्राची भेट घेणें हें आपणास कमीपणाचें आहे! होय ना?

बाळ:—गुरुजी, माझी येण्याला तयारी आहे. पण मी त्याच्या घरीं जाऊन त्याची क्षमा मागितली तर लोक काय म्हणतील?

गुरुजी:—ते असे म्हणतील कीं, आम्हांला वाटलें त्यापेक्षां बाळ हा अधिक शाहणा व अधिक समंजस आहे! दुसरें काय म्हणणार! तथापि ही गोष्ट खरी आहे कीं, हरी हा तुला शोभेल असा सोबती नाहीं! तेव्हां तूं आपल्या त्या श्रीमंत मुलांशीच सहवास ठेवावास हेंच योग्य आहे!

इतकें बोलून गुरुजी उठले व आतां परत घरीं जावें म्हणून खुंटीवरचा आंगरखा काढून घालूं लागले. तें पाहून बाळ पुन: घाबरला व हुंदके देऊन रडूं लागला. तेव्हां गुरुजी म्हणाले:—बाळ, आतां आपला बोलण्याचा विषय संपला. तूं मला विचारलेंस, तें मीं तुला अगदीं मोकळ्या मनानें खरें तें सांगितलें. तुला कोणाहीं चांगल्या व शाहण्या माणसाचें प्रेम हवें असलें, तर तूं असेंच वागावयास पाहिजे. तुला नसेल तसें वागावयाचें, तर तुझा मार्ग तुला मोकळा आहे.

बाळ हुंदके देत देत पुढें झाला आणि म्हणाला:—गुरुजी! नका हो जाऊं इतक्यांत! हरीशीं मी फार वाईट वागलों, त्यामुळें माझा हरी मला अंतरला! तात्या तर कालपासूनच रागावले आहेत; आणि तुम्हीही रागावून आतां निघून गेलांत तर मग माझें असें कोण उरलें? गुरुजी, नका हो तसेच जाऊं. मला या प्रसंगांतून सोडवा!

गुरुजी:—आतां हा विचार तुझा तूं पहा. याला दुसरें कोण काय करणार? आतां तुझी सुटका आम्हीं कशी करावी? आपला अपराध प्रांजळ-

पणें कबूल करून आपल्या मित्राचें मन संतुष्ट करणें हें आतां तुझ्या हातचें आहे. यायोगें तात्यासाहेबांना बरें वाटेल; हरीसही संतोष होईल; आणि मलाही तुजबद्दल पूर्वींप्रमाणें प्रेम वाटूं लागेल. तूं अभिमानी आहेस व उतावीळ स्वभावाचा आहेस, हें माझें पूर्वींपासूनचेंच मत आहे. पण तुझ्या अंगीं उदारवृत्ति व भलेपणा आहेत, अशीही माझी कल्पना आहे. मग जर तूं अंगीं अभिमान बाळगतोस, तर तुला तुझे दोष ओळखतां आले पाहिजेत; आणि तुझ्या अंगीं भलेपणा आहे, त्या अर्थीं तूं ते आपले दोष प्रयत्नानें सुधारले पाहिजेत. असेंच होणें साहजिक नाहीं काय ? बाळ, या तुझ्या चुकीमुळें तात्यासाहेबांना किती वाईट वाटलें हें तुला ठाऊक आहे ना ? त्यांना मी असेंच सांगितलें कीं, तूं जरी एकादे वेळीं रागाच्या भरांत वाटेल तिकडे वाहत जातोस, तरी तूं जेव्हां त्या गोष्टीचा पुढें शांतपणें विचार करूं लागतोस, तेव्हां तूं आपली चूक ओळखतोस व कबूल करतोस. पण बाळ, जर तुला असें वागावयाचें नसेल, तर तुझ्यासंबंधांत मी आतां कोणालाही रदबदली न करणें बरें !

बाळः—तर मग गुरुजी, मी आतां असाच थेट हरीकडे जातों व 'मला पूर्ण क्षमा कर' म्हणून त्याची विनवणी करतों. तुम्ही सांगतां तेंच अगदीं बरोबर आहे अशी माझी खात्री झाली. पण गुरुजी, तुम्ही मजबरोबर तेथवर याल का ?

गुरुजीः—थांब; तूं केलास हा निश्चय फार सुरेख आहे; तुला भूषणावह आहे; आणि यायोगें तूं आपलें मन मोकळें करावेंस हें चांगलें. पण हें सर्व कांहीं करण्यापूर्वीं तूं तात्यासाहेबांस नीट कळवावयास नको का ?

बाळः—हो खरेंच. मी तात्यांना विचारतों; नंतर हरीकडे जातो.

याप्रमाणें त्यांचें भाषण पुष्कळ वेळ चाललें. तोंच तात्यासाहेब आपली वामकुक्षी संपवून दिवाणखान्यांत आले. इतक्यांत बाळ पुढें झाला आणि हरीकडे जाऊन त्याची क्षमा मागण्याचा आपला निश्चय झालेला त्यानें

त्यांस सांगितला. तो ऐकून तात्यासाहेबांस संतोष वाटला. ते म्हणाले—" बाळ, हा तूं चांगला विचार केलास. मोठ्या सरदारांच्या मुलांच्या संगती-पेक्षां तुला हरीची संगतिच अधिक इष्ट आहे असें मला खास वाटतें."

याप्रमाणें तात्यासाहेबांचा रुकार मिळाला. नंतर गोविंदशास्त्री म्हणाले, " बाळ, मी आतां दुसऱ्या कांहीं कामास जातों. उद्यां सकाळीं तूं मजकडे ये; मग आपण हरीकडे जाऊं." आणि ते घराकडे निघाले.

## ४७ बाबाजीपंतांची भेट.



नंतर सायंकाळपर्यंतचा वेळ बाळानें दुश्चित मनानें कसाबसा संपविला. मग सकाळीं उठून, तात्यासाहेबांस विचारून तो गुरुजींकडे गेला. गुरुजी तयारच होते. ते लगेच निघाले व हरीच्या घराकडे चालले. बाळ मनांत बराच खिन्न झाला होता. तें पाहून गुरुजींनीं वाटेनें त्याशीं कांहींच प्रश्नोत्तरें न करितां त्यास त्याच स्थितींत राहूं दिलें. हरीच्या घरापाशीं येतात तों, हरी पुढच्याच अंगास लाविलेल्या भुईमुगाच्या पिकांत हातीं खुरपें घेऊन, भांगलण्याचें काम करीत होता. त्याला पाहतांच, बांधावरचे कांटे किंवा कुंपण यांजकडे न पाहतां, एकदम बाळ पुढें धांवला; आणि त्याच्याजवळ जाऊन उभा राहिला व म्हणाला—" हरी!... ...

पण पुढें त्याच्यानें बोलवेना. हरीला वाटलें, हा धांवत आपल्याकडे आला, म्हणून दम लागून त्यास बोलतां येत नसेल. म्हणून तो लागलीच आपलें खुरपें तसेंच हातांत घेऊन उठला व त्यानें त्याचा हात धरिला. तरी बाळाला मुखावाटे एकही शब्द काढतां येईना; इतकी त्याच्या हृदयांत विचारांची गर्दी व कालवाकालव झाली होती. त्याच्या चर्येवरून, डोळ्यां-वरून व वारंवार स्फुरण पावणाऱ्या ओंठावरून हरीला कळून चुकलें कीं झालेल्या चुकीबद्दल त्यास हा पश्चात्ताप झाला आहे; व त्याच वेदनांमुळें

त्यास आतां बोलवत नाहीं. मग हरीनें त्यास प्रेमानें आलिंगन दिलें व अत्यंत मृदु शब्दांनीं तो त्यास म्हणाला-" बाळ, तूं कां बोलत नाहींस ? रागावलास होय ? "

बाळ क्षणभरानें जरा वृत्तीवर आल्यानंतर म्हणाला-नाहीं रे हरी ! पण तूं मजवर रागावला असशील; व मीं जी वाईट गोष्ट केली, तिजबद्दल मीं तुझी कितीही क्षमा मागितली तरी तूं आपला राग कमी करशील कीं नाहीं याचीच मला भीति वाटत आहे !

हरी--क्षमा ? क्षमा रे कसली बाळ ? आणि त्याची भीति ती कसली ? मला राग कोठें आला आहे, मीं तुला क्षमा करायला आणि न करायला ?

बाळ--हरी, तूं इतका थोर मनाचा आहेस कीं, मला वाटतें तुझ्या पायांवर खरोखर साष्टांग नमस्कार घालावा ! हरी, खरोखर तूं मला क्षमा करशील का ?

हरी:—बाळ, पण मी खरेंच सांगतों, परवांची गोष्ट माझ्या मनांत अगदीं राहिली नाहीं व तुझें प्रेम मी अगदीं विसरलों नाहीं !

बाळ:—आणि हरी, हा तुझा उपकार, हें तुझें प्रेम व हा तूं मज अपराध्याचाही केलेला आदर, या गोष्टी अशा आहेत कीं, त्या कधीं काळीं विसरणें मला तर शक्य नाहीं ! हरी, मग तूं मला क्षमा केलीस ना ?

हरी:—" अरे, हें तूं पुनःपुनः काय विचारतोस बाळ ? मी रागावलों अशी तूं शंकाच मुळीं घेऊं नकोस. " आणि असें म्हणून त्यानें पुनः एक-वार बाळाला आलिंगन दिलें. आपल्या दोन्ही विद्यार्थ्यांत चाललेला हा परस्पर प्रेमालिंगनाचा प्रकार पाहून, व क्षमेची जितकी प्रांजळ याचना तितकेंच उदार दान पाहून गोविंदशास्त्र्यांस फारच आनंद वाटला. इतका वेळ ते मागेंच राहून हा सर्व प्रकार अवलोकन करीत होते; व परस्पर प्रेमाच्या भरांत त्यांनाही आतांपर्यंत गुरुजी जवळच असल्याचें कळलें नव्हतें. मग गुरुजी पुढें होतांच हरीला मोठा आनंद वाटला. लागलीच

त्यानें त्यांस नमस्कार केला. बाळानेंही वंदन केलें. तो प्रसंग पाहून गुरु सांदीपनी व त्यांचे शिष्य श्रीकृष्ण, बलराम व सुदामा यांची आठवण होते; व एका अंगास ती गुरूची भव्य मूर्ति व त्यांच्यापुढेंच नम्रपणें उभे राहिलेले ते प्रेमळ व सद्गदित शिष्य हेंच चित्र सारखें डोळ्यापुढें दिसतें!

असो. वंदन करतांच त्या दोघांस जवळ घेऊन कुरवाळून गुरुजी म्हणाले—" हरी, तुमचें सर्व बोलणें मीं ऐकिलें. तुमचा दोघांचा असा सुंदर मिलाफ झालेला पाहून मला फार आनंद वाटतो! "

तोंच हरीचे वडील बाबाजीपंत कुलकर्णी यांनीं आपले घराबाहेर येऊन, शेतांत ही सर्व मंडळी उभी असलेली पाहिली. तेव्हां गोविंदशास्त्री असे आज अकस्मात् आपलेकडे आलेले पाहून त्यांनाही आनंद वाटला. मग ते तत्काळ शेताचे बांधावर आले, व त्यांनीं हरीस हाक मारिली. मग हरी बाळ आणि गुरुजी सर्वजण बाबाजीपंतांकडे निघाले. गोविंदशास्त्री यांस पाहून बाबाजीपंतांस फारच आनंद वाटला. हरीला तर आज आनंदाची परमावधि झाली. कारण त्याचा स्नेही बाळ व त्याचे थोर व ममताळू स्वभावाचे गुरुजी गोविंदशास्त्री हे आज त्याच्या घरीं आले होते! मग शेतींचें चाललेलें काम थांबवून त्या दोघां पितापुत्रांनीं आपल्या दोन्ही पाहुण्यांचा मोठा प्रेमळ सत्कार केला. तरी त्या सत्कारांत श्रीमंती थाटमाट अर्थातच कोठें नव्हता. घरांत बाबाजीपंतांचें कुटुंब व त्यांच्या दोघी मुली याहि-अर्थात बाळाशीं व गुरुजींशीं प्रेमानें, मोकळेपणानें, घरच्यासारख्या मिळून-मिसळून वागल्या. तें पाहून त्यांच्या कुलशीलतेबद्दल बाळाची कल्पना बरीच बदलली. गरीबींत असूनही हरी जसा थोर स्वभावाचा निघाल्या-बद्दल त्याची खात्री झाली होती, तशीच त्याच्या घरांतील सर्वांबद्दल आतां त्याची समजूत बनत चालली. सुस्वभावाचें बीज श्रीमंती हें खास नव्हे, किंबहुना सुस्वभाव हा श्रीमंतीपेक्षां गरीबींतच अधिक पारिणत होतो, हा विचार त्याच्या मनावर आतां दृढ होऊं लागला; व ' जन्मा आलि-

याचें फळ ' खरें म्हटलें तर थोर शील, थोर दानत हेंच होय; श्रीमंती व तदनुषंगी भोगविलास हें खास नव्हे, असेंही तो आतां शिकला. बाळा-बद्दलही त्या सर्व मंडळींना असाच आनंद झाला. खरोखर, सर्वच श्रीमंत लोकांना ही गोष्ट इतकी सोपी आहे कीं, त्यांनीं फक्त आपला उद्दामपणा व गर्व दूर केला, तर त्यांना कोणापासूनही प्रेम व आदर प्राप्त होतो. एका गर्विष्ठ-पणामुळें ते प्राय: इतरांच्या तिरस्कारास व उपहासास पात्र होतात. आज येथें बाळाचा गर्व व उद्दामपणा सर्व पूर्णपणें नष्ट झाला होता. त्यामुळें हरीच्या घरांत तो अगदीं घरच्यासारखाच सर्वांशीं वागला व त्यामुळें सर्वांच्याच आनंदांत त्यायोगें चांगली भर पडली.

अर्थात् हे दोघेही पाहुणे आज हरीच्या घरीं जेवावयास राहिले. पुष्कळ दिवसांनीं गोविंदशास्त्री घरीं आलेले पाहून बाबाजीपंतांनीं त्यांस व हरीनें आपला मित्र बाळ यास आग्रह करून जेवावयास ठेवून घेतलें; व बाळाच्या घरीं त्याप्रमाणें गोविंदशास्त्री यांनीं निरोप पाठवून दिला. हरीच्या घरीं जेवावयाचा थाट अर्थातच काय असणार ! आणि ऐपत नसतांही भिडेनें किंवा लौकिकाच्या खोट्या भयानें उगीच फाजील खर्च, फाजील थाटमाट करावयाचा, ही गोष्टही बाबाजीपंतांच्या किंवा त्यांच्या कुटुंबाच्या स्वभा-वांत अर्थातच शिरलेली नव्हती. त्यामुळें त्यांची आमटी-भाकरीच त्यांच्या पाहुण्यांना आज पुरणपोळीसारखी मधुर लागली. बाळालाही आतां या प्रकारचें जेवण कांहीं नवें नव्हतें. कारण साधेपणासंबंधाचें त्याचें प्रेम आतां बरेंच वाढलें होतें, व " आलिया पदार्था न मिळे। तो एक मूर्ख " या समर्थोक्तींतलें मर्म त्याला कळूं लागलें होतें. भोजनोत्तर सर्व मंडळी ओसरीवर बोलत बसल्यानंतर मुखशुद्धीकारितां हरीनें ताटभर भुईमुगाच्या शेंगा सर्वांपुढें आणून ठेविल्या. नंतर बोलतां बोलतां शेतकीच्या अभि-वृद्धीवर गोविंदशास्त्री यांनीं भाषण चालविलें. बाबाजीपंतांना शेतकीचा तर रोजचा वरचाच अनुभव असल्यामुळें शेतकीची परंपरागत आलेली

सर्व माहिती त्यांना होती. त्यांना आज त्याच गोष्टींचें शास्त्रीय ज्ञान ऐका-वयास मिळून, त्यांतील कार्यकारणभावाचें ज्ञान त्यांस झालें. निरनिराळ्या वनस्पतींचे वर्ग, त्यांस उपयोगास येणारीं निरनिराळीं सार्धी व मुद्दाम बन-विलेलीं खातें, त्यांची वाढ होण्याचे आंतर व बाह्य असे दोन प्रकार, त्यांस फुलें येणें, त्यांतील वेगवेगळ्या प्रकारचे केसर एकत्र मिसळणें, मग त्यांस फळ धरणें इत्यादि गोष्टी आज गुरुजींनीं आपल्या भाषणांत काढल्या; त्या सर्व हरीनें मन देऊन ऐकिल्या. बाळालाही तें सर्व भाषण ऐकल्यावर मोठें नवल वाटलें. तो मनांत म्हणाला:—" शेतकऱ्याच्या कामांत असतांनासुद्धां मनुष्याला बुद्धिमत्तेचा उपयोग पुष्कळ होतो तर! मग शारीरकष्टाचीं कामें करणारे हे शेतकरी लोक चांगले बुद्धिमान असतील! मग आम्ही इनाम-दारांचीं माणसें तेवढीं थोर कशीं व शेतकरी लहान कसे? खरोखर, या व्यवसायास हलकें लेखणें किती चुकीचें आहे! याप्रकारें उत्तम शील व उत्तम बुद्धिमत्ता या दोन्ही गोष्टी ज्यांमध्यें असूं शकतात, त्या लोकांना केवळ श्रीमंती नाहीं म्हणून कमीपणा न येतां, उलट गरीबींतही ते या गुणांनीं युक्त आहेत असें पाहून त्यांचा मोठा गौरवच केला पाहिजे. अशा हरीच्या घरीं येऊन, आपली झालेली खरोखर चुकी त्याजपाशीं मोकळेपणें कबूल करावयास आपण गुरुजींपाशीं उगीच अनमान केलें, हा आपला केवढा वेडेपणा! खरोखर हरीचे वडील व हरीच्या घरांतील सर्वच माणसें फार सुस्वभावी व सुशील आहेत. अशांशीं संगति करणें कमीपणाचें नसून, उलट आपल्या हिताचेंच आहे. यांचा शेतीचा व्यवसायही फार सुंदर, आनंद-दायक, पवित्र व सर्वांच्या अत्यंत उपयोगाचा आहे. यांनीं शेतकीच केली नाहीं, तर ज्वारी पिकणार कोठून व लोकांना भाकरी मिळणार कोठून? तेव्हां आळसांत लोळणाऱ्या सर्व श्रीमंतांवर या कष्टाळू लोकांचे, विशेषतः शेतकऱ्यांचे फार उपकार आहेत, यांत शंका नाहीं; व याबद्दल आम्ही यांचे सदैव उपकार जाणले पाहिजेत व यांस आपल्या बंधूप्रमाणें मानलें पाहिजे."

असे किती तरी विचार त्याच्या मनांत येऊन गेले.

नंतर थोड्या वेळानें बाबाजीपंत आपल्या कांहीं कामासाठीं उठून घरांत गेले, तेव्हां बाळाच्या मनांत चाललेल्या विचारक्रांतीची दिशा ओळखून गुरुजी म्हणाले—" बाळ ! आजचा दिवस तुला फारच वेगळ्या प्रकारचा वाटत असेल. आज तुला या हरीसारख्या गरीबाच्या घरीं आमटीभाकरी खाण्याचा प्रसंग आला, तो पुष्कळ दिवस तुझ्या लक्षांत राहील असें मला वाटतें. बाळ ! असे गरीब व कष्टाळू लोक आहेत, म्हणूनच सर्व लोकांना अन्नपाणी मिळत आहे; म्हणूनच व्यवहार चालले आहेत; व म्हणूनच देशाची सुधारणा होत आहे. गर्भजात श्रीमंत व म्हणूनच आळशी अशा लोकांच्या योगानें देशांत कांहीं कार्य होत नसतें. आणि सर्व लोकांच्या कल्याणास कारण झालेले व स्वपराक्रमानें उदयास येऊन सर्वत्र ज्यांचा लौकिक झाला असे आजचे किंवा प्राचीन काळचे सर्व थोर थोर लोक हे अशा गरीबींतूनच उदयास आलेले आहेत. परमेश्वराची भक्ति हृदयांत उत्पन्न व्हावयास गरिबीच कारण आहे; मनुष्य उद्योगशील बनावयास गरिबीच कारण आहे; आणि मनुष्य सहृदय, कनवाळू, सौम्य व सात्त्विक बनावयासही गरिबीच कारण आहे, यांत शंका नाहीं. मनुष्यानें जन्मास येऊन जें कांहीं संपादन करावयाचें तें हेंच शील होय. सतत उद्योग करावा; दुसऱ्याशीं अगत्यानें व कनवाळूपणानें वागावें, अडचणी येतील त्या सहन कराव्या, पण दीन होऊं नये; व या प्रकारें संसार सुखमय करून, पृथ्वीलाच स्वर्ग बनवून, मग आपलें उतार वय श्रीहरीच्या चरणसेवेनांत व भक्तिप्रेमांत खर्चून, अंतीं कृतार्थ होऊन मोक्षास जावें हेंच आपण संपादावयाचें आहे. संपत्ति संपादन करावयाची व नानाप्रकारच्या चैनींत व विलासांत दिवस घालावयाचे; तक्के, लोड यांस टेकून पडून राहून गरीबांना छळावयाचें हें कांहीं आपल्या जन्माचें साफल्य नव्हे. याप्रमाणें ज्यांनीं आपल्या जन्माचें सार्थक केलें अशा सर्व लोकांचा इतिहास पहा;

आळसांत व चैनविलासांत पडून राहून मोठ्या पदावर चढलेला कोणी तरी तुला ठाऊक आहे काय ? संत-महंत पदाला गेलेल्या महात्म्यांमध्यें तर विलासाचें नांवही असणार नाहीं; पण ज्यांनीं राज्यें कमाविलीं त्यांनीं सुद्धां रात्रंदिवस आपला प्राण धोक्यांत घालून महापराक्रम केले; व तेव्हां त्यांना राज्यश्री प्राप्त झाली. श्रीशिवाजीमहाराज यांनीं केवढे कष्ट केले, व तेव्हां त्यांना स्वराज्य संस्थापितां आले, हें त्यांचा इतिहास वाचून तुला कळूं लागलेंच असेल. अटकेपासून कटकेपर्यंत झेंडा लावणारा पराक्रमी बाजीराव पेशवा स्वारीवर जातांना, शेतांतील हिरवीं कणसें तोडून, त्यांचे दाणे चोळून तोंडांत टाकी व तसाच पुढें जाई ! राणा प्रतापसिंह तर गवतावर निजे, व पानावर जेवी ! श्रीसमर्थ रामदासस्वामींनीं आपल्या वयाच्या बाराव्या वर्षींच आपलें घर सोडलें; व टाकळीस राहून बारा वर्षें पुरश्चरण केलें ! व तुकारामबोवांनीं भंडाऱ्याच्या डोंगरांत श्रीविठ्ठलाचें भजन करतांना अन्नपाण्याची परवा केली नाहीं ! महात्मा गौतमबुद्ध तर आपलें सर्व राज्यैश्वर्य, आपली स्त्री व आपला नुकताच जन्मास आलेला मुलगा सोडून अरण्यांत गेला व लोखंडाचे चणे खाऊन मग ब्रह्मरंगीं नाचूं लागला ! अशीं किती तरी थोर पुरुषांचीं उदाहरणें तुला मी सांगूं शकेन. सारांश, या सर्व उदाहरणांवरून तुझ्या हें लक्षांत आलेंच असेल कीं, श्रीमंती ही एक क्षुद्र गोष्ट आहे व गरिबी ही मोठें भाग्यवान् होण्याची अमूल्य संधि आहे !

असें बोलून गुरुजी क्षणभर थांबले. तोंच बाळ म्हणाला:—गुरुजी, गौतमबुद्धाची गोष्ट आम्हांला सांगतां ?

गुरुजी म्हणाले—त्या सर्व गोष्टी मीं आपल्या पुस्तकांत लिहून ठेविल्या आहेत; त्या तूं म्हणशील तेव्हां मी तुला वाचावयास देईन. आतां तुला वाचावयाची गोडी लागली असतांना दुसऱ्या कोणाकडून गोष्टी ऐकण्याची तुला आतां काय जरूर आहे !

बाळ:—मग आतां घरीं जातांच गुरुजी, मला तें पुस्तक काढून द्या;

तें सर्व वाचल्याशिवाय मी आज घरींच जात नाहीं !

गुरुजी:—वा ! मग, इतका वेळ बाळ परत घरीं कसा आला नाहीं, म्हणून तात्यासाहेब व राधाबाई धांवत तुझ्या शोधाला येतील ! मग तूं त्यांना काय सांगणार ?

बाळ:—कां ? मी वाचीत बसलों आहें, म्हणून सांगावयाला मला काय हरकत आहे ?

गुरुजी:—पण आईबापांना एवढ्या काळजींत न पाडतां, तुला वाचावयाला बसतां येणार नाहीं काय ? उद्यां सकाळीं रोजच्याप्रमाणें नऊ वाजतां आपण आपल्या देवळांतील ओवरींत वाचीत बसावयास मोकळे असूं.

याप्रमाणें भाषण झाल्यानंतर गुरुजींनीं हरीचे वाडिलांना निरोप विचारला. नंतर हरीला येतों असें म्हणून ते दोघे परत जाण्यास निघाले. बाबाजीपंतांनीं मोठ्या आदरानें निरोप दिला. हरीला मात्र गुरुजी व बाळ चालूं लागतांना कसेंसेंच वाटलें. त्यानें शेवटीं मोठ्या प्रयत्नानें आपलें पाऊल परत घेतलें !

---

## ४८ कागदाची पुडी.

याप्रमाणें बाळाच्या सुधारणेचें काम गोविंदशास्त्री यांनीं अत्यंत कळकळीनें, आणि चांगलें विचारपूर्वक असें संबंध एक वर्षभर चालविलें ! हरीची बाळाशीं सांगड घालून देण्यांतही त्यांचा हाच मुख्य हेतु होता. त्याप्रमाणें बाळाच्या प्रगतींत हरीच्या संगतीचीही मोठीच मदत आतांपर्यंत होत आली होती. श्रीमंतांचा पोकळ गर्व, उद्योगाचा कंटाळा, गरीबांबद्दल तिरस्कार, शरीराचा नाजुकपणा, चैनीची आवड आणि खरा मोठेपणा म्हणजे काय ती श्रीमंती, " सर्वे गुणाः कांचनमाश्रयंते, " इत्यादि ज्या चमत्कारिक समजुती बाळाच्या ठिकाणीं त्याच्या त्या सरदारी व जहागीरदारी

राहणीनें उत्पन्न झाल्या होत्या, त्या आतांपर्यंत गोविंदशास्त्री यांनीं बहुतांशीं दूर करून तेथें दुसऱ्या कित्येक सद्‌गुणांचा परिपोष करून ठेविला होता. आणि तो परिपोष त्यास नव्यानें पाहणाऱ्या कोणाही माणसाच्या सहज ध्यानांत येण्याजोगा होता. श्रीमंतींत वाढलेल्या राधाबाई यांस जरी प्रथम प्रथम हे गोविंदशास्त्री व त्यांची शाळा यांचा कंटाळा वाटत होता, तरी आतां त्यांच्या शिकवणीचे जे सुपरिणाम झाले होते ते त्यांच्याही लक्षांत येऊं लागले असून गोविंदशास्त्र्यांबद्दल त्यांच्या मनांत आतां आदरही उत्पन्न झाला होता. आतां भाद्रपद मास संपत आला; व लौकरच दसरा येणार व त्या दिवशीं बाळाच्या गुरुगृहवासास पूर्ण एक वर्ष होणार होतें. तेव्हां नवरात्र सुरू झाल्यावर दुसरेच दिवशीं राधाबाईंनीं विषय काढला कीं, बाळाच्या गुरुजींस त्यांच्या शिकवणीबद्दल काय द्यावयाचें ? पत्नींकडूनच असा प्रश्न निघतांच तात्यासाहेबांनीं क्षणभर मौज करण्याकरितांच उलट बाजू घेतली व म्हटलें:—त्यांना कशाला काय द्यावयास पाहिजे ? त्यांनीं असें काय फारसें शिकविलें आहे ! व तें त्यांनीं नसतें शिकविलें, तर बाळाला आलें नसतें कीं काय ? दुसरीं कित्येक मुलें त्यांजकडे शिकायला होतींच. हरीला त्यांना रोज शिकवावयाचें होतेंच. मग त्यांनीं बाळासाठीं कांहीं विशेष खटपट केली आहे असें नाहीं. हवें तर दसऱ्यास त्यांना जेवावयास बोलवावें म्हणजे पुष्कळ झालें ! ”

याप्रमाणें तात्यासाहेबांचें उत्तर ऐकून राधाबाईचें समाधान झालें नाहीं. त्या म्हणाल्याः—कांही झालें तरी ब्राह्मणाचे श्रम आपण फुकट घेऊं नयेत शिवाय चातुर्मासांत लोक दानें देतात; व्रतें करतात; आणखी कितीतरी पुण्यकृत्यें करतात. आपणांस ऐपत आहे, तर आपण असें कांहीं दान व्रत करावें. एक वर्षाचें सर्व घरसामान गोविंदशास्त्र्यांस आतां द्यावें असें माझ्या मनांत आहे. एवढ्याला कांहीं फार खर्च लागणार नाहीं. ”

राधाबाईंचा हा दानाचा विचार म्हणजे अगदीं शुद्ध सात्त्विकच होता

असें नाहीं. कदाचित् त्यांत निष्कामबुद्धीच्या ऐवजीं, पुण्यकर्में करून अन्य जन्मीं त्याचें फळ आपणास भोगावयास मिळेल अशी आशा जास्त असेल. किंबहुना त्याहीपेक्षां, आपला लौकिक होईल, चार बायका आपल्याला नांवाजतील; 'राधाबाई! राधाबाई!' करतील; आपला श्रीमंती थाट आणखी या प्रकारें चारचौघींच्या नजरेस येईल, असाही त्यांचा एक विचार असेल. परंतु श्रीमंतींत वाढलेल्या त्या बाईच्या ठिकाणीं हा गुण-सुद्धां कांहीं कमी महत्त्वाचा नव्हता. संसार करीत असणाऱ्यांत निष्कामबुद्धि दुर्लभच. आणि पुण्यकर्में करतांना स्वर्गप्राप्तीची तरी खरी श्रद्धा कितीकांस असते? तेव्हां लोकांनीं चांगलें म्हणावें या बुद्धीनेंही असलीं कृत्यें होतील, तर त्यांनाही-विशेषतः स्त्रियांच्या दृष्टीनें-पुष्कळ महत्व आहे. तेव्हां राधा-बाईनीं हा विचार बोलून दाखविल्यानंतर तात्यासाहेबांनीं आपली बाजू फारशी ओढून न धरतां फक्त "बरें, तुझ्या मनांतच असलें तर माझी ना नाहीं." एवढें विधान करून भाषण संपविलें.

दसरा उजाडेपर्यंत आणखी एकदोन वेळ हा प्रश्न निघून गोविंद-शास्त्र्यांस त्यांच्या श्रमाचा मोबदला म्हणून, असें ठरविण्यांत आलें कीं एक अलंकार तयार करून तो गोविंदशास्त्री यांच्या पत्नीस द्यावा आणि असें हें दान स्वीकारण्याबद्दल गोविंदशास्त्र्यांस विनंती करावयाची ठरली. तोंच दसरा आला! आणि तात्यासाहेबांनीं बाळाला बरोबर घेतलें व ते गोविंदशास्त्री यांची भेट घेण्यास गेले. शास्त्रीबोवा घरींच होते. तात्या-साहेब येतांच रीतीप्रमाणें 'नमस्कार, या बसा,' इ. झाल्यावर तात्यासाहे-बांनीं हळुच आपल्या हातांतून एक कागदाची पुडी काढली व ती गोविंद-शास्त्र्यांच्या पुढें करून 'हें घ्या!' एवढे शब्द भीत भीत उच्चारले. गोविंदशास्त्री यांनीं तें सर्व लागलीच ओळखलें. ते म्हणाले:— तात्या-साहेब! मला हे दागिने व अलंकार आवडत नाहींत! आम्हांला यांची गरज नसते. माझ्या कुटुंबासमुद्धां असले हे श्रीमंती थाट आवडत नाहींत!

हें मी तिला नेऊन दिलें तरी ती घालणार नाहीं, पहा हवें तर." आणि असें म्हणून त्यांनीं ती पुडी तशीच परत सारली.

तात्यासाहेब म्हणाले:—शास्त्रीबोवा, स्त्रियांना अलंकार हीच शोभा आहे. तेव्हां हें आंत नेऊन आपण त्यांस घालावयास द्यावें, म्हणजे माझ्या मनाला समाधान वाटेल.

गोविंदशास्त्री:—तात्यासाहेब, आम्हांला अलंकार ही शोभा वाटत नाहीं. अलंकार ही शोभा कसली ? स्त्रिया झाल्या तरी त्या अलंकारानें कशा शोभतील ! मनुष्य पराक्रमानें शोभतो, ज्ञानानें शोभतो; गुणांनीं शोभतो, शीलानें शोभतो; सात्त्विकतेनें शोभतो, परोपकारानें शोभतो; ईश्वर-भक्तीनें शोभतो, वैराग्यानें शोभतो ! स्त्री काय आणि पुरुष काय, सर्वांना शोभा याच गोष्टीनें येते. सुवर्णानें येत नाहीं. माझे असेच विचार आहेत; व माझ्या संगतीमुळें माझ्या कुटुंबाचेसुद्धां विचार असेच झाले आहेत; तिलाही आपल्या वागणुकींत सर्वत्र साधेपणाच फार आवडतो; आणि पर-मेश्वराची आमच्यावर एवढी कृपा आहे कीं, साधेपणा भंग पावेल अशी संपत्तिही आमच्या घरीं नाहीं !

तात्यासाहेब:—गुणांनीं मनुष्य शोभतो हें खरेंच आहे; पण अलंकारांनीं त्यांस जास्त शोभा येते.

गोविंदशास्त्री:—कांहीं येत नाहीं ! सुवर्णादि धातूंचा तो चकचकीत-पणा असतो. चमकणें हा त्या धातूंचा धर्म आहे. मग चमकणें ही शोभा आहे काय ? तसें असेल तर सुवर्णाच्या अलंकारांनीं भरलेली पेटीच शोभते म्हटलें पाहिजे. या धातूंच्या चकचकितपणामुळें आपणांस शोभा येते ही लोकांची अगदीं बेडसर कल्पना आहे. परंतु पुष्कळ लोकांच्या मनांत ही कल्पना फार दाटून बसलेली आढळते. आणि याचाच मला वारंवार अचंबा वाटतो. सोन्यारुप्याच्या दागिन्यांना लोक एवढें महत्त्व कां देतात तें मला कळत नाहीं. मनुष्याच्या जीवनास जें आवश्यक त्याचेंच फक्त खरें

महत्व आहे. म्हणूनच शेतीचें महत्व आहे. 'निर्वाहापुरतें अन्नआच्छादन' आणि 'आश्रमासी स्थान खोपी, गुहा;' किंवा आमचें श्रीशंकराचें देवालय! बस झालें. आतां माणसास जास्त पदार्थ हवेत कशाला? मनुष्य जन्मास आला आहे तो त्यानें कांहीं कर्तव्यें करावयाचीं आहेत म्हणून आला आहे, कीं चैन करण्याकरितां? तुम्हांस काय वाटतें? चैन करण्याकरितां, असें आपल्या धर्मांत कोठें सांगितलेलें नाहीं. असो. विषय-सेवन हें विषयांच्या निवृत्तीकरितां आहे; भोगलालसा वाढविण्याकरितां नाहीं! मग हें सुवर्ण सांठवून ठेवण्याची आम्हांस काय गरज आहे हें मला समजत नाहीं. तात्यासाहेब, यामुळें मला हें कांहीं स्वीकारावेंसें वाटत नाहीं. पण मीं असें स्पष्ट सांगतों म्हणून रागावूं नका हो!

तात्यासाहेबः—आपलें म्हणणें खरें आहे. पण प्रपंचाची कांहीं तरी सोय आपणां सर्वांना पाहणें भागच आहे ना? त्या दृष्टीनें आपण याचा स्वीकार करावा अशी माझी विनंति आहे.

गोविंदशास्त्रीः—हाही एक मोठा चमत्कारिक विचार हल्लीं लोकांमध्यें सर्वत्र शिरून बसलेला आढळतो; तोही बऱ्याचसारखाच चुकीचा आहे. निदान तसें माझें तरी मत आहे. प्रपंचाची सोय कसली कपाळाची? व ती या सुवर्णानें काय होणार आहे? अहो! कष्ट करावे, आणि मिळवावें. पहा, मी माझ्या महादेवाच्या देवालयाच्या आवारांत ज्वारी पेरतों; मला पुरेशी ज्वारी त्या शेतांतून मिळते. आतां मला आणखी प्रपंचाची सोय काय पाहिजे? आणखी तात्यासाहेब, काय काय केलें म्हणजे प्रपंचाची सोय होणार, हें तरी एकदां सांगा पाहूं? अहो, दहा रुपये मिळविणारा माणूस म्हणत असतो कीं, मला प्रपंचाची सोय करावयाची आहे! वीस, रुपये मिळविणाराही तसाच; चाळीस तसाच; शंभर तसाच; पांचशें रुपये मिळविणाराही पुनः तसाच त्याच काळजींत सांपडून म्हणत असतो कीं, मला प्रपंचाची सोय करावयाची आहे; कशी काय होईल कोण जाणे! सारांश,

श्रीमंत आणि गरीब, सारेंच जग या ' प्रपंचाची सोय ' नामक एका राक्षसीनें वेडे करून टाकले आहेत; आणि त्या मद्याच्या धुंदींत हे सर्वजण धांवत आहेत ! यांची धांव थांबणार केव्हां व यांस स्वास्थ्य आणि विश्रांति मिळणार केव्हां ? सर्वांची एकच धडपड चालली आहे–' प्रपंचाची सोय ! ' पण अद्यापपर्यंत तरी ज्याच्या प्रपंचाची सोय झाली आहे व जो धाला आहे, असा वर्तमानकालीं तर कोणी दिसत नाहीं व भूतकालांतही कोणी झाला नाहीं ! मी तर हा सर्व मोह समजतों. त्यामुळें मला असल्या पदार्थांची जरूरी नाहीं. मनुस्मृतींत सांगितलें आहे. कीं, तीन दिवस पुरेल इतक्या अन्नापेक्षां ब्राम्हणानें अधिक संग्रह करूं नये. मग या व्याख्येप्रमाणें आम्हीं आपला संग्रह कमी करावा हें बरें, कीं आणखी वाढवावा हें बरें ?

तात्यासाहेब:—शास्त्रीबोवा, आपल्यापुढें मला कांहीं जास्त सांगतां येणार नाहीं. पण एवढें स्वीकारलेंत तर आपले आमच्यावर उपकार होतील असें वाटतें.

शास्त्रीबोवा–नको नको. या सुवर्णाचा बिटाळ आम्हांला नको ! ही आमची भिक्षुकांची राहणी अगदीं अशीच आमच्या कुळांत कित्येक पिढ्या चालत आली आहे. ती मी आतां आजच नव्यानें कशाला मोडूं ? मला माझे पूर्वज काय म्हणतील ? नको, तात्यासाहेब; मला नका आग्रह करूं ! ज्या गांवाची आपल्याला ओळख नाहीं त्या गांवांत जाऊन राहावयाचा आग्रह आपण मला नका करूं !

तात्यासाहेब:–आपण आमचें अगदींच ऐकत नाहीं ! मला वाटतें आतां हीं हें आपलेंच आहे, हें आपण स्वीकारावें. पुन: मी कांहीं आपणांस असा आग्रह करणार नाहीं. वेळ आहे; माणसाचे नेहमींच हातपाय चालतात असें नाहीं. वृद्धपणीं उपयोगीं पडावा म्हणून माणसाजवळ पै पैसा असणें हें कांहीं वावगें नाहीं.

शास्त्रीबोवा:—सर्व लोकांच्या दृष्टीनें तात्यासाहेब, आपलें म्हणणें योग्य

आहे; पण माझी मनःस्थिति तशी राहिली नाहीं. वृद्धपणींसुद्धां माणसास पैसा पाहिजे अशी माझी समजूत नाहीं. सांठविलेलें शील जितकें आपल्या उपयोगीं येतें तितका पैसा येत नाहीं असें मीं समजतों. असा सांठविलेला पैसा वृद्धपणीं उपयोगास न येतां उलट आपल्या शत्रूंना तो लुबाडावयास सांपडतो; व तो असा कोणी लुबाडतांना पाहून आपणांस उलट दुःख मात्र होतें. पैसा नसला तर मात्र सुखानें मरण येतें. गजनीचा महंमद मरतांना, आपण मिळविलेल्या संपत्तीकडे पाहून, आतां ही मला अंतरणार या विचारानें रडला, तें तुम्हांस ठाऊक असेलच ! माझ्याविषयीं म्हणाल तर मला या यातना व हाल यांचें कांहींच वाटत नाहीं. "जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्य च." जन्मास आल्यावर एक दिवस मरणें हें आहेच. तें श्रीमंताला काय आणि गरीबाला काय, टळत नाहीं हें ठरलेलेंच आहे. तेव्हां मला तर असें वाटतें कीं, "भूतांची दया हें भांडवल" आपण सांठवावें; वृद्धपणींची काळजी करणें आणि 'आपुल्या देहीं ममता" धरणें हें कांहीं आह्मां ब्राह्मणांस जरूर नाहीं.

तात्यासाहेबः—मग आम्हीं हें परत न्यावें असेंच कां आपलें म्हणणें ? मग आम्हीं आपले उतराई कोणत्या तऱ्हेनें व्हावें बरें ?

शास्त्रीबोवाः—उतराई काय व्हावयाचें ! उपकार केला असेल तर ना उतराई व्हावयाची गोष्ट ? पण मीं हे तुमच्यावर उपकार केले नाहींत ! नाहीं तरी मला दिवसभर कांहीं उद्योग नको का ? जिवंत मनुष्य उद्योगा-शिवाय कसा स्वस्थ राहील ? "न हि कश्चित् क्षणमपि जातु तिष्ठत्यकर्मकृत्" असें भगवद्गीतेंत म्हटलें आहे. मग दुसरा कांहीं तरी उद्योग करावयाचा, तो मी तुमच्या मुलाला पुढें घेऊन बसतों; व त्याला एकादी गोष्ट सहज सांगतों. ती त्याच्या चित्तांत उतरलेली पाहून मला आनंद होतो; नाहीं उतरली तर, या नाहीं त्या तऱ्हेनें ती त्यास समजावून देण्याची मला हौस वाटते. याप्रमाणें शिकवीत असतांनाच माझ्या श्रमाचा मोबदला आनंदाच्या

रूपानें मला लागलीच परत मिळतो; मग मी आपणांपासून आणखी मोब-दला काय घ्यावा व कसा घ्यावा, हें तुम्हीच सांगा बरें ? आणखी दुसरा एक विचार तुम्हांस सांगतों ऐका:—शिकविण्याचें काम मी तुमच्या प्रेमा-साठीं केलें असें समजा; व त्याचे मोबदला तुम्ही मजवर प्रेम करूं लागलां आहांतच, मग आतां मोबदला द्यावयाचा तो काय राहिला आहे ? तुम्ही माझे आहांत व मी तुमचा आहें ! असेच आपण सर्वजण एक होऊं या, प्रेमानें बांधू या, म्हणजे झालें. मग आपण सर्व बंधुबंधु. मग कोणीं कोणास काय द्यावें, व कोणीं काय घ्यावें ? मग सर्व विश्व हें एक घर, व त्यांतील माणसें हीं सर्व एका घरांतलीं माणसें झालीं ! मग वडिलांजवळ सर्व संपत्ति असावयाची; व त्यांनीं घरांत कोणास काय लागेल तें आणून द्यावयाचें. तर आतां जे श्रीमंत लोक आहेत ते सर्व जगद्रूप कुटुंबांत वडिलांचे जागीं आहेत. त्यांनीं संपत्ति सांठवावी व ती गरीबांचे उपयोगाकरितां प्रसंग ओळखून खर्चावी; ही सर्व संपत्ति माझी एकट्याची आहे, अशी भावना धरूं नये म्हणजे झालें. आतां तुम्हीं हें आणलेलें सर्व खरोखरच परत न्यावें व दसऱ्याच्या मुहूर्तानें तुम्हीं असें ठरवावें कीं, तुमची सर्व संपत्ति ही गरी-बांच्याकरतां आहे; व प्रसंग पाहून तुम्ही तिचा गरीबांच्या रक्षणार्थ उपयोग करावा. या प्रकारें वागावयाचें तुम्हीं ठरविलेंत म्हणजे माझा सर्व मोबदला मला आला नाहीं काय !

गोविंदशास्त्री यांनीं आपली देणगी स्वीकारावी म्हणून तात्यासाहेबांनीं आपली बुद्धि लढवून एकामागून एक, दोन, चार प्रमाणें दिलीं. पण तीं सर्व वरीलप्रमाणें शास्त्रीबोवांनीं खंडित करून, शेवटीं त्यांची देणगी त्यांस परत दिली. त्यामुळें उदारवृत्तीच्या तात्यासाहेबांना एक प्रकारें खेद वाटला. आपणास दुसऱ्याचे उपकार घ्यावे लागूं नयेत, ही त्यांची नेहमींची भावना; व श्रीमंती भरपूर असल्यामुळें कोणाच्याही उपकाराची फेड आपण हवी तेव्हां खास करूं, असें त्यांस आजपर्यंत वाटत असे. परंतु गोविंदशास्त्र्यां-

सारख्या निस्पृह भिक्षुकापुढें त्यांचें कांहीं चालेनासें झालें; आणि संपत्तीनें फिटत नाहींत अशींही कित्येक ऋणें या जगांत आहेत, हें त्यांस आज कळून चुकलें! गोविंदशास्त्र्यांचा हा निस्पृहपणा त्यांना मोठा बिलक्षण वाटला. ते मनाशीं म्हणाले:—"संपत्ति, सोनेंरुपें, जें मी इतकें उपयुक्त समजतों, ज्याच्या संपादनासाठीं मी फार दक्ष असतों; व प्रयत्नपूर्वक ज्याचें मी संरक्षण करितों, आपल्या सर्व तऱ्हेच्या सुखासाठीं ज्याच्यावर मी भरंवसा ठेवून राहतों, व ज्याच्या योगानें लोकांतही मला मोठा मान मिळतो, ती ही संपत्ति या बिचाऱ्या भोळ्या भिक्षुकाला कांहींच वाटत नाहीं, हा केवढा चमत्कार आहे! संपत्तीला तुच्छ लेखणारे लोक या जगांत आहेत म्हणावयाचे! याप्रमाणें संपत्तीला तुच्छ समजून नित्य विद्याभ्यासांत, ज्ञानाच्या आनंदांत, व लोकोपयोगांत जे सर्व आयुष्य वेंचतात, ते धन्य आहेत यांत शंका नाहीं. त्यांना त्यायोगें जो आनंद मिळत असेल त्याची आम्हां श्रीमंतांस काय कल्पना आहे? अशा श्रीमंतांपेक्षां त्यांची योग्यता लक्षपटीनें अधिक आहे यांत शंका नाहीं."

तात्यासाहेब याप्रमाणें विचारांत गुंतलेले पाहून गोविंदशास्त्री त्यांस म्हणाले:—तात्या! विचार कसला करतां? तुमची देणगी मी स्वीकारीत नाहीं याबद्दल तुम्हांस खेद का वाटतो? तसें असल्यास तुमच्या समाधानास मी तुम्हांस एक मार्ग सांगतों. बाबाजीपंतांचा मुलगा हरी याची संगति तुमच्या मुलाच्या सुधारणेस फारच कारण झाली आहे. किंबहुना हरीच त्याचा शिक्षक आहे व मी नुसता मार्गदर्शक झालों आहें. शिवाय त्यानें एकदोन वेळ कठिण प्रसंगांतून बाळाला सोडविलें आहे. तर तुम्हांस जें कांहीं देणें असेल तें तुम्ही हरीच्या घरीं पोंचवा, म्हणजे तुमच्या मनाचें पुष्कळ समाधान होईल.

तात्यासाहेब:—पण तें तरी सोपें नाहीं. आपलाच तो शिष्य. तोही आम्हांला असाच खुशाल परत पाठवील! त्यालाही पुरेशी शेती आहे,

पुरेसे कष्ट करण्याची ताकद व संवय आहे ! तोही म्हणणार—मला हें सुवर्ण कशाला पाहिजे ? संपत्ति ही इतकी क्षुद्र आहे याची मला आतांपर्यंत कल्पना नव्हती.

गोविंदशास्त्री:—त्याला एक उपाय आहे. तो मी आपणांला सांगेन. दुपारीं आपण इकडे याल ? बरोबर बाळालाही आणा.

तात्यासाहेब:—पण आज आपण आमच्या पंक्तीस आलें पाहिजे ! आपण आल्याशिवाय आम्ही आज जेवणार नाहीं !

मग गोविंदशास्त्री क्षणभर थांबले. मग, एवढ्याच एका गोष्टीनें तात्यासाहेबांचें समाधान होत आहे तर आपण भोजनास त्यांजकडे जावें, असें त्यांनीं ठरविलें व तात्यासाहेबांस आपला रुकार दिला.

---

# ४९ मित्राचे उपकार.

भोजनाचा प्रसंग फार संतोषकारक झाला. असला निःस्पृह गृहस्थ आज आपल्या पंक्तीस येऊन जेवत आहे हें पाहून तात्यासाहेबांस फार समाधान झालें. " साधुसंत आले घरा, तोचि दिवाळी-दसरा " या वाक्याप्रमाणें आजचा दसरा खरा दसरा ठरला. बाळालाही गुरुजींच्या आगमनाचें व सहवासाचें अतिशय सुख वाटलें. राधाबाईनाही आज वर्षाचा शिधा गोविंदशास्त्री यांच्या घरीं पोंचवावयाचा असल्यामुळें, त्यांनीं त्यांचें दांपत्य भोजनास बोलाविलें होतें. तेव्हां त्यांना मनापासून जेवावयास वाढण्यांत त्यांना आज फार उत्साह वाटत होता. याप्रमाणें आनंदांत भोजनप्रसंग झाल्यावर मंडळी दिवाणखान्यांत पानसुपारी घेत बसली असतां, गोविंदशास्त्री तेथून तात्यासाहेबांच्या गोठ्याकडे वारंवार दृष्टि देऊन पाहतांना दिसले. तेव्हां तात्यासाहेब म्हणाले:—" आपण तिकडे काय

पाहतां आहां ?" असें विचारल्यावर गोविंदशास्त्री म्हणाले:—समोर हा पांढरा खोंड दिसत आहे, हा तुमचाच काय ?

तात्यासाहेबांनीं हो ह्मणतांच गोविंदशास्त्री पुढें म्हणाले:-मग ही चांगली गोष्ट आहे. ही देणगी हरीस देण्याजोगी आहे. हा खोंड हरीस नेऊन दिला तर तुम्हांस चालेल काय ?

तात्यासाहेबांनीं लागलीच रुकार दिला. ते ह्मणाले:—बाबाजीपंतांनीं तो स्वीकारला, तर मजवर त्यांचे मोठे उपकार होतील. पण हें होणार कसें ? आपण केलें तर होईल.

गोविंदशास्त्री:-"तें मी करतों. सोडा तो खोंड व चला आपण हरीच्या येथें जाऊं." असें म्हणून ते उठले. लागलीच तात्यासाहेब व बाळ हेही उठले. एका नोकरास बोलावून, त्यास तो खोंड सोडून, बरोबर घेऊन चालण्यास तात्यासाहेबांनीं आज्ञा केली; आणि लौकरच ते हरीच्या घरीं पोंचले. हरी व बाबाजीपंत पलीकडच्या बागांत कांहीं कामें करीत होते व पुढच्या अंगास कोणी नव्हतें. मग तेथें पोंचतांच गोविंदशास्त्री यांनीं तो खोंड परभारेंच हरीच्या गोठ्यांत नेऊन बांधावयास सांगितला व आपण ओसरीवर गेले. तोंच कोणी आल्याचें ऐकून बाबाजीपंत बाहेर आले. हरीही तावडतोब धावला ! आज ही मंडळी अशी अकस्मात् आपणाकडे कां आली हें बाबाजीपंतांस कळेना. मग रीतीप्रमाणें 'या, बसा' म्हणून त्यांनीं ओसरीवर एक घोंगडी पसरली व तीवर गोविंदशास्त्री, तात्यासाहेब बसले. बाळाला तें वृत्त हरीस सांगावयाची अत्यंत उत्कंठा झाली होती. तो लागलीच म्हणाला—हरी, तुझ्या गोठ्यांत आज नवें कोण येऊन बसलें आहे पाहिलेंस का ? तोंच हरीनें गोठ्याकडे पाहिलें, तों विशेष कांहीं दिसेना. मग जरा पुढें होऊन पाहातो तों एक सुरेख तेजस्वी पांढरा शुभ्र खोंड तेथें बांधलेला दिसला. त्यास पाहतांच हरीला पहिल्याप्रथम फारच हर्ष वाटला. तो म्हणाला:—"बाबा ! कोठला हो हा खोंड ? कसा

अगदीं सुरेख आहे पण!"

त्याबरोबर बाबाजीपंत पुढें आले. तों त्यांनाही तो खोंड पाहून अचंबा वाटला. मग ते तात्यासाहेबांच्याकडे वळून ह्मणाले-"काय हा चमत्कार आहे कळत नाहीं!" तोंच गोविंदशास्त्री यांनीं हरीस जवळ बोलाविलें व त्यास जवळ घेऊन सर्व वृत्तांत त्यास सांगितला. नंतर ते बाबाजीपंतांस ह्मणाले—"बाबा, खोंड चांगला आहे. ठेवून द्या घरीं माझ्यासाठीं. हरीच्या चांगुलपणाचें तें एक चिन्ह म्हणून तुमच्या गोठ्यामध्यें तो असूं द्या. तुमच्या शेतीच्या कामीं त्याचा उपयोग होईल."

त्यावर बाबाजीपंत म्हणाले—शास्त्रीबोवा, हा काय भलताच आग्रह आपण करतां? कोणाचा उपकार घेऊं नये, हें तर आपण वारंवार हरीस शिकवितां! तें हरी आह्मांस घरीं सांगत असतो. मग हा खोंड आपण येथें कशाला बांधलात?

गोविंदशास्त्रीः—बांधावयास नकोच होता. पण हरीच्या चांगुलपणाचें तें एक चिन्ह म्हणून तो मला बांधावासा वाटला; व तसें केल्याशिवाय तात्यासाहेबांसही बरें वाटलें नसतें, म्हणून मीं त्यांस तसें करण्यास संमति दिली. आतां एकदां गोठ्यांत बांधलेला बैल आपण सोडून परत करूं नका!

हा प्रकार कळतांच हरीलाही चमत्कारिक वाटलें. पण तो खोंड त्यास इतका आवडला कीं, तो गोठ्यांतून सोडून परत करावयाची कल्पना ऐकतांच त्यास अत्यंत अवघड वाटलें. तें त्याच्या चर्येवर तावडतोब दिसून आलें. तें गोविंदशास्त्री यांनीं ओळखलें व ते म्हणाले:—"काय हरी, तुला तो खोंड नसलाच स्वीकारावयाचा तर तुझी मर्जी! पण मग बाळाला तूं जी क्षमा केलीस ती मनापासून केलीस असें त्यास कसें वाटेल?

तें ऐकतांच हरीनें बाबाजीपंतांस म्हटलें:—बाबा, तात्यासाहेबांच्या व बाळाच्या मनांत आहे, तर आपण त्यांचें ऐकावें असें मला वाटतें. गुरुजी-

ऱ्या सांगण्याप्रमाणें आपण करावें, हेंच चांगलें नव्हे का ?

आतां बाबाजीपंतांचा देणगी नाकारण्याचा जोर कमी झाला. लागलीच तात्यासाहेबांनीं बाबाजीपंतांचे उपकार मानले; व सर्व मंडळी उठून घराकडे निघाली. तोंच बाबाजीपंतांनीं दसऱ्याचें सोनें द्यावयास काढिलें. नंतर परस्पर अत्यंत प्रेमाच्या भेटी झाल्या. बाळ व हरी आणखी एकदां दृढ प्रेमानें भेटले. आणि मंडळींनीं घरचा रस्ता धरला. बरेंच अंतर ते जात तोंपर्यंत बाळ मागें पहात होता; व तो दिसेनासा होईपर्यंत हरीची दृष्टि बाळाकडे व गुरुजींकडे लागून राहिली होती.

---

# ५० उपसंहार

इकडे हें होत आहे तोंवर राधाबाई यांनीं आपण ठरविल्याप्रमाणें एक वर्षाचें घरसामान भरून एक गाडी गोविंदशास्त्र्यांच्या घरीं पाठविली व अतिशय आग्रह करून ती त्यांच्या येथें सर्व उतरली ! तांदूळ, दाणे, गूळ, मीठ, मिरची, लुगडें, चोळी, आणखी दुसरे कित्येक लहानसहान सर्व जिन्नस वर्षभर त्यांस पुरतील असे घेऊन आपल्याच हातांनीं त्यांनीं घरांत जागच्या जागीं नेऊन भरून ठेविले. आणि शेवटीं हळदकुंकू देऊन व घेऊन त्या परत घराकडे निघाल्या. तोंच गोविंदशास्त्री आले. तों त्यांना दाराशीं दोन पोतीं पडलेलीं दिसलीं. तीं कसलीं म्हणून विचारतांच तात्यासाहेबांचे दिवाणजी पुढें होते, त्यांनीं उत्तर दिलें—" तीं आमचीं आहेत; रानांतून आतां आणलीं. आतां पुढें नेण्याला छकडा पाहिजे आहे. तो घेऊन येतों व मग नेतों. "

याप्रमाणें वेळ मारून दिवाणजी वाटेस लागले. पण घरीं येतांच पत्नीनें सर्व प्रकार त्यांस निवेदन केला. मग पुनः तात्यासाहेबांकडून कोणी मनुष्य

येतांच त्यांस तीं परत घेऊन जाण्यास सांगावयाचें असें ठरविण्यापेक्षां अधिक कांहीं न करितां गोविंदशास्त्री स्वस्थ राहिले. मग पुढें त्यांनीं तीं केव्हां परत केलीं, तें मात्र कळलें नाहीं. असो.

× × × × ×

यानंतर बाळाच्या शिक्षणाला दुसरें वर्ष सुरू झालें. हरीची जोड याही वर्षीं होतीच. अशीं दोन तीन वर्षें काढल्यानंतर बाळाचा शिक्षणक्रम व गुरुगृहवास संपून तो गृहस्थाश्रम स्वीकारण्याच्या अवस्थेंत येऊन पोंचला. नंतर यथाशास्त्र गृहस्थाश्रमाची दीक्षा घेतल्यानंतर गुरुजींच्याकडे संपादन केलेले शीलसंवर्धनाचे धडे बारंबार गिरविण्याचा त्यास प्रसंग आला व त्या सर्व वेळीं त्यानें आपली शिकस्त करून, 'खरा भलेपणा' मिळविण्याचा प्रयत्न केला. आणि श्रीमतीनें मोठे म्हणवून घेण्याच्या ऐवजीं सुशील, उदार, तेजस्वी, परोपकारी होऊन भला म्हणवून घेण्यांत त्यास भूषण वाटूं लागलें. त्या वेळची "बाळासाहेब इनामदारांची कथा" वाचकांस कळवावयाची आहे. पण ती आतां पुढें एखादे प्रसंगावर ठेवून तूर्त येथेंच थांबतों.



